## प्रा. डॉ. के. वा. आपटे यांचे नियतकालिकांत प्रकाशित झालेले ग्रंथ

**(अ) शंकराचार्यांचे ग्रंथ :-** (१) एकश्लोकी (२) पंचीकरण (३) कौपीनपंचक (४) साधनपंचक (५) महागणेशपंचरत्न (६) मायापंचक (७) अद्वैतपंचरत्न (८) निर्वाणषट्क (९) गुरु-अष्टक (१०) दशश्लोकी (११) लघुवाक्यवृत्ति (१२) वाक्यवृत्ति (१३) ब्रह्मज्ञानावलीमाला (१४) विज्ञाननौका (१५) वाक्यसुधा (१६) स्वात्मप्रकाशिका (१७) स्वात्मनिरूपण (१८) ब्रह्मानुचिंतन (१९) आत्मबोध (२०) अद्वैतानुभूति (२१) प्रौढानुभूति (२२) स्वरूपानुसंधान-अष्टक (अपरोक्षानुभूति आणि शतश्लोकी यांचे प्रकाशन चालू आहे).

**(आ) उपनिषदे :-** (२३) कलिसंतरण (२४) नारायण (२५) कृष्ण (२६) शिवसंकल्प (२७) आत्मोपनिषद् (२८) सर्वोपनिषद् (२९) अमृतबिंदु (३०) निरालंब (३१) कैवल्य उपनिषद्

**(इ) संकीर्ण :-** (३२) रामानुजाचार्यकृत श्रीभाष्य (१.१.१) (३३) मध्वाचार्यकृत खंडनत्रय (३४) गौडपादभाष्यासह ईश्वरकृष्णकृत सांख्यकारिका (३५) चूडामणिचरितामृत (३६) रामरक्षा (३७) कालिदासाची नाटके (३८) प्राकृत व्याकरणातील गणपाठ

**(ई) इंग्रजीत :-** (३९) आत्मानात्मविवेक (४०) शारीरक उपनिषद् (४१) ब्रह्मबिंदु उपनिषद् (४२) कैवल्य उपनिषद् (४३) हंसगीता (४४) भारतीय तत्त्वज्ञानातील आत्मसाक्षात्काराचे मार्ग (४५) एकश्लोकी (४६) मूळ गीता आणि तिचा वक्ता (४७) पंचीकरण (४८) प्रबोध सुधाकर (रामगीतेचे प्रकाशन चालू आहे).

।। श्रीराम ।।

श्रीदासराम ग्रंथमाला : पुष्प ६

जगद्‌गुरु श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या ४००व्या
जन्मशताब्दि-निमित्ताने प्रकाशित

# दासबोधातील तत्त्वज्ञान

प्रा. डॉ. के. वा. आपटे



प्रकाशिका
सौ. माया के. आपटे

प्रथम आवृत्ती सांगली इ. स. २००७

- **दासबोधातील तत्त्वज्ञान**

- **प्रकाशिका : सौ. माया के. आपटे**
  (बी.ए., हिंदी सनद)





**श्री. नारायण केशव आपटे**
(एम्. कॉम., सेट)

यजुर्वेद अपार्टमेंट, एस. टी. कॉलनी रोड,
विश्रामबाग, सांगली ४१६ ४१५
दूरभाष - (घर) ०२३३- २३०१६९९
भ्रमणध्वनी : ९४२३८२९५९१


Also books available on :-
vacanamrut.googlepages.com


- **मूल्य :** १०० रुपये

- **प्रथम आवृत्ती :** इ. स. २००७

- **प्रकाशन दिन :**
  (चिमडमहाराज पुण्यतिथि दिन)
  मार्गशीर्ष शुद्ध ११, शके १९२९
  मोक्षदा एकादशी
  गुरुवार. दि. २०-१२-२००७

- मुद्रक :
  [illegible] खाडिलकर


2331484

# अनुक्रमणिका

# प्रकाशिकेचे मनोगत

श्रीसमर्थ रामदासस्वामींचा दासबोध हा एक उत्कृष्ट ग्रंथ आहे. त्यात त्यांनी प्रपंचेच्छू तसेच परमार्थेच्छू माणसांना उपयुक्त ठरतील असे विचार मांडले आहेत. परमार्थ करू इच्छिणाऱ्या पुरुषासाठी रामदासांनी ब्रह्म, माया, पंचीकरण इत्यादींवरील तात्त्विक विवेचन केले आहे. परंतु हे विवेचन दासबोधाच्या निरनिराळ्या विभागांत विखुरलेल्या स्वरूपात दिसून येते. तेव्हा दासबोधाच्या जिज्ञासू आणि अभ्यासू माणसाला उपयोगी पडावे म्हणून हे विस्कळित असणारे विवरण सुसंगतपणे एकत्र करून मांडावे या दृष्टीने डॉ. आपटे यांनी नऊ लेख लिहिले व ते निरनिराळ्या नियतकालिकांत प्रसिद्धही झाले. ते सर्व लेख या पुस्तकात एकत्रपणे दिले आहेत. हे पुस्तक वाचताना काही भाग पुनरुक्त झाला आहे असे वाचकांना जाणवेल. या पुनरुक्तीचे कारण इतकेच आहे की, हे लेख निरनिराळ्या काळी लिहिले होते आणि प्रत्येक लेख स्वतंत्रपणे स्वयंपूर्ण व्हावा अशी लेखकाची दृष्टी होती. ही बाब लक्षात घेऊन त्या भागाकडे वाचकांनी सहानुभूतीने / समजंसपणे / उदारपणाने पाहावे अशी विनंती आहे. पुनरुक्त भागामुळे एक लाभ होण्याची शक्यता अशी आहे की, त्या त्या भागाचा ठोका मनावर बसून तो भाग मनात बिंबेल.

"श्रीदासराममहाराज केळकर यांचे आशीर्वाद माझ्या लेखनामागे आहेत. तसेच माझे शिक्षक कै. शंकरराव गोखले आणि प्राध्यापक डॉ. त्र्यं. गो. माईणकर यांच्या शुभेच्छा आहेत" असे डॉ. आपटे नेहमी म्हणतात. त्याचे हे म्हणणे मी मुद्दाम येथे नमूद केले आहे.

प्रस्तुत पुस्तकाची कच्ची मुद्रिते तपासण्याचे किचकट काम माझा पुत्र चि. नारायण (एम्. कॉम., सेट) आणि स्नुषा सौ. पद्मावती (बी.कॉम.) यांनी आपुलकीने केले. मी त्यांचे कौतुक करून त्यांना धन्यवाद देते. श्रीदासराममहाराजांचे ज्येष्ठ आणि श्रेष्ठ चिरंजीव मा. चंद्रशेखर अण्णामहाराज केळकर यांनी प्रस्तुत पुस्तक 'श्रीदासराम ग्रंथमाला : पुष्प ६' म्हणून प्रकाशित करण्यास अनुज्ञा दिली आणि आमच्या विनंतीला अनुसरून 'पुरस्कार' लिहून दिला, याबद्दल मी त्यांची कृतज्ञ आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या मुद्रणाचे काम सौ. प्रज्ञा खाडिलकर व त्यांचे कामगार यांनी व्यवस्थितपणे केले. त्यांचेही आभार !

ज्या परमेश्वराच्या इच्छेने व प्रेरणेने सर्व काही घडते त्याला नम्रपणे नमन करून मी माझ्या या निवेदनाला येथेच विराम देते. इति शम् ।

सांगली

सौ. माया के. आपटे

# पुरस्कार

माझे पितृदेव ती. प. पू. श्रीदासराममहाराज यांच्या अंतरंगातील प्रा. डॉ. के. वा. आपटे यांनी 'दासबोधातील तत्त्वज्ञान' या नावाचा ग्रंथ लिहिला आहे. प्रा. के. वा. आपटे तथा आमचे श्री. केशवकाका यांचे लिखाण म्हणजे ज्ञान आणि भक्ती यांचा मधुर संगम असतो. या वर्षी प. पू. श्रीसमर्थ रामदासस्वामी यांना अवतीर्ण होऊन ४०० वर्षे होत आहेत आणि याच कालावधीत हा ग्रंथ प्रकाशात येत आहे हे फार मोठे औचित्यपूर्ण आहे.

भगवान श्रीसद्‌गुरू श्रीनिंबरगीकरमहाराज यांचेपासून चालत आलेल्या आपल्या संप्रदायाचा श्रीदासबोध हा प्रमाणग्रंथ आहे. श्रीसिद्धगुरू श्रीनिंबरगीकरमहाराज हे निंबरगी येथे श्रीभीमरायाच्या मंदिरात श्रीदासबोधावरच प्रवचन करीत असत. चिमड येथील श्रीसद्‌गुरू श्रीरामचंद्रावजीमहाराज यरगट्टीकर यांना स्वत: श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनी दासबोध हा ग्रंथ दिला. श्रीसद्‌गुरू श्रीभाऊसाहेबमहाराज उमदीकर यांचेकडे त्रिकाल नेम, त्रिकाल भजन, त्रिकाल पोथी यांतही श्रीदासबोध हाच ग्रंथ आहे. असे आपले संप्रदायात दासबोध या ग्रंथास अनन्यसाधारण महत्त्व आहे आणि हे सगळे समर्थांचे सामर्थ्य आहे.

'दासबोधातील तत्त्वज्ञान' या ग्रंथास भगवान श्रीसद्‌गुरू श्रीनिंबरगीकरमहाराज यांचा आशीर्वाद प्राप्त व्हावा, अशी भगवान श्रीसद्‌गुरू तात्यासाहेबमहाराज कोटणीस, माझे आजोबा ती. प. पू. श्रीमामासाहेब केळकर आणि माझे पितृदेव ती. प. पू. श्रीदासराममहाराज केळकर यांचे चरणी शतश: प्रार्थना करीत आहे.

शेष श्रीरामस्मरण !

राजाधिराज श्रीसद्‌गुरुनाथ महाराज की जय

जय जय रघुवीर समर्थ

श्रीदादांचा कृपाभिलाषी,
चंद्रशेखर
(चंद्रशेखर रामराय केळकर)

सांगली
२३.९.२००७

# आरती

(श्रीदासराममहाराजकृत श्रीरामदासस्वामींची आरती)

आरती रामदासा । परात्पर सर्वेशा
रामदास्य करूनिया । दिली सकळासी दीक्षा ॥१॥

ब्रह्मचारी राहोनिया । पुरश्चरणी रंगला ।
महाराष्ट्र जागा करुनी । कर्तव्यासी युक्त केला ॥२॥

मातेची इच्छा पूर्ण । करण्या आलासे आपण ।
नाम धरुनी हनुमान । *दासराम* आला शरण ॥३॥



# १. चौदा ब्रह्मे आणि एक मुख्य ब्रह्म

समर्थ श्रीरामदासस्वामी हे इसवी सनाच्या सतराव्या शतकात (शके १५३०-शके १६०३) होऊन गेलेले महाराष्ट्रातील एक महान् रामभक्त व ख्यातनाम साक्षात्कारी संत होते. त्यांच्याबद्दल आणखी एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट लक्षणीय आहे:- राजकारणाशी थोडाफार संबंध असणाऱ्या श्रीविद्यारण्यस्वामी, श्रीब्रह्मेन्द्रस्वामी यांसारख्या तुरळक सत्पुरुषात समर्थांचा समावेश होतो. श्रीरामदासांचे विपुल लेखन आज मुद्रित स्वरूपात उपलब्ध आहे; पण त्याचा व्हावा तसा चिकित्सक अभ्यास मात्र झालेला दिसत नाही.

**श्रीदासबोध** - समर्थांच्या सर्व लिखाणात 'मनोबोध' (मनाचे श्लोक) व 'दासबोध' हे दोन ग्रंथ बरेच प्रसिद्ध आहेत. मनोबोधापेक्षा श्रीदासबोध हा खूप विस्तृत आहे आणि त्यात तात्त्विक विषयांची बरीच चर्चाही आहे. दासबोध हा ग्रंथ 'दशक' हे शीर्षक असणाऱ्या मुख्य वीस प्रकरणात विभागलेला आहे. प्रत्येक दशकात दहा समास आहेत. एकेका समासात विवरणाच्या विस्तारानुसार कमीजास्त ओवीसंख्या आहे. 'भक्तांचेनि साभिमाने । कृपा केली दाशरथीने । समर्थकृपेची वचने । तो हा दासबोध ॥' असे दासबोधाबद्दल रामदासानी (दा.२०.१०.३०) स्वतःच म्हटले आहे.

दासबोधाच्या प्रारंभी रामदास सांगतात, ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद । येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥ (दा.१.१.२). तथापि भक्तिमार्गाच्या जोडीने दासबोधात अनेक विषयांचे कमीजास्त विवेचन येऊन जाते. या आनुषंगिक विषयांमध्ये 'मुख्य ब्रह्माचा निश्चय' (दा.१.१.९) हा तात्त्विक विषय समर्थांनी चर्चिला आहे.

दासबोधातील तात्त्विक भाग शंकराचार्यांच्या केवलाद्वैतमताला अनुसरून आहे. या मतात मायेला स्थान आहे. ही माया व ब्रह्म यांचे तौलनिक विवेचन समर्थांनी दा. ६.५.२-२४ या ओव्यांत केले आहे. दृश्य आणि ब्रह्म यांतील फरक दा.६.२.१५-१८, ६.३.३-५ व अन्य ओव्यांत केला आहे. देव किंवा परमात्मा अथवा परब्रह्म याचे सविस्तर वर्णन दा.८ १ व ८.८ यामध्ये येते. दा.२०.१० मध्ये विमलब्रह्माचे निरूपण आहे. खेरीज प्रसंगानुरूप अनेक ठिकाणी मुख्य ब्रह्माचे स्वरूप रामदासस्वामींनी सांगितलेले आहे.

**मुख्य ब्रह्माच्या निश्चयासाठी योजना**-तथापि मुख्य ब्रह्माचा निश्चय करण्यास

सातव्या दशकातील दोन ते चार या समासांत मांडलेला आहे. या भागाचाच अधिक विचार प्रस्तुत लेखात केला आहे. तो करण्यापूर्वी रामदासांनी अवलंबिलेल्या पद्धतीची थोडी अधिक माहिती प्रथम करून घेणे आवश्यक आहे.

**रामदासांनी पत्करलेली पद्धती** - शंकराचार्यांच्या अद्वैततत्त्वज्ञानात ब्रह्म हे एकमेव तत्त्व अंतिम सत्य असून अन्य सर्व मिथ्या आहे. (ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या). ब्रह्म हे सर्व दृश्यांपेक्षा वेगळे आहे. त्यामुळे या दृश्याच्या संदर्भात वापरली जाणारी भाषा ब्रह्माला लागू पडणार नाही हे स्पष्ट आहे. अशा स्थितीत 'गुरोर्मौनं, शिष्यस्तु छिन्नसंशय:' हे जरी बरोबर असले तरी गुरूच्या मौनावरून तत्त्वबोध आत्मसात करण्याचा अधिकार सर्व शिष्यांजवळ कसा असणार ? म्हणून जिज्ञासूंना कळावे या दृष्टिकोनातून व्यावहारिक भाषा वापरून ब्रह्माचे निरूपण करावयाचे आणि नंतर ब्रह्म तसे नाही (न इति) असे सांगून बोध करावयाचा अशी पद्धत पडली. म्हणजे 'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपञ्चं प्रपञ्च्यते'। हा न्याय अवलंबिला गेला. याचा अधिक खुलासा असा :- ब्रह्म या एकमेव सत्य वस्तूवर माया व  तिचे कार्य यांचा आरोप केला जातो (आरोप = अध्यारोप = अध्यास = अतस्मिन् तद्बुद्धि:). पण नंतर सत्यशोधन करताना, माया आणि तिचे कार्य (अथवा अविद्या व तिचा प्रपंच) हे सत्य नाहीत असा त्यांचा निषेध केला जातो (अपवाद = आरोपाचा निषेध) आणि मग केवळ ब्रह्म ही एकमेव सत्य वस्तू आहे असे सांगितले जाते. निषेध करताना तर्क व अनुभव यांचा आश्रय घेतला जातो. अशाप्रकारे, अध्यारोप आणि अपवाद यांच्या आधाराने निष्प्रपंच (प्रपंचातीत) असणाऱ्या ब्रह्माचे विवेचन केले जाते.

हीच पद्धत रामदासस्वामींनी स्वीकारलेली आहे. मुख्य ब्रह्माचे खरेखुरे स्वरूप प्रगट करण्यास त्यांनी चौदा ब्रह्मांचे वर्णन प्रथम (दा.७.२.५४) केले. ते म्हणतात, आधी मिथ्या उभारावे । मग ते वोळखोन सांडावे । पुढे सत्य ते स्वभावे । अंतरी बाणे (दा.७.३.४). प्रथम खोट्याचा पसारा मांडावयाचा, नंतर खोटे बाजूला केल्यावर जे उरते ते सत्य असते (दा.७.२.५५)

अशाप्रकारे वरील पद्धतीचा अंगीकार करून रामदासस्वामी प्रथम चौदा ब्रह्मांचा पसारा शास्त्राधारे (दा.७.२.५५) मांडतात; मग ते त्यांचा निषेध / निरास करतात; त्यामुळे सत्यस्वरूप ब्रह्माचा सिद्धांत कळून येतो (दा.७.३.५)

**चतुर्दश-ब्रह्म-निरासाची कल्पना का सुचली ?** - वरील पद्धतीचा अवलंब करून चौदा ब्रह्मांच्या निरासाची कल्पना रामदासस्वामींना का सुचली हे त्यांनी सांगितलेले

नाही. तथापि त्यासाठी पुढील कारण संभवनीय वाटते. उपनिषदांमध्ये अन्न, प्राण, मन, विज्ञान, आनंद (तैत्तिरीय उपनिषद् ३.२.५), प्रज्ञान (ऐतरेय उपनिषद् ५.३) यांसारख्या अनेकांना ब्रह्म म्हटले आहे. कधी पर आणि अपर ब्रह्माचे उल्लेख उपनिषदांत येतात (परं चापरं च ब्रह्म यदोंकार : । प्रश्न उपनि. ५.२.). कधी उपनिषदे सांगतात की मूर्त आणि अमूर्त अशी ब्रह्माची दोन रूपे आहेत (द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तम। बृहदारण्यक उपनि. २.३.१). तर पंच ब्रह्मासकट सर्वांचा स्वत:मध्ये लय करावा असे एक उपनिषद् म्हणते (पञ्चब्रह्मात्मकं सर्वं स्वात्मनि प्रविलाप्य च । पंचब्रह्म उपनि., २३). तेव्हा उपनिषदे वाचताना साहजिकच ब्रह्माचे खरे स्वरूप काय किंवा मुख्य ब्रह्म कशाला म्हणावे याचा निर्णय करण्याची आवश्यकता निर्माण होते. ती पुरी करण्यास बहुधा रामदासांनी चौदा ब्रह्मांच्या निरसनाची हाताळणी केली असावी. आता दासबोधात त्यांनी निर्देशिलेली चौदा ब्रह्मेच त्यांनी का निवडली हे मात्र सांगता येणे अवघड आहे.

**चौदा ब्रह्मे व शास्त्राधार** - समर्थांनी निवडलेली चौदा ब्रह्मे पुढीलप्रमाणे आहेत : (१) शब्द ब्रह्म (२) मीतिकाक्षर ब्रह्म (३) खं ब्रह्म (४) सर्व ब्रह्म (५) चैतन्य ब्रह्म (६) सत्ता ब्रह्म (७) साक्ष ब्रह्म (८) सगुण ब्रह्म (९) निर्गुण ब्रह्म (१०) वाच्य ब्रह्म (११) अनुभव ब्रह्म (१२) आनंद ब्रह्म (१३) तदाकार ब्रह्म, आणि (१४) अनिर्वाच्य ब्रह्म.

यातील बहुतेकांना उपनिषदांचा स्पष्ट आधार आहे. एकदोघांच्या बाबतीत मात्र दूरान्वयाचा अवलंब करून आधार पाहावा लागतो म्हणजे असे : (१) शब्दब्रह्माला मैत्रायणी आणि ब्रह्मबिंदु उपनि. आणि भगवद्गीता[१] यांचा आधार आहे. (२) मीतिकाक्षर म्हणजे ॐकार हे एकाक्षर; त्याचा उल्लेख[२] कठ आणि तैत्तिरीय उपनिषद् व भगवद्गीता यामध्ये सापडतो. (३) खं ब्रह्म आणि (४) सर्व ब्रह्म छांदोग्य[३] उपनिषद सांगते. (५) चैतन्य ब्रह्माचा निर्देश निरालम्ब[४] इत्यादी उपनिषदांत आहे. (६) सत्ता ब्रह्म या शब्दप्रयोगात रामदासांनी सत्ता[५] हा शब्द अधिकार, प्रभुत्व या अर्थाने घेतला आहे, ही गोष्ट त्यांनी केलेल्या सत्ता ब्रह्माच्या निरासावरून स्पष्ट होते आणि या अर्थाचे समर्थन करणारी वाक्ये बृहदारण्यक[६] उपनिषदात सापडतात. (७) ब्रह्माचे साक्षत्व दाखविणारी वचने मुंडक, कैवल्य[७] व श्वेताश्वतर या उपनिषदांमध्ये सापडतात. (८) व (९) सगुण व निर्गुण ब्रह्माची सूचना देणारी वाक्येही[८] उपनिषदांत आहेत. (१०) वाच्य ब्रह्म म्हणजे ब्रह्माचा निर्देश अथवा बोध करून देण्यास वापरलेले शब्द किंवा नावे (पहा-दा.७.२.४५-५१). असे किती तरी शब्द[९] उपनिषदांत

दिसून येतात. (११) अनुभव ब्रह्म असा शब्दप्रयोग कुठे आढळत नाही. तथापि आपल्या प्रत्येक ज्ञानात ब्रह्माचे ज्ञान (अनुभव) येत असते असे जे केन उपनि. म्हणते (प्रतिबोधविदितं मतममृतत्वं हि विन्दते । केन, २.१२), ते येथे लक्षात घ्यावे. (१२) आनंद म्हणजे ब्रह्म[१०] असे तैत्तिरीय श्रुति सांगते. (१३) तदाकार **ब्रह्म**:-तत् हा शब्द अनेकदा ब्रह्माचा उल्लेख करण्यास[११] उपनिषदे वापरतात (१४) अनिर्वाच्य ब्रह्माचा[१२] निर्देशही उपनिषदे करतात.

**चौदा ब्रह्मांचे स्पष्टीकरण**

चौदा ब्रह्मांचे संक्षिप्त स्पष्टीकरण रामदासस्वामींनी केले आहे. ते प्रथम देऊन त्याचा थोडा अधिक खुलासा आता दिला आहे.

**(१) शब्दब्रह्म**:-अनुभव नसताना होणाऱ्या भ्रमाला शब्दब्रह्म म्हणतात (दा.७.३.११). ब्रह्माचा अनुभव स्वत:ला काही नाही; पण ब्रह्माविषयी काहीतरी वाचलेले अथवा ऐकलेले असते. त्याला धरून नुसत्या शब्दांनी ब्रह्माचे वर्णन केले की, ब्रह्म असे असे आहे. अशा वेळी सांगणारा व ऐकणारा या दोघांचाही घोटाळाच होतो. कारण कुणालाच ब्रह्माचा अनुभव नसल्याने ज्ञान न होता भ्रमच होतो. हे शब्द ब्रह्म.

**(२) मीतिकाक्षर ब्रह्म** - मीतिकाक्षर ब्रह्म म्हणजे एकाक्षर ब्रह्म (दा. ७.३.११). ॐ हे एक अक्षर आहे. तेच ब्रह्म.

**(३) खं ब्रह्म** - ख म्हणजे आकाश. ख ब्रह्म म्हणजे आकाश हे ब्रह्म आहे. हे आकाश महदाकाश असून ते व्यापक आहे (दा. ७.३.१२). घटाकाश, मठाकाश असल्या शब्दांनी सूचित होणारे मर्यादित आकाश येथे अभिप्रेत नाही. तर व्यापून असणारे जे महदाकाश ते येथे अपेक्षित आहे.

**(४) सर्व ब्रह्म** - हे सूक्ष्म आहे. पंचभूतांच्या विश्वपसाऱ्यात जे जे सूक्ष्म तत्त्व दिसून येते ते ते सर्व ब्रह्म आहे. यालाच सर्व ब्रह्म म्हणतात (दा. ७.३.१२-१४). पंचभूतांच्या प्रचंड गुंतागुंतीत असणारे सूक्ष्म तत्त्व म्हणजे सर्व ब्रह्म होय.

**(५) चैतन्य ब्रह्म** - पंचभूतादि मायेला चेतविणारे जे चैतन्य आहे त्याला चैतन्यब्रह्म म्हणतात (दा. ७.३.१४-१५). माया ही पंचभूतादि विश्वोत्पत्तीचा खेळ करते (याचा अधिक खुलासा दा. ८.४ मध्ये पहावा.). पण तो सर्व अचेतनाचा अथवा जडाचा बाजार आहे. जडाला चाळविण्यास काही प्रेरक लागते. अचेतनाला चेतविणारे म्हणजे प्रेरणा देणारे चैतन्य आहे. त्यालाच चैतन्य ब्रह्म म्हटले आहे.

**(६) सत्ताब्रह्म** - चैतन्यावर ज्याची सत्ता आहे ते सत्ताब्रह्म (दा. ७.३.१६). जडाला प्रेरणा मिळाली की ते हलू लागते; पण ही प्रेरणा देणारे काही तरी हवे म्हणजे प्रेरणेवर सत्ता किंवा अधिकार गाजविणारे कोणी तरी लागते. म्हणून चैतन्यावर जे सत्ता अथवा अधिकार गाजविते ते सत्ताब्रह्म होय.

**(७) साक्षब्रह्म** - त्या सत्तेला जे जाणते ते साक्षब्रह्म होय (दा. ७.३.१६). सत्ताब्रह्म चैतन्यावर प्रभुत्व दाखविते किंवा अधिकार चालविते. आता ही सत्ता कुणाला तरी कळली पाहिजे. या सत्तेचे ज्ञान ज्याला होते ते साक्षब्रह्म. साक्ष म्हणजे साक्षी आणि साक्षी म्हणजे जो जाणतो तो (साक्षी म्हणिजे जाणता। दा. २०.४.१६). साक्षित्व म्हणजे वेगळेपणाने राहून अन्य वस्तु पहाणे अथवा जाणून घेणे. चैतन्यावर कुणाची तरी सत्ता आहे; ती सत्ता ज्याला कळते त्याला साक्षब्रह्म म्हटले जाते.

**(८) सगुणब्रह्म** - साक्षत्व हा गुण आहे. हा गुण ज्याच्यापासून/ज्याच्याजवळ आहे ते सगुण ब्रह्म म्हणावे (दा. ७.३.१७). साक्षत्व म्हणजे पहाणे अथवा जाणणे. साक्षत्व हा एक गुणधर्मच आहे. तो गुण ज्यापासून येतो ते सगुणब्रह्म होय.

**(९) निर्गुणब्रह्म** - जेथे कोणतेही गुण उरतच नाहीत ते तत्त्वत: निर्गुणब्रह्म म्हणावे (दा. ७.३.१८). गुण हे येणारे जाणारे असतात. तेव्हा जेथे गुणच नाहीत अशा पदार्थाची तात्त्विकदृष्ट्या संकल्पना करता येते. जेथे गुण नसतात त्याला निर्गुणब्रह्म म्हणतात.

**(१०) वाच्यब्रह्म** - वाचेने जे जे ब्रह्माविषयी बोलता येते त्या बोलण्यावरून कळून येणारे ते वाच्यब्रह्म (दा. ७.३.१८-१९). जरी मुख्य ब्रह्मापर्यंत वाचा पोचत नाही, तरी अनेकदा वाचेने शब्द उच्चारून ब्रह्माचे वर्णन केले जाते. म्हणजे ब्रह्माचे स्वरूप सांगण्यास जी अनेक नावे वा शब्द (पहा. दा.७.२.४५-५१) वापरले जातात त्यांना वाच्यब्रह्म म्हणतात.

**(११) अनुभवब्रह्म** - जे वाचेने सांगता येत नाही; पण अनुभवाला येते ते अनुभवब्रह्म होय (दा.७.३. १९-२०). ब्रह्म हा बोलण्याचा विषय नसून अनुभवण्याचा विषय आहे. प्राय: अनुभव हा शब्दांनी वा वाचेने सांगता येत नाही. म्हणून अनुभवद्वारा कळणारे-अनुभवले जाणारे-ते अनुभवब्रह्म होय.

**(१२) आनंदब्रह्म** - आनंद हा वृत्तीचा गुण आहे. आनंद भोगणारी वृत्ती जेथे

असते ते आनंदब्रह्म (दा. ७.३.२०-२१). ब्रह्माच्या अनुभवाने आनंद होतो. आनंद मनाला होतो; म्हणून आनंद हा मनोवृत्तीचा गुणधर्म आहे म्हणजे आनंदाचा अनुभव ही मनोवृत्तीचीच एक विशिष्ट अवस्था आहे. आनंदाचा अनुभव घेणारी वृत्ती जेथे असते ते आनंदब्रह्म म्हटले जाते.

**(१३) तदाकारब्रह्म** - तदाकारब्रह्म म्हणजे अभेद (दा. ७.३.२१). अभ्यासाने अथवा निदिध्यासाने मनोवृत्ती ब्रह्माकार-तदाकार-होते. (मनाने ब्रह्म जाणावयाचे आहे असे म्हटले जाते:- मनसैवेदमाप्तव्यम् । कठ उपनि. २.१.११). त्याला तदाकारब्रह्म म्हणतात.

**(१४) अनिर्वाच्यब्रह्म** - जेथे संवाद संपतो ते अनिर्वाच्य ब्रह्म होय (दा.७.३.२१). जेथे संवाद संपतो, जेथे वाचा खुंटते, जेथें बोलण्याची सीमा होते, ते अनिर्वाच्य ब्रह्म. ते वाचेने सांगता येत नाही. तेव्हा जेथे वाचा कुंठित होते, जेथून वाचा परत फिरते, ते अनिर्वाच्य ब्रह्म म्हटले जाते.

**चौदा ब्रह्मे अंतिम नाहीत**

ही चौदाही ब्रह्मे म्हणजे खरी शाश्वत ब्रह्मे नव्हेत असे श्रीरामदासस्वामींचे सांगणे आहे. खऱ्या ब्रह्मावर निरनिराळ्या प्रकारांनी या ब्रह्मांचा अध्यारोप केला जातो. म्हणून या अध्यारोपाचा निषेध करावयास हवा. असा निषेध केला की खरेखुरे एकमेवाद्वितीय ब्रह्म कळणार आहे.

शुद्ध, विमल, अंतिम तत्त्व ब्रह्म ठरविण्याची श्रीरामदासांनी वापरलेली कसोटी 'शाश्वतता' ही आहे (दा. ७.२.२३). शाश्वतता म्हणजे कधीही नाश नसणे, सदोदित असतच असणे. शुद्ध अथवा पर ब्रह्म हेच खरेखुरे शाश्वत तत्त्व आहे; अन्य जे काही असेल ते अशाश्वत आहे. माया, पंच भूते इत्यादी सर्व अशाश्वत आहे (दा. ७.२.२३). माया व तिचे कार्य हे सर्व अशाश्वत (म्हणजे सदोदित नसणारे) आहे. केवळ शुद्ध ब्रह्म हे शाश्वत आहे.

आता, या शाश्वततेचा निकष जर चौदा ब्रह्मांना लावला तर असे दिसून येते की चौदा ब्रह्मे शाश्वततेच्या कसोटीला उतरतच नाहीत. म्हणून ही चौदा ब्रह्मे अंतिम तत्त्व होऊच शकत नाहीत,

हे पुढीलप्रमाणे सविस्तर[१३] स्पष्ट करून सांगता येते -

**(१) शब्दब्रह्म** - शब्दब्रह्म हे केवळ शाब्दिक असते. तेथे अनुभवाचा भागच

नसतो. ते मायेच्या कक्षेत पडते. तेथे शाश्वताचा विचारच नसतो. अंतिम तत्त्व ब्रह्म हे शब्दाने सांगता येण्यासारखे नाही; तथापि त्याचे वर्णन शब्दांनी केले. शब्द हे मायिक व्यवहारात मोडतात. माया व मायिक हे दोन्हीही अशाश्वत आहेत. शब्दब्रह्म सांगणारा व ऐकणारा हे दोघेही अशाश्वत मायेच्या घोटाळ्यात अडकून बसलेले असतात. अशाप्रकारे, शब्दब्रह्म हे मायेच्या प्रांतातच पडते, म्हणून शब्दब्रह्म हे शाश्वत होऊ शकत नाही (दा.७-३-२४)

**(२) मीतिकाक्षरब्रह्म** - अंतिम वस्तू ही विनाशी (क्षर) अथवा अविनाशी (अक्षर) यापैकी कोणत्याच प्रकारात पडणारी नाही. क्षर व अक्षर हे शब्द सापेक्ष आहेत. अंतिम तत्त्व हे निरपेक्ष आहे. ते क्षर व अक्षराच्या पलीकडचे आहे. तसेच मातृकाक्षर ही माणसानेच केलेली कल्पना आहे. मानव व त्याची कल्पना हे सगळेच मायेत म्हणजे अशाश्वतात मोडते. म्हणून मीतिकाक्षरब्रह्माच्या बाबतीतही शाश्वताचा विचार येतच नाही ( दा. ७-३-२५).

**(३) खंब्रह्म** - आकाश ब्रह्म आहे असे श्रुतीचे वचन आहे; पण आकाश हे शून्यरूप[१४] आहे. अंतिम तत्त्वाच्या ज्ञानाने शून्याचा निरास होतो. आणि ज्याचा निरास होतो ते कधीच शाश्वत असू शकत नाही. म्हणून खंब्रह्माच्या संदर्भातही शाश्वताचे अधिष्ठान नाही (दा.७-३-२६)

**(४) सर्व ब्रह्म** - जे दिसणारे दृश्य आहे ते सर्व नाशवंत आहे (पहा-यद् दृष्टं तन्नष्टम्). साहजिकच सर्व दृश्याच्या नाशाबरोबर सर्व ब्रह्माचाही नाश अटळ आहे. वेदान्तशास्त्रात सर्वांचा प्रलय ( = विनाश) सांगितलेला आहे. प्रलयास प्रारंभ झाला की पंचमहाभूते आपापल्या कारणात लय पावू लागतात. त्यांचे स्वतंत्र अस्तित्व राहू शकत नाही. आणि पंचभूतेच नष्ट झाल्यावर त्यामध्ये तत्त्वरूपाने असणारे सर्व ब्रह्म असणार तरी कुठे ? म्हणजे पंचभूतांच्या विनाशाबरोबर सर्व ब्रह्माचाही नाश होतो. म्हणजे सर्वब्रह्म हेही शाश्वत नाही. मूळ अंतिम तत्त्व हे निश्चळ, निराकार, निर्विकार आहे, त्याला चंचळपणा लावला जातो. जे मुळात गुणातीत आहे त्याला गुण जोडले जातात. चंचलपणा आणि गुण यांच्यायोगे जी वस्तू आकाराला येते तिला ज्ञानी माणसे शाश्वत ब्रह्म मानीत नाहीत. पंचभूते निर्माण झाली; त्यांपासून सर्व विश्वाची उभारणी झाली. आणि जे जे जन्माला येते ते नाश पावते (पहा:-जातस्य हि ध्रुवो मृत्युः। भगवद्गीता, २-२७) आणि जे अशाप्रकारे नाशवंत आहे ते सर्व ब्रह्म आहे हे कसे काय शक्य होईल ? तेव्हा सर्वब्रह्माच्या अशाश्वतेबद्दल जास्त काय सांगावे ? सर्वब्रह्म

नाशवंत आहे, हे वेगळेपणाने पहाणारा जो द्रष्टा तोही नाशवंतच आहे. मग सर्वब्रह्म पहाणार तरी कोण ? तेव्हा संक्षेपाने सांगायचे झाले तर सर्वब्रह्म हे विनाशी आहे, ते शाश्वत नाही (दा. ७-३-२७-३१)

(५) **चैतन्यब्रह्म** - पंचभूतादि मायेला चेतविणारे, प्रेरणा देणारे चैतन्यब्रह्म आहे. आता ज्या पंचभूतादींना चेतविले जाते ते सर्व मायिक म्हणजे मिथ्या आहे. मग त्यांना प्रेरक असणारे चैतन्यब्रह्म तरी खरे कसे असणार? वांझ स्त्रीचा मुलगा (वंध्यापुत्र) खोटा; मग त्याला पळावयास लावणारा तरी खरा कसा असेल ? तसेच, पंचभूतादि माया शाश्वत नाही. ती नाशवंत आहे. साहजिकच तिला प्रेरणा देणारे चैतन्यब्रह्मही नाशवंत आहे. म्हणजेच चैतन्यब्रह्म हेही शाश्वत नाही. (दा. ७-३-३२).

(६) **सत्ताब्रह्म** - चैतन्यावर सत्ता चालविणारे ते सत्ताब्रह्म; पण सत्तेसाठी (म्हणजे अधिकार व त्याचा वापर यासाठी) श्रेष्ठकनिष्ठभाव आवश्यक असतो. वरिष्ठ हा कनिष्ठावर अधिकार गाजवीत असतो. पण कनिष्ठच नसेल तर सत्ता कुणावर चालणार? नोकरचाकर इत्यादि कनिष्ठ परिवार नसताना सत्तेला काय अर्थ उरतो? कनिष्ठाविना-परिवाराविना-असणारी सत्ता ही खरी सत्ता नव्हे. आता, मूळ अंतिम ब्रह्म हे सर्व भेदांच्या पलीकडचे आहे. तेथे वरिष्ठ, कनिष्ठ, स्वामी-सेवक, मालक-परिवार असला कोणताच भेद नाही. अशा स्थितीत सत्ताब्रह्म म्हणून काय उरेल? केवळ मानवी कल्पना आणि मानवी कल्पना नाशवंत आहे. म्हणजे सत्ताब्रह्म हेही नाशवंतच आहे. ते शाश्वत असूच शकत नाही (दा.७-३-३३)

(७) **साक्षब्रह्म** - साक्षित्व म्हणजे वेगळेपणाने राहून अन्य वस्तू पहाणे अथवा जाणणे. साक्षित्वामध्ये पहाणारा / जाणणारा वेगळा असतो व जे पाहिले / जाणले जाते ते वेगळे असते; पण आता जर पहावयाचे पदार्थच नसतील तर तेथे साक्षित्व कसे असणार? जे पदार्थ दृश्य आहेत असे मानले जाते ते मिथ्या असतात; म्हणून साक्षत्वही मिथ्याच ठरते. म्हणजे साक्ष ब्रह्म हे खरे[१५] नसून मिथ्या आहे. जे मिथ्या आहे ते शाश्वत कसे असेल? (दा.७-३-३३)

८) **सगुणब्रह्म** - जे गुणांनी युक्त (सगुण) असते ते नाशवंत असते, हे प्रत्यक्षपणे दिसते व कळते. ते सिद्ध करावयास अन्य प्रमाणांची जरुरीच नाही. आता, जर सगुण ब्रह्माजवळ अनेक गुण आहेत, तर ते निश्चितपणाने नाशवंतच आहे यात शंका नाही (दा.७-३-३४).

(९) **निर्गुणब्रह्म** - निर्गुण हा जो शब्द आहे तोच मुळात शक्य नाही. मायात्मक

व्यवहारात गुणांची भाषा असते. जर एकादा पदार्थ गुणरहित असेल तर तेथे शब्द तोकडे पडतात. निर्गुण हा एक शब्द आहे. त्याने कोणतीच वस्तू दाखविली जाऊ शकणार नाही. गुणरहित वस्तूला नाव (शब्द) देता येत नाही; मग तिचे वर्णन कोणत्या शब्दांनी करणार ? सर्व शहाणी माणसे म्हणतात की माया ही मृगजळासारखी आहे. मायाजनित दृश्य विश्व हेही मृगजळासारखे कधीच उत्पन्न झालेले नाही. तथाकथित मायेचे कार्य म्हणजे कधीच निर्माण न झालेले असे केवळ कल्पनेचे आभाळ (=मळभट) आहे; ते नाहीच आहे. जर गावच नसेल, तर गावाची सीमा (हद्द) कशी दाखविता येईल? 'जन्म झाला' या शब्द प्रयोगाअंती 'जीवात्मा' ही कल्पना येते. म्हणजेच दृश्य विश्व आणि जीव या केवळ कल्पना आहेत. अशाप्रकारे, गुणयुक्त विश्व हे मृगजळासारखे आहे. ते खऱ्या अर्थाने कधीच अस्तित्वात नसते. साहजिकच गुणांच्या पलीकडे असणारे निर्गुणब्रह्म हेही मृगजळाप्रमाणे काल्पनिकच आहे. सगुणब्रह्म ही मुळातच कल्पना आहे. निगुर्णब्रह्म हीही गुणसापेक्ष कल्पनाच आहे. हे विश्व द्वैतात्मक आहे. त्या द्वैताच्या व्यवहारामध्ये आपण ज्या काही कल्पना करीत असतो, त्यांचीच उपमा आपण अद्वैत अशा ब्रह्म वस्तूला देतो; पण त्यामुळे ती श्रेष्ठ अद्वैत वस्तू आपल्या कल्पनेप्रमाणे होते वा असते असे मात्र मुळीच नाही. माया नसल्यास सत्ता कसली ?

पदार्थ नसताना जाणतेपण कुणास येईल? अविद्याच जर नसेल तर चैतन्य कुणाचे? म्हणजे माया, पदार्थ व अविद्या हे सर्व खरे मानले तरच सत्ता, जाणता (जाणणारा) व चैतन्यता या शब्दांना अर्थ रहातो; नाही तर ते निरर्थकच आहेत. खरे म्हणजे सत्ता, जाणता किंवा साक्षी आणि चैतन्यता या केवळ कल्पनाच आहेत व त्या माया, दृश्य पदार्थ आणि अविद्या या अन्य कल्पनांतून उद्भूत झालेल्या आहेत. तसेच सत्ता, साक्षी आणि चैतन्यता[१६] या तीनही गोष्टी गुणांच्या क्षेत्रातच मोडणाऱ्या आहेत. जे अंतिम तत्त्व खरेखुरे गुणरहित (निर्गुण) आहे, त्याला गुण कसे जोडता येतील ? आता जे अंतिम तत्त्व वस्तुत: गुणरहित आहे, त्याला निर्गुण शब्द लावणे म्हणजे निर्गुण या शब्दाच्या खुणेने-संकेताने-त्याचा बोध करून देणे आहे. पण निर्गुण हा शब्द, तसेच त्याने दाखविलेला संकेत हे दोन्हीही अशाश्वतच आहेत; कारण (मागे पाहिल्याप्रमाणे) शब्द हा मायिक व्यवहारात मोडतो. मायिक व्यवहार नाशवंत आहे. म्हणून शब्द व त्याचा संकेत हे दोन्हीही शाश्वत नाहीत. अशा प्रकारे निर्गुण ब्रह्म हेही शाश्वत रहात नाही (दा. ७.३.३५-४०).

**(१०) वाच्यब्रह्म** - गुणरहित निर्गुण ब्रह्माला खुणेने ओळखण्यासाठी अनेक नावे ठेवलेली आहेत, म्हणजे ब्रह्माला उद्देशून अनेक शब्द वापरलेले आहेत (या नावांसाठी पहा दा. ७.२.४५-५१), त्यांनाच वाच्यब्रह्म म्हणतात. पण ही सगळी नावे नाशवंत आहेत. म्हणून वाच्यब्रह्म हेही अशाश्वतच आहे (दा.७.३.४१).

**(११) अनुभवब्रह्म, आणि (१२) आनंदब्रह्म** - अनुभव काय अथवा आनंद काय, ते दोन्हीही माणसाच्या मनाच्या वृत्तीचेच भाव आहेत. अनुभव/आनंद घेताना, 'मी अनुभव/आनंद घेत आहे' अशी मनाची वृत्ती असते आणि या वृत्तीमध्ये अनुभव/आनंद घेणारा मी, ज्याचा अनुभव/आनंद येतो तो पदार्थ आणि प्रत्यक्ष अनुभव / आनंद हे तीन घटक वृत्तीमध्ये असतातच. म्हणजेच अनुभवब्रह्म आणि आनंदब्रह्म हे दोन्हींही मनोवृत्तीचे व्यापार असतात. आता मनोवृत्ती या येणाऱ्या व जाणाऱ्या म्हणजेच नाशवंत आहेत. त्यामुळे अनुभवब्रह्म आणि आनंदब्रह्म हे दोघेही नाशवंत ठरतात, म्हणजेच अनुभवब्रह्म आणि आनंदब्रह्म हे शाश्वत नाहीत (दा. ७.३.४२).

**१३) तदाकारब्रह्म** -जर वृत्ती ब्रह्माशी एकरूप तदाकार झाली तर तेथे वृत्तीला स्वतंत्र अस्तित्व रहात नाही. पण प्रारब्धकर्मानुसार देहपात होईपर्यंत नवीन नवीन वृत्तींचा उदय होत रहाणारच. म्हणजे असे :- जरी निदिध्यासाने वृत्तीला तदाकार (ब्रह्माकार) होण्याची सवय लागली, तरी ती काही काळापर्यंत तशी रहाते; परंतु ती पुन: बदलते आणि नवीन वेगळीच वृत्ती अस्तित्वात येते. याप्रमाणे मनोवृत्तीवर अवलंबून असणारे तदाकारब्रह्म हेही बदलणारे, नाशवंत ठरते; म्हणून तदाकारब्रह्म हे सुद्धा शाश्वत नाही (दा.७.३.४२)

**(१४) अनिर्वाच्यब्रह्म** - ब्रह्माला जेव्हा अनिर्वाच्य म्हटले जाते, तेव्हा वृत्तीच्या अनुरोधाने (गुणामुळे) खूण म्हणून अनिर्वाच्य शब्द वापरला जातो. प्राय: माणसाचे ज्ञान वृत्तीच्या स्वरूपात असते आणि ते शब्दांच्या द्वारा कमीजास्त प्रमाणात व्यक्तही करता येते, म्हणजेच ते वाच्य असते. परंतु वृत्ती जेव्हा ब्रह्माशी तदाकार होते, तेव्हा वृत्ती म्हणून काही रहातच नाही. आता जेथे वृत्ती नाही, तेथे वाच्यता नाही, आणि जे वाच्य नाही ते अनिर्वाच्य होय. याचाच अर्थ असा की अनिर्वाच्य हा शब्द वृत्तीच्या संदर्भातच वापरला जात आहे. वृत्तीच्या अपेक्षेने वृत्तीची निवृत्ती आहे. आणि वृत्तीची निवृत्ती झाली की वृत्तीअंती येणारा संकेत निरर्थक ठरतो. अशाप्रकारे अनिर्वाच्यब्रह्म हेही शाश्वत ठरत नाही (दा. ७.३.४३).

**निरुपाधिक उन्मनी म्हणजे अंतिम सद्वस्तू** - अशाप्रकारे चौदा ब्रह्मे ही सर्व शाश्वत

नसल्याने, ती अंतिम तत्त्व होऊच शकत नाहीत. मग प्रश्न असा :- अंतिम आहे तरी काय? आणि ते माणसाला समजून येते काय?

पहिल्या प्रश्नाचे उत्तर म्हणून श्रीरामदासस्वामी सांगतात :- मन हे चंचल आहे. ते वृत्तिमय आहे. या वृत्ती जर संपल्या तर मनाचाच लय होतो. या स्थितीला निवृत्ती म्हणतात. ही स्थिती शब्दातीत असल्याने ती शब्दांनी सांगता येण्यासारखी नसते; ती अनिर्वाच्य असते. ही निवृत्ती मनाच्या पलीकडची अवस्था असल्याने तिलाच उन्मनी म्हणतात. ही उन्मनी निरुपाधिक आहे म्हणजे तिला कोणतेही बंधन नाही, मर्यादा नाही. द्वैतात्मक विश्वाचे भेद, परिच्छिन्नपणा, स्थळकाळाच्या मर्यादा इत्यादींपैकी काहीही तेथे नसते. ही उन्मनी अवस्था म्हणजे योग्यांची विश्रांती आहे (दा.७.३.४४). ही निरुपाधिक उन्मनी म्हणजे उपाधिरहित अंतिम सद्‌वस्तू आहे. आणि ही निरुपाधिक वस्तू आपण स्वत: होऊन जाणे म्हणजेच सहज समाधी होय. ही सहज समाधी साध्य झाली की माणसाच्या मागे लागलेली संसाराची आधि-व्याधी तुटून जाते (७.३.४५). अशाप्रकारे सर्व उपाधींचा अंत झाल्यावर जे उरते ते शाश्वतब्रह्म आहे. हाच वेदान्तशास्त्राचा अंतिम सिद्‌धांत आहे. पूर्वपक्षाचे निरसन करून सिद्ध होणारे तत्त्व म्हणजे आत्मा अथवा ब्रह्म आहे. संक्षेपाने सांगायचे झाल्यास,सर्व उपाधिशून्य असणारे शाश्वत ब्रह्म हेच अंतिम सत्तत्त्व आहे (दा.७.३.४६).

**एका शंकेचे समाधान**

चौदा ब्रह्मांत निर्गुण ब्रह्माचा अंतर्भाव करून रामदासस्वामी त्याचा निषेध करतात. अशा स्थितीत या निरुपाधिक ब्रह्माच्या संदर्भात[१७] अन्य ठिकाणी या दासबोधात त्यांनी निर्गुण शब्द कसा वापरला आहे? याला संक्षिप्त उत्तर असे :- चौदा ब्रह्मांत आलेले निर्गुण ब्रह्म हे सगुण ब्रह्माच्या अपेक्षेने अभिप्रेत असणारे होते. तथापि अद्वैत-वेदान्ताच्या परंपरेत निरुपाधिक अंतिम सत्तत्त्वाला निर्गुण ब्रह्म म्हणण्याची प्रथा आहे. त्या प्रथेला अनुसरून त्यांनी इतरत्र निर्गुण ब्रह्म म्हटले आहे. तसेच ब्रह्म हे गुणातीत आहे. आणि ते निरपेक्षपणे गुणातीत आहे हे सांगण्यास त्यांनी निर्गुण ब्रह्म म्हटले आहे.

**निरुपाधिकाचे वर्णन-** चौदा ब्रह्मांच्या निरासानंतर उरते ते केवळ, शुद्ध, निरुपाधिक, विमल, निर्विकल्प ब्रह्म. आता प्रश्न असा की, या ब्रह्माचे वर्णन करता येईल काय? रामदास्वामी सांगतात: - वस्तुत: ब्रह्म हे नामातीत आहे (७.२.८.४५,२२). तरी या ब्रह्माला अनंत नावे देता येतात (दा.७.२.८). उदा:-निर्मळ, निश्चळ, अरूप, अलक्ष,

अगोचर, अच्युत, अनंत, सर्वेश्वर, सर्वज्ञ, सर्वात्मा, जगज्जीवन, शाश्वत, शब्दातीत, विमल वस्तू, आत्मा, परमात्मा,[१८] परमेश्वर इ. (पहा- दा.७.२.४५,५१). अशी असंख्य नावे जरी ब्रह्माला देता आली तरी ते नामातीत आहे (दा. ७.२.४५,५२) हे कधीही विसरता कामा नये. ही अगणित नावे वापरण्याचा उद्देश केवळ इतकाच आहे की, ब्रह्माचे स्वरूप थोडेफार हा होईना लक्षात यावे (त्याचा करावा निश्चितार्थ । ठेविली नामे । (दा. ७.२.५२)). ही भूमिका पत्करून ब्रह्माचे वर्णन केले जाते. तसे श्रीरामदासस्वामींनी केले आहे.

(अ) चौदा ब्रह्मांचा निरास करण्यापूर्वी समर्थांनी सांगितलेले ब्रह्माचे स्वरूप असे आहे :- ब्रह्म हे निर्गुण,[१९] नि:संग, निराकार,[२०] निर्विकार आहे; त्याला पारावार नाही. ब्रह्म हे सर्वव्यापक, अनेकात[२१] एक, व शाश्वत आहे. ते अच्युत,[२२] अनंत,[२३] सदोदित सत् आणि कल्पनेरहित म्हणजेच निर्विकल्प[२४] आहे. ब्रह्म हे दृश्यापेक्षा[२५] भिन्न आहे; शून्यापेक्षा निराळे आहे व इंद्रियांना अगम्य आहे (दा.७.२.१-४). ब्रह्म हे सूक्ष्म असून ते ब्रह्म देवादिकांना अगोचर आहे (दा. ७.२.६). ब्रह्माला हेतुदृष्टांत देता येत नाही (दा. ७.२.८). ब्रह्मासारखे दुसरे काही नाहीच (दा. ७.२.९). ब्रह्मापर्यंत वाचा जात नाही; मनाला ब्रह्मप्राप्ती नाही (दा. ७.२.१०). ब्रह्म एक आहे; त्याच्या जोडीला दुसरे काही नाही (दा. ७.२.३०)

(आ) चौदा ब्रह्मांच्या निरासानंतर रामदासस्वामींनी या निरुपाधिक ब्रह्माचे सविस्तर वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे:- ब्रह्म हे आकाशापेक्षा निर्मळ आहे. ते आकाशासारखे पोकळ[२६] आहे. ते रूपरहित असून अमर्यादपणे विशाल आहे. एकवीस स्वर्ग व सात पाताळे मिळून एक ब्रह्मगोल होतो; अशा अनंत ब्रह्मगोलांना ते विमल ब्रह्म व्यापून आहे. अनंत ब्रह्माडांच्या वर आणि खाली ब्रह्म आहेच. किंबहुना जेथे ब्रह्म नाही अशी मोकळी जागाच कुठे सापडणार नाही. जळी, स्थळी, काष्ठी, पाषाणी ब्रह्म आहे. ज्यात ब्रह्म नाही असा एकही प्राणी नाही. जलचर प्राण्यांना पाणी हे आतबाहेर व्यापून टाकते, त्याप्रमाणे ब्रह्म सर्व जीवांना आतबाहेर[२७] व्यापून आहे. व्यापकतेच्या बाबतीत पाण्याची उपमा ब्रह्माला पूर्णपणे लागत नाही. कारण पाणी सर्वव्यापक नाही. पाणी नसणारे स्थळ असते. पण ब्रह्मापलीकडे कुणालाच जाता येत नाही. समजा, आकाशाच्या बाहेर आपण निघालो तर पुढे आकाशच असते, त्याप्रमाणे अनंत ब्रह्माला कुठेच अंत नाही. ब्रह्म हे अखंड आपणास भेटलेले आहे, आपल्याजवळच आहे, अगदी आपल्या सर्वांगाला चिकटलेले आहे; पण ब्रह्म इतके निकट असूनही ते सर्वांपासून चोरले गेले

आहे, म्हणजे माणसांना प्राय: या संनिध ब्रह्माची जाणीव होत नाही (दा. ७.४.१-८).

आपण सर्वजण त्या ब्रह्मामध्येच आहोत; परंतु आपणास त्याचे ज्ञान होत नाही. ज्ञान होते ते फक्त सभोवतालच्या दृश्य विश्वाचे; पण हे दृश्य म्हणजे भास आहे. दृश्य कळते; पण ज्यावर हा विश्वदृश्याचा आभास होतो ते ब्रह्म मात्र समजून येत नाही. दृश्य विश्व खोटे आहे[२८]; आहे ते केवळ ब्रह्मच आहे. उदाहरण घेऊन स्पष्ट करायचे झाल्यास:- आकाशात मळभट (ढग, आभाळ) येते, त्यामुळे आकाश मलिन झाले असे वाटते; पण ते खोटे असते. मळभट आकाशाला चिकटत नाही. त्यामुळे आभाळामुळे वाटणारा आकाशाचा मलिनपणा हा मिथ्या आहे. आकाश आहे तसेच निर्मळ आहे. तसेच आकाशाकडे सतत टक लावून पाहिले तर डोळ्याला प्रकाशाची चक्रे दिसू लागतात; पण ती काही खरी नसतात. याचप्रमाणे ज्ञानी माणसाला सर्वत्र ब्रह्म दिसते. (अज्ञानी माणसाच्या प्रत्ययाला येणारे) हे दृश्य विश्व ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीने मिथ्याच असते. आता दृश्य हे जरी मिथ्या म्हटले तरी ते इंद्रियांना दिसते; पण याचा अर्थ ते खरे आहे असा मात्र नाही. जसे निद्रित माणसाला स्वप्न सत्य वाटते; पण तो जागा झाला की स्वप्न आणि स्वप्नातील दृश्य खोटे होते, हे त्यास आपोआप समजून येते. तसे जो स्वस्वरूपाचा अनुभव घेतो म्हणजे ज्याच्या ठिकाणी ज्ञानाची जागृती येते, त्याला ब्रह्म कळून येते आणि हे दृश्य मायिक आहे, खोटे आहे, हे त्याला कळून येते (दा.७.४.९-१३).

वरील वर्णन सोपे करून सांगण्याचा प्रयत्न करीन असे म्हणून (दा.७.४.१४) रामदासस्वामी सांगतात:-

**विश्वांतर्गत विश्वातीत ब्रह्म -** ब्रह्म हे ब्रह्मांडात कालवलेले अथवा मिसळलेले आहे. ते सर्व पदार्थांना व्यापून उरले आहे. ब्रह्म हे सर्वांना केवळ अंशाने व्यापून आहे; ते आणि किती तरी उरलेले आहे. ब्रह्मावर-ब्रह्मामध्ये-विश्वाचा आभास होतो म्हणजेच ब्रह्माच्या उदरात ब्रह्मांड आहे. तसेच, विश्वातील प्रत्येक पदार्थात ब्रह्म आहेच. ब्रह्माचा अनुभव घेतला की विश्वरूपाने ब्रह्माचा अगदी छोटासा अंशच भासरूपाने दिसतो हे कळून येते. विश्वात अंशमात्राने व्यापून असणारे ब्रह्म विश्वाबाहेर किती अमर्यादपणे पसरले आहे, याची मोजदाद कोण करू शकेल? अपरंपार अनंत ब्रह्म हे पूर्णपणे ब्रह्मांडात मावून संपून जाईल ही गोष्ट शक्यच नाही. ब्रह्म हे विश्वांतर्गत तसेच अनंतपणे

विश्वातीत आहे. देवाचे चरणतीर्थ ठेवण्याच्या लहानशा चंबूत (अमृती) सर्व आकाश साठविण्याचा खटाटोप फुकटच जाणार. त्या चंबूत आकाशाचा अंश आहे हेच म्हणणे योग्य ठरते. त्याप्रमाणे विश्वात ब्रह्म साठविण्याचा प्रयत्न व्यर्थच जातो; म्हणून विश्वात ब्रह्माचा केवळ अंश आहे असेच म्हणावे लागते (दा.७.४.१५-१८).

**निश्चळ, निःसंग ब्रह्म** - ब्रह्म जरी दृश्य पदार्थात कालविलेले आहे तरी ते दृश्य पदार्थांप्रमाणे चंचल[२९], अस्थिर नाही. पदार्थ चंचल झाले तरी ब्रह्म हे न हलणारे, अखंडपणे, निश्चल आहे. सर्वांमध्ये ब्रह्म इतके दृढपणाने साचलेले आहे की ते हलतच नाही. पंचभूतांत ब्रह्म मिसळलेले आहे.पण ते त्यांना चिकटलेले नाही. ते पंचभूतांच्या पलीकडे आहे. चिखलात आकाश दिसते. पण चिखलाला न चिकटता ते अलिप्त असते. त्याप्रमाणे पंचभूतात्मक दृश्य वस्तूंमध्ये असूनही ब्रह्म अलिप्त असते (दा. ७.४.१९-२०).

**ब्रह्मासाठी दृष्टांत** - अज्ञात वस्तूची कल्पना देण्यास दृष्टांत वापरला जातो; पण ब्रह्मस्वरूप सांगण्यास कोणताच दृष्टांत व्यवस्थितपणे उपयोगी पडत नाही. तथापि ब्रह्म कसे आहे याची थोडीफार कल्पना देण्यासाठी या जगातील दृष्टांत द्यावा लागतो; त्यासाठी वाङ्मयाची मदत घ्यावी लागते. त्या दृष्टीने विचार केल्यास, आकाशाचा[३०] दृष्टांत देऊनच ब्रह्मस्वरूप सांगण्याचा प्रयत्न करता येतो. 'खं ब्रह्म' असे श्रुति सांगते तर 'गगनसदृशं ब्रह्म' असे स्मृति म्हणते. म्हणूनही ब्रह्माचे स्वरूप सांगताना आकाशाचाच दृष्टांत घ्यावा लागतो. पितळेत जर काळिमा येण्याचा गुणधर्म नसेल तर ते केवळ सोनेच आहे. त्याप्रमाणे आकाशात शून्यत्व हा गुण नसता तर आकाश म्हणजेच ब्रह्म असे म्हणता आले असते; कारण सूक्ष्मता, विशालता इत्यादी बाबतीत ब्रह्म आणि आकाश समानच आहेत (दा. ७.४.२१-२३).

ब्रह्म हे आकाशाप्रमाणे आहे. आकाशातील वायूप्रमाणे माया आहे. आता वायू आहे असे जाणवते पण प्रत्यक्ष मात्र त्याचे दर्शन होत नाही. बरोबर याचप्रमाणे माया म्हणून प्रत्यक्ष काही दिसत नाही; पण तिचा प्रभाव मात्र दिसून येतो. जगात माणसे शब्द उचारतात. त्या शब्दांच्या सृष्टीची रचना प्रत्येक क्षणाला नवीनवी होत रहाते. पुढे उच्चारलेले शब्द विरून जातात. म्हणजेच शब्दसृष्टी शाश्वत नसते. ज्याप्रमाणे वायूला स्थिरता नसते, त्याप्रमाणे शब्दसृष्टीला स्थिरता नसते. अशा प्रकारे माया ही अस्थिर आणि अशाश्वत (माईक) आहे. केवळ ब्रह्म मात्र शाश्वत आहे. आणि नीट पाहू लागले की कळून येते :- एकच ब्रह्म अनेकाला व्यापून आहे (दा. ७.४.२४-२६).

**ब्रह्माचे सूक्ष्मत्व** - ब्रह्म सर्वाला सूक्ष्मपणे व्यापून आहे. जड पृथ्वीला भेदून/व्यापून तिच्यात रहाणारे ब्रह्म हे पृथ्वीप्रमाणे जड मात्र नाही. ब्रह्म हे सूक्ष्म आहे. त्याच्या सूक्ष्मत्वाला (मृदत्व) दुसरी कोणतीच उपमा शोभत नाही. पृथ्वीपेक्षा पाणी सूक्ष्म आहे. पाण्यापेक्षा तेज (अनळ) सूक्ष्म आहे. तेजापेक्षा वायू सूक्ष्म (कोमल) आहे असे जाणावे. वायूपेक्षा आकाश हे तर अत्यंतच सूक्ष्म असते. आणि आकाशापेक्षा ब्रह्म हे संपूर्णपणे सूक्ष्म आहे. (इंद्राचे) वज्र कठिण मानले जाते. त्या वज्रालाही ब्रह्म भेदून जाते. पण त्यामुळे ब्रह्माचे सूक्ष्मपण अजिबात जात नाही. खरे सांगायचे झाल्यास ब्रह्माला उपमाच देता येत नाही. कारण ब्रह्म हे जडही नाही व सूक्ष्मही नाही. ते सर्वत्र साचलेले अथवा गच्च भरलेले मात्र आहे (दा. ७.४.२७-३०).

**अविनाशी ब्रह्म** - ब्रह्म हे सर्वव्यापक आहे. पण सर्वांबरोबर त्याचा नाश मात्र होत नाही. ब्रह्म हे अविनाशी[३१] आहे. ब्रह्म पृथ्वीला व्यापून आहे. पृथ्वीला नाश आहे; पण ब्रह्माला नाश नाही. ब्रह्म पाण्याला व्यापून आहे. पाणी शोषले जाते (= नष्ट होते); पण ब्रह्म मात्र शोषले जात नाही. तेजात ब्रह्म आहे; पण ते तेजाने जळून जात नाही. वायूमध्ये ब्रह्म आहे; पण ते वायूप्रमाणे चळत मात्र नाही. आकाशात ब्रह्म आहे; पण ते परब्रह्म तसे असूनही आपल्याला उमगत मात्र नाही (दा. ७.४.३१-३२)

**सर्व व्यवहार ब्रह्मामध्ये** - अवघे शरीर ब्रह्माने व्यापरलेले आहे; पण ते तसे आहे हे मात्र आपणास कळून येत नाही. नवल असे की, ब्रह्म इतक्या जवळ असूनही ते आपल्याला दुरावलेले आहे. चहूकडे पाहिले तरी ब्रह्म[३२] समोर (सन्मुख) आहे. आपले व आपल्या इंद्रियांचे सर्व व्यवहार ब्रह्मामध्येच घडतात. ब्रह्म हे आपल्या आत व बाहेर साक्षात् असून ते स्वत:सिद्ध आहे. त्या ब्रह्मामध्येच आपण जगतो व रहातो; आपल्या आतबाहेर ते ब्रह्मच आहे. सर्व दृश्य अदृश्य झाल्यावर जसे केवळ आकाश शिल्लक रहाते, तसे ते ब्रह्म आहे. जेथे काही नाही असे आपल्याला वाटते तेथेही ते ब्रह्म कोंदाटलेले असतेच. आपणच ठेवलेले धन काही काळानंतर काही कारणाने आपल्यालाच दिसत नाही, तसे ब्रह्माच्या बाबतीत होते (म्हणजे असे:- दृश्यपणाने असणे म्हणजे खरे असणे असे आपल्याला वाटते; पण ते बरोबर नाही. सूक्ष्मपणाने असणे हेच खरे असणे आहे. ब्रह्म तसे आहे). जेव्हा जेव्हा आपण एकादा पदार्थ दृष्टीने पहातो तेव्हा तेव्हा त्या पदार्थांच्या अलीकडे (म्हणजे तो पदार्थ दिसण्यापूर्वी तो पदार्थ व आपण यामध्ये) ब्रह्म असते. ही गोष्ट स्थूल दृष्टीला मात्र कळत नाही. म्हणून ब्रह्माचे हे कोडे स्वरूपाच्या[३३] अनुभवाने उकलून घ्यावयाचे आहे. स्वरूपानुभव

आला की सर्वत्र ब्रह्मच कसे आहे हे प्रचीतीला येते (दा. ७.४.३३-३७)

**सदोदित ब्रह्मच आहे** - सर्व पदार्थांच्या मागे-पुढे आकाश आहे. पदार्थ नसले तरी अवकाश उरतोच. पृथ्वी नाहीशी झाली तर सर्वत्र ओसाड पोकळी (भकास) दिसेल. म्हणजेच पदार्थ असताना काय किंवा नसताना काय अवकाशाची पोकळी असतेच असते. त्याप्रमाणेच ब्रह्माचे आहे. हे दृश्य विश्व आले आणि गेले तरी ब्रह्म आहे तसेच रहाते; त्यात कणभरही फरक पडत नाही. विश्व हे नामरूपात्मक आहे; तेथे दिसणाऱ्या प्रत्येक पदार्थाला काही तरी आकार (रूप) आहे व नावही आहे. पण हा नामरूपाचा पसारा म्हणजे मुळात नसणारा भ्रम (नाथिला भ्रम) आहे. नाम आणि रूप यांच्या अतीत असणारे ब्रह्माचे खरे स्वरूप अनुभवी पुरुषांना मात्र कळते. आकाशात धुराचे प्रचंड डोंगर दिसतात, पण ते तात्पुरतेच असतात. आकाशास त्यांचा स्पर्शही होत नाही. त्यांच्यापलीकडेच आकाश असते. त्याचप्रमाणे मायादेवी ब्रह्मामध्ये विश्वाचे अवडंबर दाखविते (दा.७.४.३८-४०). पण हे दृश्य विश्व कधी असते तर कधी नसते; शाश्वत ब्रह्म मात्र सदोदित असते.

**शरीरात ब्रह्म** - माया अशाश्वत आहे तर ब्रह्म शाश्वत आहे. ते सर्व ठिकाणी सदोदित भरून राहिलेले आहे. पोथी अगर ग्रंथ वाचताना ब्रह्मच पोथी पाहून वाचत असते. ग्रंथातील अक्षरांमध्ये ब्रह्मच आहे. सूक्ष्मपणे डोळ्यांत राहून तेच पहात असते. कानाने शब्द ऐकत असताना, आतबाहेर ब्रह्मच असते. मनाने विचार चालू असताना मनाच्या आतबाहेर खरोखर ते परमब्रह्मच असते. पायांनी मार्गक्रमण करीत असताना ब्रह्मच सर्व शरीरभर व्यापून असते. हातांनी एखादी वस्तू घेताना, त्या वस्तूला व्यापून ब्रह्मच येते. सर्व इंद्रियांना आतबाहेर ब्रह्मच व्यापून आहे; ब्रह्मामध्येच सर्व इंद्रिये आपापली कार्ये करतात. पण जर इंद्रियांनी ब्रह्म जाणण्याचा प्रयत्न केला तर ते ब्रह्म जाणून घेण्याची इंद्रियांची हाव (इच्छा) मोडून जाते. कारण ब्रह्म हे इंद्रियगम्य नाही (दा. ७.४.४१-४५).

असे हे शाश्वत ब्रह्म आहे. तेथे सर्व कल्पनांचा अंत होतो. योगीजनांचा तो एकांत आहे. असे हे ब्रह्म केवल, शुद्ध, विमल, शाश्वत, अंतिम तत्त्व आहे (दा.७-४-५२).

येथेच एक गोष्ट आपण पुन:पुन: लक्षात ठेवली पाहिजे. शब्दांनी ब्रह्माचे कितीही वर्णन केले तरी त्यापेक्षा हे वेगळेच रहाते (दा. ७-२.७). या वर्णनाने फारतर ब्रह्माची थोडीफार कल्पना येते इतकाच या वर्णनाचा उपयोग आहे. ब्रह्माचा अनुभव हेच खरे ब्रह्माचे ज्ञान. म्हणून या ब्रह्माचा अनुभव घ्यावयास हवा (दा.७-४-५२).

**ब्रह्मसाक्षात्कार** - एक गोष्ट आपण पुन:पुन: ध्यानात ठेवली पाहिजे की, ब्रह्म हे

ब्रह्म होणे आहे (वस्तु आपणचि होणे । ऐसे वस्तूचे पाहाणे ।। दा. ८-१०-७३). वस्तुरूप होऊन वस्तूचा अनुभव घ्यावयाचा आहे. ब्रह्म होऊन ब्रह्मानुभव घ्यावयाचा आहे (वस्तुरूप होऊनि पाहे । स्वानुभवे ।। दा.८-१०-७४). ब्रह्मसाक्षात्कारी असणारे सद्‌गुरू हे ब्रह्मस्वरूप सांगून, त्याचा अनुभव घेण्याचा मार्ग दाखवितात. त्या मार्गाने जाऊनच ब्रह्मानुभव येतो (दा.७-३-५२).

वर पाहिल्याप्रमाणे हे जे शाश्वत ब्रह्म आहे तेथे मायेचा भ्रम नाही. मायाच नसल्याने तेथे दृश्य, द्वैत[३५] अज्ञान, कल्पना, वृत्ती, इत्यादि काहीही नाही. आणि या गोष्टीचे वर्णन-परब्रह्माचे सत्य स्वरूप-अनुभवी माणसाला स्वत:च्या अनुभवाने कळून येणारे आहे (दा.७-३-४७).

ब्रह्म हे अगदी आपल्याजवळ आहे; पण ते आपल्या स्थूल दृष्टीला दिसत नाही. ते दिसत नाही म्हणून ते नाही असे मात्र नाही. ब्रह्म एकमेव सत् आहे. त्याच्या असणेपणात फरक पडत नाही (दा. ७-४-४६). ब्रह्माचा अनुभव आपणास येत नाही याचे कारण आपली कल्पनाच आहे. 'मी ब्रह्माखेरीज कोणी तरी वेगळा आहे,' 'मी देह आहे' इत्यादि नाना कल्पना माणूस करतो. त्या कल्पनांमुळे आपणच ब्रह्म आहोत हा अनुभव येत नाही. तेव्हा स्वस्वरूपाच्या अनुभवाने कल्पनेचा बीमोड करावयास हवा. कल्पना नष्ट झाली की सर्वत्र ब्रह्मानुभवाचे पीकच पिकते (दा. ७.३.४८).

कल्पना मोडण्यास उपाधिरहित निर्विकल्प ब्रह्माची कल्पना करावी. आपणच निरुपाधिक ब्रह्म आहोत या कल्पनेचे निदिध्यासन घडले की कल्पना आपोआप नष्ट होते (दा.७.३.४९). या कल्पनेची एक गोष्ट चांगली आहे:- ज्याच्याकडे कल्पनेचे तोंड करावे त्याच्याशी ती तादात्म्य पावते. तेव्हा स्वस्वरूपाकडे कल्पनेचा मोहरा (तोंड) वळविला की ती निर्विकल्प स्वरूपात विरून जाते, ती निर्विकल्प ब्रह्मात तद्रूप होते. म्हणजे निर्विकल्प ब्रह्माची कल्पना सुरू केली की कल्पनाच शिल्लक रहात नाही. नि:संगाची भेट घेण्यास जाणारा स्वत:च नि:संग होतो. त्याप्रमाणे निर्विकल्प आत्म्याची / ब्रह्माची कल्पना करू लागले की कल्पनाच[३६] निर्विकल्प होते (दा.७.३.५०-५१).

**उन्मनी** - ब्रह्माचा अनुभव येण्यासाठी प्रथम सृष्टीचा अभाव व्हावयास हवा. म्हणजे दृश्य विश्वाचे भान[३७] सुटावयास हवे. मग स्वत:च्या अनुभवाने जीव ब्रह्मरूप होतो. ज्ञानदृष्टीने सूक्ष्म गोष्टी कळतात; इंद्रियांनी स्थूल गोष्टी कळतात. म्हणून ज्ञानदृष्टीने जाणता येणारे ब्रह्म

हे इंद्रियगम्य नाही. अंतरात वृत्ती अत्यंत अत्यंत सूक्ष्म होणे ही ज्ञानदृष्टीची खूण आहे. आणि आपली वृत्ती सूक्ष्म झाली आहे की नाही याला अंतरवृत्तीच प्रमाण आहे; ते आपले आपल्याला आतल्या आत कळून येणारे आहे (दा. ७.४.४७-४८).

माणसाचे जीवन जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन अवस्थांतून जात असते व त्यातच ते घोटाळत असते. या तीनही अवस्था अज्ञानातच मोडतात. चौथी तुर्या ही अवस्था ज्ञानाची आहे. या तुर्या अवस्थेमध्ये एकीकडे ब्रह्माचे ज्ञान असते तर दुसरीकडे मायेचे - दृश्य विश्वाचे - भान असते. या ज्ञानावस्थेत देहासकट सर्व दृश्य विश्वाला वेगळेपणाने पहाता येते; तसेच या अवस्थेत ब्रह्माचेही ज्ञान असते. म्हणून या तुर्या अवस्थेला सर्वसाक्षिणी अवस्था म्हणतात (जाणे ब्रह्म जाणे माया । ते एक जाणावी तुर्या । सर्व जाणे म्हणोनिया / सर्व साक्षिणी ।। दा. ७.५.५). या तुर्याअवस्थेत, 'मीच आत्मा । ब्रह्म आहे; मी दृश्य नाही, मी दृश्यातीत आहे; मी दृश्य विश्वाचा केवळ द्रष्टा / साक्षी आहे' अशी साक्षित्वाची सूक्ष्म वृत्ती असते. आता साक्षित्वाची ही सूक्ष्म वृत्तीसुद्धा संपली की वृत्तीची निवृत्ती होते; तीच उन्मनी होय. संपूर्ण वृत्तींनी रहित अशी[३८] मनाची स्थिती म्हणजेच उन्मनी. या निवृत्ती / उन्मनी अवस्थेत सर्व जाणतेपण विरघळून जाते. उरते ते केवळ विज्ञान. अशाप्रकारे प्रथम अज्ञान संपते. मग ज्ञानाचा उदय होऊन ते ज्ञानही संपते; मग उरते ते विज्ञान. नंतर ही विज्ञानवृत्तीही परब्रह्मात लीन होते. मग केवळ, शुद्ध, विमल, निर्विकल्प आणि निरुपाधिक असे परब्रह्म ( दा. ७.४.४९-५१).

अशाप्रकारे, आपल्या दासबोध या श्रेष्ठ ग्रंथात समर्थ श्रीरामदासस्वामींनी चौदा ब्रह्मांचा निरास करून, निर्विकल्प, शाश्वत अशा ब्रह्माचे स्वरूप दाखवून दिले आहे. या ब्रह्माचा साक्षात्कार म्हणजे आपणच ब्रह्म होणे आहे. आणि ही गोष्ट अनुभवानेच कळून येणारी आहे.

---

**तळटीपा**

१. द्वे ब्रह्मणी वेदितव्ये शब्दब्रह्म परं च यत् । शब्दब्रह्मणि निष्णात: परं ब्रह्माधिगच्छति ।। मैत्रायणी उपनि. ६.२२, शब्दब्रह्मणि...धिगच्छति । ब्रह्मबिंदु उपनि. १७, जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।। भगी ६.४४

२. ओमिति ब्रह्म । तैत्ति. उपनि. १.८, तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् । एतदध्येवाक्षरं ब्रह्म । कठ उपनि २ १५-१६ ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म । भगी ८.१३

३. खं ब्रह्म । छांदोग्य ४.१०.५, **सर्व खल्विदं ब्रह्म** । छांदोग्य ३.१४.१.

४. चैतन्यं ब्रह्म । निरालम्ब उपनि, पृ.२५५. खेरीज:- सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म । तैत्ति उपनि. २.१, सच्चिदानंदं स्वप्रकाशं ब्रह्म । त्रिपाद्विभूति महानारायण उपनि. १. पृ.३५९.

५. सत्ता म्हणजे अस्तित्व असाही अर्थ आहे. तो अर्थ दाखविणारे 'सदेव सौम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ( छांदोग्य ६.२.१.) हे वाक्य आहे.

६. य: पृथिव्यां तिष्ठन्.......अन्तरो यमयति....अन्तर्यामी (बृहदा उपनि ३.७.४-२३). एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचंद्रमसौ......न्वायता (बृहदा उपनि ३.८.९). तसेच सामर्थ्ये विण करी सत्ता (दा. २.१.११), असे रामदास अन्यत्र म्हणतात.

७. अन्यो अभिचाकशीति । मुंडक उपनि ३-१. तेभ्यो विलक्षण: साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिव:। क़ैवल्य उपनि १८, एको देव:....साक्षी चेता केवलो निर्गुणश्च । श्वेताश्वतर उपनि ६-११.

८. सर्वाननशिरोग्रीव: सर्वभूतगुहाशय: । सर्वव्यापी स भगवांस्तस्मात् सर्वगत: शिव:।। श्वेता. ३-११, प्रधानक्षेत्रज्ञपतिर्गुणेश: । श्वेता. ६-१६, यत् तद् अद्रेश्यं अग्राह्यं अगोत्रं अवर्ण अचक्षु:श्रोत्रं (मुंडक, १-६); एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्ति अस्थूलं अनणु अह्रस्वं अदीर्घ अलोहितं अस्नेहं अच्छायं अतम: अवायु: अनाकाशं, असंगं, अरसं अगंधं......अनन्तरं अबाह्यं (बृहदा ३.८.८), स एष नेति नेति आत्मा अगृह्य: (बृहदा. ३-९-२६); सर्वविशेषं नेति नेति विहाय यदवशिष्यते तदद्वयं ब्रह्म । अद्वयतारक उपनि पृ. ३८४.

९. पुरुष: पर: (कठ १-३-११), तदेतदक्षरं ब्रह्म (मंडल २-२-२), परमात्मा परं ब्रह्म इति उच्यतें (सर्वसार उपनि.४), तत् सकल-शक्ति-उपबृंहितं अनवद्यनन्तं शुद्धं शिवं शान्तं निर्गुणं इत्यादि वाच्यम् ब्रह्म (निरालंब उपनि. पृ.२५५).

१०. आनन्दो ब्रह्मेति व्यजनात् । तैति उपनि. २-६, तसेच ब्रह्म हे सच्चिदानंद आहे असेही म्हटले जाते.

११. एतद्वै तत् (कठ, २.१.५-६), तदैक्षत बहु स्यां प्रजायेय (छांदोग्य ६-२-३), तत् त्वं असि (छांदोग्य -६-११-३), ॐ तत् सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविध: स्मृत: (भगी १७-२३)

१२. यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह (तैत्ति. उपनि. २-४), अनिर्वाच्यं चैतन्यं ब्रह्म (निरालम्ब उपनि. पृ.२५५), अद्वैतमनिर्वाच्यं ब्रह्म । त्रिपाद्विभूतिमहानारायण उपनि. १, पृ. ३५९.

१३. येथे रामदासस्वामींचा युक्तिवाद व त्याचा अधिक खुलासा हे दोन्ही सोईसाठी एकत्र करूनच दिले आहेत.

१४. शून्यत्व म्हणजे अज्ञान. पहा :- आकाश तमापासून झाले । म्हणौन कामक्रोधे वेष्टिले । अज्ञान शून्यत्व बोलिले । नाम तयाचे ॥ (दा. ८-५-५५). तसेच आकाश व ब्रह्म यातील फरकासाठी दा. ८.५.४०-६९ पहा.

१५. पहा - साक्षत्व चैतन्यत्व सत्ता । हे गुण ब्रह्माचिया माथा । आरोपलें जाण वृथा। मायागुणे । दा. ७-५-८.

१६. पहा :- साक्षत्व चैतन्यत्व सत्ता । हे गुण ब्रह्माचिया माथा । आरोपले जाण वृथा । मायागुणे ॥ घटमठाचेनि गुणे । त्रिविध आकाश बोलणे । मायेचेनि खरेपणे । गुण ब्रह्मी ॥ जव खरेपण मायेसी । तवचि साक्षत्व ब्रह्मासी । माये अविद्येचे निरासी । द्वैत कैचे ॥ दा. ७-५. ८-१०.

१७. ब्रह्म निर्गुण निराकार । दा. ७-२-१, जो निर्गुण गुणातीत... परम पुरुष । दा. ७-७-८; आता ब्रह्म जे का निर्गुण । दा. ६-२-६, आदिअंती ब्रह्म निर्गुण। तेचि शाश्वताची खूण । दा. ६-२-८; अविनाश ते ब्रह्म निर्गुण । दा.६-३-६; तैसे परब्रह्म केवळ । निर्गुण जाणावे ॥ दा. ८-३-४४; मूळ मायेपरते येक । निर्गुण ब्रह्म ॥ ९-६-३२; सर्व उपाधींचा सेवट । तेथे नाही दृश्य खटपट । निर्गुण ब्रह्म घनदाट। सकळा ठायी ॥ दा. १४-९-११, इ.इ.

१८. त्यास परमात्मा म्हणती । आणि नामे नेणो किती । परि ते जाणिजे अंती । जैसे तैसे ॥ दा. १०-१०-२

१९. वरील टीप १७ पहा. तसेच - जो निर्गुण गुणातीत । जो अदृश्य अव्यक्त । जो अचिंत्य चिंतनातीत । परम पुरुष ॥ दा.७-७-८

२०. मुळी ब्रह्म निराकार । दा. ४.१०.१; परमात्मा निर्गुण निराकार । परमात्मा अनंत अपार । परमात्मा नित्य निरंतर । जैसा तैसा ॥ दा. ८.८-३

२१. परमात्मा सर्वांस व्यापक । परमात्मा अनेकी येक । परमात्मयाचा विवेक । अतर्क्य आहे ॥ दा. ८.८.४

२२. ब्रह्म प्रलयावेगळे । ब्रह्म नामरूपानिराळे । ब्रह्म कोणीयेका काळे । जैसे तैसे ॥ दा. ६.४.२३; सकळ आवघेचि नासले । उरले ते केवळ ब्रह्म ॥ दा. ६.३.२७; दृश्य चळे ब्रह्म चळेना । दा. २०.२.७.

२३. अंत नाही म्हणोनी अनंत । बोलिजे तया ॥ दा. १९.५.२७; अनंतरूपी अनंता । वोळखावे ॥ दा. २०.४.१६.

२४. दृश्य आकळे ब्रह्म आकळेना । कल्पनेसी ॥ दा. २०.२.७; निर्विकल्प म्हणजे कल्पना नाही । परब्रह्मासी ॥ दा. ९.१.२; म्हणोनि कल्पनारहित । तेचि वस्तू शाश्वत ॥ दा. १९.५.२७.

२५. दृष्टीस दिसे मनास भासे । तितुके काळांतरी नासे । म्हणोनि दृश्यातीत असे ।

परब्रह्म ते ॥ दा. ६.८.४७.

२६. गगनासारखे ब्रह्म पोकळ । दा. १०.१०.१

२७. परब्रह्म सबाह्य अंतरी । दा. १४.९.२०.

२८. दृश्यभासातीत अविनाश । परब्रह्म ते ॥ दा. १४.९.१९.

२९. दृश्य चळे ब्रह्म चळेना । दा. २०.२.७.

३०. गगनासारिखे ब्रह्म पोकळ । उदंड उंच अंतराळ । निर्गुण निर्मळ निश्चळ । सदोदित ॥ दा. १०.१०.१; मग त्यापैलीकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण । निर्मळ निश्चळ त्याची खूण । गगनासारिखी ॥ दा १७.३.२६.

३१. जे जे काही निर्माण झाले । ते ते आधीच ब्रह्मे व्यापिले । सर्व नाशता उरले। अविनाश ब्रह्म ॥ दा. ६.३.१८.

३२. जे सन्मुखचि सर्व काळ । दा. ६.३.५.

३३. परब्रह्म म्हणिजे सकळांपरते । तयास पाहता आपणचि ते । हे कळे अनुभव मते । सद्‌गुरू केलिया ॥ दा. ९.१.२९.

३४. जे त्रैलौक्याहून वेगळे । दा. १-५-२५.

३५. परब्रह्म ते अद्वैत । दा. ७.७.१८.

३६. अशाप्रकारे निर्विकल्प ब्रह्माशी तादात्म्यता प्राप्त झाल्यावर आपण मग देहधारी नसतानाही आत्मस्वरूपाने कल्पकोटी म्हणजेच अनंत काळ असतो; कारण तेच आपले शाश्वत खरे स्वरूप आहे. (दा.७.३.४९)

३७. आधी दृश्य सोडिले । मग शून्यत्व वोलांडिले । मूळ मायेपरते देखिले । परब्रह्म ॥ दा. ८.१०.७०.

३८. म्हणौनि सर्वसाक्षी मन । तिचे जालिया उन्मन । मग तुर्यारूप ज्ञान । ते मावळोन गेले ॥ जयास द्वैत भासले । ते मन उन्मन जाले । द्वैताद्वैताचे तुटले। अनुसंधान ॥ येवं द्वैत आणि अद्वैत । होये वृत्तीचा संकेत । वृत्ति जालिया निवृत्त । द्वैत कैचे ॥ वृत्तिरहित जे ज्ञान । तेचि पूर्ण समाधान । जेथे तुटे अनुसंधान । मायाब्रह्मीचे ॥ दा. ७.५.११-१४.

●●●

# २. माया

श्रीरामदासस्वामींचा दासबोध हा एक अपूर्व ग्रंथ आहे. त्यामध्ये अंतर्भूत असणाऱ्या अनेक विषयांमध्ये श्रीशंकराचार्यांचे अद्वैत तत्त्वज्ञान हा एक विषय आहे. साहजिकच मायेचेही विवेचन श्रीरामदासांनी तेथे केले आहे. ते मनोरंजक, उद्बोधक व कुतूहलजनक आहे.

मायेचे विवरण करताना रामदासस्वामींनी अनेक गोष्टींना माया म्हटले आहे व मायेसाठी अनेक समानार्थी शब्द वापरले आहेत. तसेच त्यांनी एकच कल्पना विभिन्न स्थानी भिन्न शब्दात व पद्धतीने मांडली आहे. त्यामुळे त्यातील संगती चट्दिशी लक्षात येत नाही. म्हणून दासबोधात जेथे माया आणि मायिक हे शब्द आले आहेत, त्या सर्व स्थळांचा परामर्श घेऊन या मायेच्या विवरणाचा साकल्याने आणि सुसूत्रपणे विचार प्रस्तुत लेखात केलेला आहे व तो सोईसाठी तीन भागात विभागला आहे.

## विभाग - १

**माया या शब्दाचा वापर** - माया हा शब्द रामदासस्वामी प्राय: वापरतात तरी त्यांनी कारणपरत्वे मूळमाया, महामाया, वैष्णवी माया, गुणमाया, गुणक्षोभिणीमाया, अविद्यामाया आणि दृश्यमाया असेही विशिष्ट शब्द वापरलेले आहेत. त्यांचा संक्षिप्त खुलासा येथेच करणे अनुचित होणार नाही. ही माया वैष्णवी म्हणजे विष्णूची अथवा परमात्म्याची आहे, तसेच ती विष्णूच्या मोहिनीरूपाप्रमाणे मोहात पाडणारी आहे. निश्चळ असणाऱ्या ब्रह्मात प्रथम जे चांचल्य निर्माण होते ती मूळमाया. मूळमाया म्हणजेच महामाया. मूळमायेत पंचभूते आणि सत्त्व, रज व तम हे तीन गुण सूक्ष्मरूपाने असतात. हे तीन गुण मूळमायेतून प्रकट झाले की तीच माया गुणक्षोभिणी माया किंवा गुणमाया या संज्ञेला पात्र होते. पुढे तीन गुण व पंचभूते यांच्या मिश्रणातून हे स्थूल विश्व दिसू लागते. जेव्हा माया विश्वरूपाने जडत्वात येते, म्हणजे इंद्रियगम्य अशा स्थूल दृश्य स्वरूपात येते तेव्हा ती अविद्यामाया (११.१.९) वा दृश्यमाया होते. एकाच स्त्रीला आई, मुलगी, बायको, सून, सासू इत्यादी संज्ञा कारणपरत्वे दिल्या जातात, त्याप्रमाणे माया जरी एकच आहे तरी तिला विशिष्ट कारणास्तव भिन्न भिन्न नावे दिलेली आहेत.

**सत्य कळण्यासाठी मिथ्या पाहावे लागते** - मायेचे विस्तृत वर्णन रामदासांनी केले आहे. त्याबाबतीत एक गोष्ट लक्षात घ्यावी :- अद्वैत वेदान्तात, 'अध्यारोपापवादाभ्यां निष्प्रपंचं प्रपञ्च्यते' ही विषय मांडण्याची पद्धती[१] आहे. माया ही मुळातच मिथ्या आहे. तेव्हा मायेचे कितीही सविस्तर वर्णन केले असले तरी ते मिथ्याच ठरते. ज्याप्रमाणे एखादी घटना तपशीलवार उत्तम प्रकारे सांगावी आणि मग म्हणावे की, ते सर्व घडलेच नाही अथवा स्वप्नात घडले, त्याप्रमाणे मायेच्या वर्णनाचा प्रकार आहे. आणि खोट्या मायेचे हे वर्णन मात्र सत्य ब्रह्म कळण्यासाठी आहे हे लक्षात घ्यावे. ही गोष्ट लक्षात ठेऊनच मायेचे विवेचन पाहावयाचे आहे.

**मायेविषयी मूलभूत गोष्टी** - मायेचे विवेचन पाहाताना ज्या गोष्टी आपल्या स्मरणात हव्यात, त्या पुढीलप्रमाणे आहेत:- जे जे चंचलाकार आहे ते ते माया आहे (११.२.९). जगताचे अवडंबर हे मायेने निर्माण केलेले दृश्य आहे (८.१.४३). या दृश्य विश्वात जे काही निश्चळ, चंचल तसेच जड आहे ते सर्व मायेचा पसारा आहे (१२.३.८.). सगळ्या सृष्टीचे सूक्ष्म बीज मूळमायेत आहे (२०.२.२०). मूळमाया निश्चळ ब्रह्मात निर्माण होते; निश्चळ ब्रह्मातील चांचल्य अथवा चंचळ संकल्प म्हणजे मूळमाया आहे (१०.१०.५-७; १३.३.३; १५.७.२). ही 'माया दो दिसांची' (१५.८.३८) म्हणजे नाशवंत वा अशाश्वत आहे.

माया हा स्त्रीलिंगी शब्द असल्याने स्त्रीची कल्पना येते. तरी या मायेला चित्त, चैतन्य यासारखी नपुंसकलिंगी नावे (१०.१०.३०) आणि [२]परमेश्वर, जगदीश, जगदात्मा, आत्मा, अंतरात्मा इत्यादी पुल्लिंगी नावेही दिली जातात (१०.१०.१६-१८), ही महत्त्वाची गोष्ट विसरू नये.

माया ही असत्य (१०.१०.५५) अथवा मिथ्या (८.२.५३) आहे. तथापि ती नाहीशी करण्याचा कितीही प्रयत्न केला तरी ती ज्ञानावाचून नष्ट करता येत नाही (७.१.५९). मायेवर विचार केला की ती नाहीशी होते (६.८.३४) म्हणजे विचाराअंती मायेचा नाश आहे. विवेक करून मायेचा शोध घेतला तर ती नाहीशी होते (७.१.५६).

**माया सांडून ब्रह्म पाहावयाचे आहे** - मायेने ब्रह्म आच्छादलेले आहे. मायेला बाजूला सारून ब्रह्म निवडून घ्यावयाचे आहे. ज्याप्रमाणे पाण्यावरील शेवाळ बाजूस सारून पाणी घ्यावयाचे असते, त्याप्रमाणे माया सांडून ब्रह्माचा अनुभव घ्यावयाचा आहे (६.५.११-१२) म्हणजेच मायेचा त्याग करून शाश्वत असे परब्रह्म समजून घ्यावयाचे आहे (१४.९.१२.३०): कारण मायेला दूर करून जर तिच्या मुळाशी म्हणजे ब्रह्माकडे

गेले तरच आपल्याला समाधान होणार आहे (२०.९.१३). याचे कारण असे आहे की आपण म्हणजे जीव, मुळात ब्रह्मरूपच आहोत (९.१०.३१).

**ब्रह्मरूप आपण आहोत** - आपले खरे स्वरूप ओळखणे म्हणजेच ज्ञान आहे (५.६.१-२). आपण ब्रह्म आहोत हेच खरे आपल्या स्वरूपाचे ज्ञान होय (५.६.१०). हे ब्रह्म निर्गुण आहे. कल्पनेच्याही पलीकडे असणाऱ्या निरंजन ब्रह्माला विवेकाचे द्वारा ओळखावयाचे आहे (२०.१०.२४). विवेकाने निर्गुण ब्रह्माशी ऐक्यता होते (६.३.२१) आणि 'निर्गुणी जे अनन्यता । तेचि मुक्ति सायोज्यता ।' (११.१.४२) अशी वस्तुस्थिती आहे.

आता, माया सांडण्यासाठी माया काय, हे कळले पाहिजे. या दृष्टीने मायेचे विवेचन आवश्यक ठरते. तेव्हा आता प्रथम मायिक व मायाजाळ या शब्दांच्या वापराचा निर्देश करून मग मायेचा तपशील दिला आहे.

**मायिक** - मायिक हा शब्द माया या शब्दापासून साधलेला आहे. मायेच्या टप्प्यात पडणारे, मायाजनित, नाशवंत, अशाश्वत, लबाडीचे, फसवे, खोटे, मिथ्या इत्यादी अनेक अर्थांनी त्या त्या संदर्भात मायिक हा शब्द रामदासांनी वापरलेला आहे. पंचभूतादि[3] पदार्थ मायिक आहेत (७.३.१५,२९-३२). पंचभूतांची वार्ता मायिक आहे (१७.९.११). जे पांचभौतिक आहे ते मायिक आहे (१३.६.१७). स्थूळ देह इत्यादि तत्त्वे मायिक आहेत. सर्व चराचर मायिक आहे (६.४.१३). दृश्य जगाचा विचार मायिक आहे (६.४.१७). या जगातील अत्यंत विचाराचे बोलसुद्धा मायिक आहेत (६.१०.१८) व वक्तृत्व स्वभावत: मायिक आहे; त्याचा त्याग करावा (७.९.३). चंचळ असणारे हे सर्व मायिक आहे (१०.१०.४९). दृश्य हे मायिक आहे (६.९.३). दृश्याची उपाधी मायिक आहे (११.१.४४). माणसाचा भाव मायिक असू शकतो (३.१०.१४). असत् शिष्य मायिक असतो (५.३.५३); तो मिथ्या मायिक बोलतो (५.३.९०). (शिल्पकाराने बनवलेले) पुतळे मुळासारखे दिसले तरी ते मायिक असतात (६.८.१५). आकाशात आभाळ फिरू लागले की, चंद्र पळतो असे जे वाटते ते मायिक आहे (८.३.४५). निश्चळ आणि चंचळ तत्त्वे एकच मानणे हे म्हणणे चंचळामधील मायिक स्थितीचे आहे (११.१.३२).

आपण म्हणजे जीव हा कोणी स्वतंत्र तत्त्व नाही. म्हणून 'आपुली तो मायिक वार्ता' (६.१०.१३) आहे. 'आपला तो मायिक विचार' आहे (९.१०.१४; २०.४.२९) आणि अनुभव नसल्यास, शब्द[1] ब्रह्म हेसुद्धा मायिक आहे (७.३.२४).

जे मायिक आहे ते लयाला जाते (११.२.९; १२.३.११). जे जे मायिक आहे त्याचा विचाराने निरास करावा (१२.३.९). आणि स्वत:ला ब्रह्माचा अनुभव आला, ज्ञानाने ब्रह्मजागृती झाली की मग स्वभावत:च काय मायिक आहे ते कळू लागते (७.४.१३).

मायिक शब्दाच्या संदर्भात एक गोष्ट नोंदली पाहिजे:- मायेचे रूप मायिक आहे आणि माया ही मायिक आहे असे विधान रामदासस्वामी कधीकधी करतात. उदा- मायेचे अवघेचि जाणावे । रूप मायिक (१२.३.१०); माईक माया (३.१०.४९); तैसी माया भयानक । विचार पाहता मायिक (८.८.४४); चंचळ माया ते मायिक (११.१.३३); असो ऐसी माया मायिक । शाश्वत ते ब्रह्म येक (७.४.२६).

**मायाजाळ** - या जगात जीवामागे लागलेल्या गोष्टींना उद्देशून रामदासांनी 'मायाजाळ' हा रूपकात्मक शब्द वापरला आहे. विश्व हा मायेचा विस्तार आहे. त्यात जन्ममरणरूपी संसार व दु:खपरंपरा जीवाला सोडीत नाहीत. संसार ही एक वागुरा (जाळे) आहे; संसारच मायाजाळ (मायेचे जाळे) आहे; त्या मायाजाळात प्राणी गुरफटले जातात. जो संसारात येतो तो मायाजाळात गुंडाळला जातो (३.१०.३६). जे प्राणी मायाजाळात पडले आहेत ते संसारातील दु:खांनी दु:खी होतात (५.२.१३). दु:ख भोगणारा प्राणी क्षणैक, मनात पस्तावतो आणि उदास होतो; पण तो मायेच्या पसाऱ्यातून न सुटता पुन: लगेच मायाजाळाने गुरफटला जातो (३.४.४९). देहाला नाना प्रकाराचे विकार होतात; प्राणी सुखदु:खांत अडकतात; अशाप्रकारे ते मायाजाळात गुंडाळले किंवा गुरफटले जातात (३.१.५०). मायाजाळात सापडलेला प्राणी दुश्चित होतो (७.१.४९). त्याला परमार्थ समजत नाही. मग परमार्थबुद्धी विसरून जाणारा तो मूर्ख माणूस मायाजाळात भ्रमण करीत राहतो (१.१०.३३). या स्थितीत त्याला देव कोण हे कळत नाही, संतांचा विवेक उमजत नाही व मायेचे कौतुक समजत नाही; तो तेथेच बद्ध होऊन राहतो (५.७.१३).

पण विवेकाने पाहिले तर मायाजाळ म्हणून खरे काही नाही आहे (२०.७.२५) हे कळून येते.

**विवेकाची आवश्यकता** - विश्व हे अष्टधा[४] प्रकृतीचा म्हणजे मायेचा खेळ आहे. या प्रकृतीच्या अंती गेले तर निवांतपणे देवाचा निश्चय करता येतो (५.१०.३४). जेव्हा दृश्य प्रकृती व पंचभूतिक विश्व बाजूला होते व द्वैत लयाला जाते, तेव्हा खरे ज्ञान होते (५.६.३). म्हणून अष्टधा प्रकृतीचा निरास करून परब्रह्म जाणून घ्यावयाचे आहे: माया हा

पूर्वपक्ष आहे (६.५.१६); अष्टधा प्रकृती हा पूर्वपक्ष आहे (१८.५.२९). खरे कळण्यासाठी पूर्वपक्ष दूर करावा लागतो (१३.८.३७). म्हणून पूर्वपक्ष असणाऱ्या मायेचे खंडन करून (१४.८.४९), अलक्ष्य अशा ब्रह्मामध्ये लक्ष लावले पाहिजे (१८.५.२९).

मायेचा पार दुस्तर आहे (१७.४.५). ब्रह्म हे इंद्रियगम्य नाही. म्हणून विवेकी लोक मायाब्रह्माचा विवेक करतात (६-५-९). ब्रह्म कसे आहे, मूळमाया[४] कशी आहे, अष्टधा[४] प्रकृती, शिव[४] शक्ती, षड्गुणेश्वर[४] गुणसाम्य[४] म्हणजे काय (१७.४.७). अर्धनारीनटेश्वर[४], प्रकृतिपुरुष[४], गुणक्षोभिणी[४], त्रिगुण[५] इत्यादींचा विचार साधुपुरुष करतो (१७-४-८-९).

प्रकृतीच्या म्हणजे मायेच्या पसाऱ्याला काही अर्थ नाही, सर्व काही कर्ता देव आहे, हा विवेक हवा (१२-७-२८). सारासार विचाराने प्रकृतीचा म्हणजे मायेचा निरास होतो (१३-७-११-१२); विवेकाने प्रकृतीचा म्हणजे गुणमायेचा निरास करावयाचा आहे (९-६-५४)

त्यासाठी 'मायोद्भवाचे लक्षण' (१-१-११) पाहावयास हवे. माया ओलांडून जाण्यास अध्यात्माचे श्रवण हाच मार्ग आहे (२०-९-१४). माया आणि ब्रह्म ओळखणे म्हणजेच अध्यात्माची ओळखण होय (७-१-५४). विवेकाने माया आणि ब्रह्म यांचे विवरण केले तर जन्ममरण चुकते (६-५-२५). माया व ब्रह्म यांचा विवेक करून, त्यांचे ज्ञान करून घेऊन 'आपणास आपण जाणावे' (९-४-२९), म्हणजे जन्ममरणातून सुटून (९-४-२९) स्वस्वरूपस्थिती म्हणजे सायुज्यमुक्तस्थिती प्राप्त होते.

हे सर्व लक्षात घेऊन आता प्रथम सारासार वा नित्यानित्यविवेक आणि तदनुषंगाने संतसगती, सद्गुरू, इत्यादीचा संक्षिप्त ऊहापोह करून, मग आपले म्हणजे जीवाचे स्वरूप कसे आहे ते संक्षेपाने सांगून, नंतर ब्रह्माचा[१] विचार थोडक्यात देऊन, मायेचे विस्तृत विवरण पुढे दिले आहे.

**आपली सद्यःस्थिती व परमार्थाची आवश्यकता** - सध्या आपण या जगात जन्मलो आहोत. जन्म हा दुःखाचे मूळ (३-५-५२), दुःखाचा अंकुर, शोकाचा सागर व भयाचा डोंगर आहे (३-१-१). जन्ममरणाचे चक्र म्हणजे संसार, संसारात दुःख आहे, संसार दुःखमूळ आहे (३-२-१). सुखासाठी[६] आपण बाह्य विषयांकडे धावतो; पण 'विषयजनित जे जे सुख, तेथेचि होते परम दुःख' (३-१०-६५) अशी स्थिती आहे.

याउलट परमार्थ सर्वांना विसावा देणारा आहे, परमार्थ हा संसारात तारक आहे (१-९-२०-२१). आणि 'सकळ सृष्टीचे बीज । मूळमायेत असे सहज । अवघे समजता सज्ज । परमार्थ होतो' (२०-३-१७). परमार्थ केल्याने, माया ही मिथ्या (लापणिका) (१-९-१६) असून, ती 'माया विवेके मावळे' (१-९-१४) हे कळून येते. परमार्थ केल्यावर मुख्य परमात्मा म्हणजे ब्रह्म अनुभवास येतो, त्यामुळे जन्माचे सार्थक होते (१.९.२४-२५).

तेव्हा आपणास सुख हवे असल्यास, आपण प्रयत्नपर्वूक[७] ब्रह्मा-विष्णू-महेश यांनाही निर्माण करणारा थोर देव ओळखून घेतला पाहिजे (६-१-१२).

**संतसंगतीची महती** - देव किंवा परमात्मा या जगात साधुसज्जनांच्या[८] संगतीत शोधावयाचा आहे (६-९-१९) कारण 'मायातीत अनंताची । संत[८] सोय सांगती' (१-५-१४). सत्संगाविना देवाधिदेवाची प्राप्ती होत नाही (५-१-२३). संतांचा संग धरल्याने सद्वस्तूचा म्हणजे ब्रह्माचा लाभ होतो (६-९-२०).

**सदगुरूंची जरुरी** - जो साधू आपल्याला परमार्थाचे मार्गदर्शन करतो, तो सद्‌गुरू. म्हणजे 'जो ब्रह्मज्ञान उपदेसी । अज्ञान अंधारे निरसी । जीवात्मया परमात्मयासी । ऐक्य करी' (५-२-९). सद्‌गुरू ब्रह्म आहे (१.४.२३-२९), त्याला माया स्पर्श करू शकत नाही (१-४-१); म्हणून मायेच्या आधारे सद्‌गुरूंचे वर्णन करता येईल असा विश्वास धरता येत नाही (१-१-४). मायेच्या बळावर सद्‌गुरूंचे[९] वर्णन करता येत नाही कारण तेथे माया लाजते (१-४-५).

सद्‌गुरुपदापुढे मायाजनित देवसामर्थ्य ते केवढे (५-३-४६) ? सदगुरूंच्या अभय-कराने अनावर असणारी माया ओसरते (१.४.९). सद्‌गुरुकृपेच्या बळाने मायेसहित ब्रह्मांड दृष्टीस येत नाही (५-३-४८). सद्‌गुरूंच्या कृपेने अपार संसार दु:खे संपतात आणि ईश्वर प्रगट होतो (५-१-४०). सद्‌गुरुविना आत्मज्ञान होतच नाही (५-१-१९-२१). म्हणून आत्मज्ञानाने प्राप्त होणारे मोक्षसुख ज्याला हवे असेल त्याने सद्‌गुरूला शरण जाणे आवश्यक आहे (५-१-४४).

**सारासारविवेक** - परमार्थ करावयाचा म्हणजे विवेक[१०] करण्यास शिकले पाहिजे. विवेक नसल्यास परमार्थ होत नाही (१२-४-७).

या संसारात येऊन नित्यानित्यविवेक केला तर संसाराचे सार्थक होते (१७-१-२१). पंचभूतिक हे जड आहे; त्यात आत्मा व्यापक आहे, हे नित्यानित्य-विवेक केल्याने कळते (६-३-८). आत्मा तेवढा नित्य आहे, अन्य सर्व अनित्य आहे. जे नित्य म्हणजे

शाश्वत आहे तेच सार आहे; त्याउलट जे अनित्य म्हणजे नाशवंत अथवा अशाश्वत आहे ते असार आहे (१४-९-५). या जगाच्या अवडंबरात सार व असार विवेकाने ओळखावयाचे आहे (१३-२-१). जे दृश्य प्रगट आहे ते असार आहे, तर त्यात गुप्त असणारा[११] परमात्मा सार आहे (६-२-२१). चंचळ दृश्य नाशवंत आहे (१३-२-१८). जे नाशवंत आहे ते असार आहे व जे शाश्वत आहे ते सार आहे (१४-९-५). माया नाशवंत आहे. म्हणून ती असार आहे. ब्रह्म शाश्वत आहे, ते सार आहे (१३-२-१८; ६-३-२६). चंचळ आणि नाशवंत बाजूला सारून पाहिले तर शाश्वत, निश्चल असणारे ब्रह्म सार आहे हे कळते; फक्त परब्रह्म सार आहे. (१३-२-२७). अशा प्रकारे विवेकाने या असार जगतात जगदीश तेवढाच सार आहे (६-३-९) हे कळते. माया अनित्य व असार असून, परब्रह्म हे नित्य व सार आहे हे कळून येते.

**आपले ज्ञान** - नित्यानित्यविवेक करून मुख्य देवास जाणणे, आपले खरे स्वरूप आपण ओळखणे म्हणजे ज्ञान आहे. 'पाहावे आपणासी आपण । या नाव ज्ञान' (५-६-१-२) आहे.

आपण म्हणजे मीपण आणि मीपण म्हणजे जीवपण; हे जीवपण अज्ञानामुळे आहे (७-२-२०). मायेअंती जीवपणाची भ्रांती होते. म्हणजे असे:- दोन गोष्टी मुख्य आहेत एक मुख्य परमेश्वर व दुसरी गोष्ट जगताच्या आकारात परिणत झालेली प्रकृती म्हणजे माया. मग हा तिसरा 'आपण' (= जीव) मध्ये कोण चोर आहे (४.९.११)? आपला आपण शोध घेतला तर 'आपला तो मायिक विचार' (९.१०.१४) असून आपण मायिक (मिथ्या) आहोत हे कळते (६-१०-१३). हा 'मी' मुळातच मिथ्या आहे (९-२-३७). मिथ्या असणाऱ्या प्रकृतीमुळे (=मायेमुळे) 'मी' निर्माण होतो (९-२-३८). विवेकाच्याद्वारे पाहिले तर प्रकृतीचा निरास होतो व उरतो तो फक्त आत्मा अथवा ब्रह्म; मग आपण आहोत कुठे (४.९.१०)? विचाराने कळते की आपण (जीव) नाहीच (४-९-८); आपण मिथ्या आहो, देव खरा आहे (४-९-२२) हेच खरे.

मीपण म्हणजे जीवपण कल्पिलेले आहे. आपला आपण शोध घेतला की, आपण मायिक आहोत हे कळून येते. मग मीपण म्हणून काही उरत नाही. सर्व तत्त्वांचा निरास केल्यावर उरते निर्गुणब्रह्म अथवा आत्मा; हा निर्गुण आत्मा आपण आहो (६-३-२३,२९-३०), ते निर्गुण ब्रह्मरूपच आपण आहोत (९-१०-३१).

निर्गुण परमात्म्याला जाणणे म्हणजे ज्ञान (६-१-१९). आपण ब्रह्म आहोत हेच खरे आपल्या स्वरूपाचे ज्ञान होय (५-६-१०). आपणच ब्रह्म आहोत हे अनुभवाने कळते (९-१-२९). स्वरूपाच्या अनुभवानंतर प्रकृती व पुरुष या दोहोंचा निरास होतो, मग तेथे प्रकृतिजन्य (= मायाजन्य) मीपणाला स्वतंत्र अस्तित्व कसे असणार (९-२-३९)?

सर्व तत्त्वांचे निरसन झाल्यावर, आपले खरे रूप अरूप आहे, ते स्वस्वरूप आहे (१२-२-३०) हे कळते. जे जे साकार आहे ते ते कल्पान्ती नष्ट होते; पण स्वरूप मात्र सर्वकाळ 'असतचि असते' (९-२-१). भगवंताचे (ब्रह्माचे) स्वत:चे रूप तेच स्वरूप होय (९-२-३) आणि ब्रह्माचे स्वरूप तेच आपले स्वरूप आहे.

**ब्रह्म दृश्यापेक्षा वेगळे आहे** - जे ब्रह्म आपण आहोत ते ब्रह्म दृश्यापेक्षा वेगळे आहे. पंचभूते आणि तीन गुण मिळून बनणाऱ्या अष्टधा[४] प्रकृतीलाच म्हणजे मायेलाच दृश्य हे नाव आहे (६-२-१४). पंचभूतिक दृश्य विश्व आकाराला आले आहे (६-२-८), ते दृष्टीला दिसते व मनाला भासते. जे जे आकाराला येते, ते ते नष्ट होऊन जाते (१८-८-१८). जे दृष्टीस दिसते व मनास भासते, ते सर्व कालांतराने नाश पावते (६-८-४७). म्हणून दृश्य हे विनाशी आहे (६-२-१५). सर्व दृश्य हे नाशवंत अथवा अशाश्वत आहे (६-९-२२).

जे दृश्याच्या उपाधीपेक्षा वेगळे आहे, जेथे दृश्यमायेचे अस्तित्व नाही त्यालाच परब्रह्म म्हणतात (१७-१०-८). जेथे दृश्यभ्रम नाही ते विमल व निश्चळ परब्रह्म आहे (१३.७.१०). ते दृश्यभासाच्या अंती असणारे (४.९.१९), दृश्याच्या गलबल्यापेक्षा वेगळे असणारे (१८.८.१८) परब्रह्म आहे. अच्युत व अनंत परमात्मा दृश्यापेक्षा निराळा आहे (६.९.२२). दृश्याच्या आदि व अंती असणारे निर्गुण ब्रह्म शाश्वत आहे (६.२.८). निराकार आत्मा (= ब्रह्म) शाश्वत तसेच सत्य आहे (१३.६.११).

**ब्रह्म मायेपेक्षा पृथक् आहे** - ही सृष्टी पंचभूतिक आहे (६.२.७). पाच भूतांपेक्षा वेगळे निर्गुण ब्रह्म आहे (१३.८.२९). विश्वात पंचभूतांचे मिश्रण आहे, पण त्यांतून आत्माराम[१२] (=ब्रह्म) अलिप्त आहे (८.१.४२). सगळ्या सृष्टीचे सूक्ष्म बीज मूळमायेत आहे (२०.२.२०). ज्या अष्टधा प्रकृतीतून म्हणजे मूळमायेतून हे विश्व उत्पन्न होते, त्या 'अष्टधेचे जिनस नाना' (१७.१०.१४) आहेत; मूळमाया बहुजिनसी आहे (२०.३.१२). याउलट परब्रह्म हा मुख्य जिन्नस आहे; त्याला काहीच तुळणा नाही (२०.५.४).

मूळमायेच्या पूर्वी, मूळमायेच्या मागे, निर्गुण ब्रह्म आहे (६.९.३२) म्हणजे सृष्टीपूर्वी ब्रह्म असते; म्हणून ब्रह्मात सृष्टी मुळीच असत नाही (६.६.१). तसेच मूळ

ब्रह्मस्वरूपात माया नसते (८.३.५०). ब्रह्म हे[१३] मायातीत आहे (१२.६.३); परमात्मा हा मायातीत विश्राम आहे (७.६.५९). ब्रह्म हे कल्पनेपलीकडे आहे; तेथे माया मळ नाही (१४.९.१४). परमात्मा । ब्रह्म केवळ (एक) आहे; त्याला मायेचा मळ नाही (९.३.२२). ब्रह्म हे शाश्वत आहे; तेथे माया[१४] भ्रम नाही (७.३.४७).

**ब्रह्म कसे आहे ?** - दृश्यापेक्षा व मायेपेक्षा वेगळे असणारे ब्रह्म हे निराकार (४.१०.१), केवळ[१५] निर्गुण (८.३.४४), अलिप्त (८.३.४३), निरवयव (८.३.४९), निश्चळ (१०.१०.१), एक विलक्षण प्रकारचे अचंचळ (१०.१०.५), मायातीत, अपरंपार, निर्मळ, शाश्वत (१२.६.१-३), अविकारी (१३.३.१), अविनाश निर्गुण (६.३.६) आहे. ब्रह्म हे कल्पनारहित आहे; त्याला अंत नाही म्हणून ते अनंत आहे (१९.५.२७). परब्रह्म निराभास आहे (९.६.३७) म्हणजे ते वेगळेपणाने अनुभवास येणारे नाही. ब्रह्म सर्वव्यापक आहे (१०.१०.३-४). अशा ब्रह्माचे ज्ञान झाले असता तात्काळ मायेचे भान उडते (७.१.६१).

**माया कशी आहे ?** - माया चंचळ आहे (८.३.४८). ती ईश्वराच्या संगतीत असते (७.५.५८). माया सगुण (= गुणांनी युक्त) आणि साकार आहे; ती सम्पूर्णपणे विकारी म्हणजे सतत बदलणारी आहे (७.१.५५). माया अनेक व अनेकरूपी आहे; विश्वाच्या रूपाने ती प्रगट होते (७.१.५७). माया बहुरूपी व बहुरंगी आहे म्हणजे बहुरूप्याप्रमाणे अनेक रंगरूपे धारण करून ती व्यक्त होते. या सृष्टीची रचना मायेमुळे होते (७.१.५८-५९). मूळमाया सूक्ष्म आहे (१७.३.१८).

जसे आकाशात मुळात नसणारे आभाळ अथवा मळभ अकस्मात येते, तसे मायेमुळे ब्रह्माच्या ठिकाणी दृश्य विश्व दिसू लागते (८.३.३६). जसे आकाशात प्रचंड असे धुराचे डोंगर आभाळामध्ये दिसतात, तसे ही मायादेवी विश्वरूपी अवडंबर दाखविते (७.४.४०). ज्याप्रमाणे वायूमुळे दृश्य असणारी धूळ आकाशात उडते, त्याप्रमाणे मूळमायेमुळे दृश्य जग दिसू लागते (८.३.३४). या विश्वाच्या 'आदि-अंती एक देव आहे'; पण 'मध्येचि लाविली माव' (२.५.३९) आहे. विश्वाच्या 'मूळपासून सेवटवरी । अवघी मायेची भरोवरी' (१२.६.२३) आहे. सृष्टिभान हा मायेचा स्वभाव आहे (९.७.१३). या विश्वात 'माया आहे मायापणे । विस्तारली' (९.१०.२३) किंवा 'अवघी माया विस्तारली' (८.३.२१) आहे. दृष्टीला जे दृश्य दिसते आणि जो भास मनाला भासतो ते दोन्ही माया आहेत (७.१.५६). माया म्हणजे पंचभूतांचा विस्तार आहे (७.१.५५). मायेच्या विस्ताराला मर्यादा नाही (७.१.५७).

स्थूल पंच महाभूतांना माया चेतविते (७.३.१५). विश्वातील नाम आणि रूप मायेमुळे आहे (८.३.२४). विश्वातील अनुभव आणि अनुभव घेणारा हे द्वैत मायेमुळे आहे (६.१०.३३). जगातील मंत्रमाळा, इत्यादि सर्व माया आहे (५.४.१०). संसारातील तारुण्य, वैभव, हावभाव, सोहाळे हे सर्व मायिक माया (फसवा देखावा, भ्रम) आहे (३.१०.४९).

**माया म्हणजे आपली कल्पना आहे** - आपली कल्पना ही मायाच आहे (७.१.५९). धातु, पाषाण, मृत्तिका इत्यादीमध्ये देव मानणे ही आपली कल्पना आहे; पण ते सगळे मायेच्या भ्रमाने तसे वाटते (६.६.४४-४६). बद्धपणा आणि मुक्तपणा या दोन्ही कल्पना आहेत; कल्पना खोटी असते. मृगजळाप्रमाणे किंवा गगनातील आभाळाप्रमाणे मुक्त-बद्ध या कल्पना मायामय आहेत; त्या खोट्या आहेत (७.३.६०-६१). म्हणून मुक्त आणि बद्ध हा विनोद आहे आणि तो मायेच्या गुणामुळे आहे (७.६.५६).

**माया मोहिनी घालते** - माया विष्णुस्वरूप आहे म्हणजे मोहिनीरूपातील विष्णूप्रमाणे ती मोहिनी घालते (७.१.५७). मायेमुळे मिथ्या असणारे दृश्य विश्व खरे वाटते, तर सत्य असणारे ब्रह्म खरे वाटत नाही; विचार केल्यावर कळते की ही मायाजनित भ्रमाची क्रिया आहे (७.१०.१). सत्य असणारे ब्रह्म आच्छादले जाते; जे मिथ्या आहे ते सत्य वाटते; पाहाता पाहाता असा विपरीत प्रकार घडतो; अशी मायेची करणी आहे (७.१०.५-६).

**माया बाजीगरी आहे** - मनुष्य जे कृत्रिम म्हणजे खऱ्यासारखे खोटे निर्माण करतो, त्याला बाजीगरी (जादूगिरी, गारुड) म्हणतात. भगवंतापासून जे कृत्रिम निर्माण होते त्याला माया म्हणतात. ही माया विचित्र आहे; ती अनेक प्रकार निर्माण करते (६.८.३३). माया ही [१६]बाजीगरी आहे; ती खऱ्यासारख्या दिसणाऱ्या पण खोट्या अशा वस्तू दाखविते. माया दिसते खऱ्यासारखी; पण जाणते तिला खरी मानीत नाहीत (६.८.२४). ही माया अगदी खऱ्यासारखी दिसते; ती सतत दृष्टीस पडत असल्याने ती खोटी असूनही खऱ्यासारखी भासते. मायेला खरी म्हणावे तर ती नाश पावते. बरे, तिला मिथ्या म्हणावे तर ती प्रत्यक्ष दिसत असते. म्हणून माया खरी आहे व खोटी आहे असे म्हटले तर त्यावर मन विश्वास ठेवण्यास तयार होत नाही; परंतु ते बरोबर नाही. मायेचा विचार म्हणजे खोट्याचा विचार आहे. मायाजनित जे हे दृश्य दिसते ते केवळ स्वप्नाप्रमाणे आहे (६.८.३४-३६).

**माया नाशवंत आहे** - वरवर पाहिल्यास माया ही न भंगणारी व पूर्ण वाटते (७.१.५८); परंतु प्रत्यक्षात मात्र तसे नाही. माया क्षणभंगुर आहे (७.१.५६). माया[१७] ही नाशवंत

आहे; तिचा शेवट होतो (८.८.३७). कल्पांती माया नष्ट होते (८.८.३६). ' म्हणजे ' दिसेल तितके नासेल । उपजेल तितके मरेल । रचेल तितुके खचेल । रूप मायेचे' (१२.३.१२) असे आहे.

**माया मिथ्या आहे** - दासबोधाच्या चौदाव्या दशकाच्या दहाव्या समासात (१-२१ ओव्या) रामदासस्वामींनी अनेक दृष्टांत व उदाहरणे देऊन मायेविषयी सांगितले आहे. त्या सर्वांचा मथितार्थ असा आहे :- माया स्वप्नवत् आहे (१४.१०.३). गगनातील गंधर्वनगराप्रमाणे माया आहे (१४.१०.४). माया सत्य वाटते; पण ती कायमची मिथ्या असते (१४.१०.१).

माया ही मृगजळाप्रमाणे आहे (७.३.३६). माया अथवा प्रकृती ही लटिकी (९.२.३८) अथवा असत्य आहे (१०.१०.५५). शहाण्या विचारी माणसाला माया मिथ्या आहे (८.२.५३; २०.३.२३) हे कळून येते. सत्त्वगुणाच्या प्रकर्षाने माया मिथ्या आहे हे कळते (२.७.४२). जरी सर्व मायाच विस्तारली आहे तरी ती संपूर्णपणे नाहीच (८.३.२१). माया ही मुळातच नाही (६.१०.३३). 'माया असोनीच नाही' (८.८.४). माया ही 'नाथिलीच आहे' (८.३.४९).

माया मिथ्या आहे हे कळल्यावर खरे म्हणजे तिचे दडपण जीवावर पडू नये; पण तसे होत नाही. मायेचे दडपण पडते आणि जीव आपल्या स्वस्वरूपातून खाली घसरतो; पण लटक्या (मिथ्या) मायेच्या या दडपणामुळे सत्य परब्रह्म सोडणे बरोबर नाही. ब्रह्म हे एकमेव सत्य आहे हा निश्चय झाल्यावर उगीचच इकडे तिकडे कशाला फिरावे (२०.३.२३-२४) ? ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे अशा साधूला मात्र त्याचे स्वरूपाशी अनुसंधान लागल्याने, जिकडे तिकडे परमात्माच दिसतो; त्याला ही माया कुठेच आढळत नाही (७.१०.२९)

अशाप्रकारे मायेबद्दल सांगावे तितके थोडेच आहे (७.१.५७).

**माया व ब्रह्म यांतील भेद** - आतापर्यंतचे ब्रह्म व माया यांचे विवेचन पाहिल्यावर त्या दोन्होंतील फरक लक्षात येतोच. तथापि हा भेद अधिक सुस्पष्टपणे रामदासांनी अनेक स्थळी पुढीलप्रमाणे मांडला आहे : - ब्रह्म निर्गुण[१८] असून अविनाशी आहे; माया सगुण असून नाशवंत आहे (६.३.६). परब्रह्म शाश्वत आहे, माया अशाश्वत आहे (६.८.४८; ७.२.२३;७.४.४१). माया चंचळ आहे, परब्रह्म निश्चल आहे (११.१.३; ८.३.४८). मूळमाया[४] ही अपूर्ण, एकदेशी म्हणून पूर्ण व्यापक नाही गुणमाया[४] सुद्धा पूर्ण व्यापक नाही; निर्गुण ब्रह्म पूर्ण व्यापक आहे. (२०.१.१-

१०). ब्रह्म हे नि:शब्द आहे; माया शब्दयुक्त आहे (१८.५.२७) म्हणजे मायेमध्ये बोलणे होते; माया नसताना बोलता येत नाही. ब्रह्म आकाशाप्रमाणे आहे, तर माया ही वाऱ्याप्रमाणे आहे (७.४.२४) (म्हणजे माया दिसते पण तिचे दर्शन होत नाही). माया दिसते पण ती नाश पावते; ब्रह्म दिसत नाही आणि ते कधीच नष्ट होत नाही (१४.१०.१). ब्रह्मवस्तु निरवयव म्हणजे अखंड आहे, पण तेथे माया अवयव दाखविते म्हणजे अवयव अथवा खंड पडल्याचा भास निर्माण करते (८.३.४९). गुणमाया सगळा खटाटोप करते पण त्यातील काहीही निर्गुण ब्रह्मस्वरूपात घडत नाही; तथापि स्वस्वरूपातच (म्हणजे ब्रह्मामध्येच) मायेची सर्व घडामोड चालू असते (८.३.५२).

दृश्यात असणारे कोणतेच गुण ब्रह्मामध्ये नाहीत, तथापि साक्षित्व, चैतन्य[१९] व सत्ता हे गुण माया उगाचच ब्रह्माच्या माथी मारते. म्हणजे मायेमुळे या गुणांचा आरोप ब्रह्मावर केला जातो. घट, मठ, इत्यादींमुळे एकच आकाश हे घटाकाश, मठाकाश व महदाकाश असे तीन प्रकारचे मानले जाते, त्याप्रमाणे माया खरी मानली म्हणजे ब्रह्मावर वरील तीन गुणांचा आरोप होतो. जोपर्यंत माया खरी वाटते तोपर्यंत ब्रह्म हे साक्षी होते (म्हणजे मी 'साक्षीपणाने पाहतो' असे ब्रह्म मानते व त्यामुळे द्वैत येते); पण माया आणि अविद्या यांचा निरास झाला की द्वैत उरत नाही म्हणजे ब्रह्माचे साक्षित्व उरत नाही. (७.५.८-१०).

माया आणि ब्रह्म यांचा विवेक अधिक व्यवस्थित व्हावा म्हणून सहाव्या दशकाच्या संपूर्ण पाचव्या समासात रामदासस्वामी माया आणि ब्रह्म यांतील भेद पुढीलप्रमाणे सविस्तर सांगतात : ब्रह्म निर्गुण, निराकार आहे; माया सगुण, साकार आहे. ब्रह्माला पारावार (अन्त) नाही, मायेला मर्यादा / अन्त आहे. ब्रह्म निर्मळ, निश्चळ आहे; माया चंचळ, चपळ आहे. ब्रह्म केवळ निरुपाधिक आहे; माया उपाधिरूप आहे. माया दिसते, ब्रह्म दिसत नाही. माया भासते, ब्रह्म भासत नाही. माया नाश पावते, ब्रह्म कल्पान्तकाळीसुध्दा नष्ट होत नाही. माया रचते (निर्माण होते), ब्रह्म निर्माण होत नाही. माया खचते, ब्रह्म खचत नाही. अज्ञानी माणसाला माया आवडते, ब्रह्म मात्र आवडत नाही. माया उपजते, ब्रह्म उपजत नाही. माया मरते, ब्रह्म मरत नाही. धारणेने (बुद्धीने) माया धरता येते, पण ब्रह्म मात्र धरता येत नाही. माया फुटते, ब्रह्म फुटत नाही. माया तुटते, ब्रह्म तुटत नाही. माया विटते (विकार पावते), ब्रह्म विटत नाही, ब्रह्म अविनाशी आहे. माया विकारी आहे, ब्रह्म अविकारी आहे. माया सर्व काही करते, ब्रह्म काहीच करत नाही. माया नाना रूपे धारण करते, ब्रह्म हे अरूप आहे. माया पंचभूतात्मक व अनेक आहे. ब्रह्म शाश्वत

आणि एक आहे. माया लहान आहे, ब्रह्म थोर आहे. माया असार आहे, ब्रह्म सार आहे. मायेला अलीकडे व पलीकडे (अंत) म्हणजे स्थल मर्यादा आहे, ब्रह्माला नाही. विश्वात सगळी माया विस्तारली आहे; मायेमुळे ब्रह्मस्थिती आच्छादिली गेली आहे. ब्रह्म आकाशाप्रमाणे निर्मळ आहे, माया पृथ्वीप्रमाणे गढूळ (मलिन) आहे. ब्रह्म सूक्ष्म आहे, माया स्थूलरूपी आहे. ब्रह्म अप्रत्यक्ष (इंद्रियांना अगम्य) आहे, माया प्रत्यक्ष दिसते (इंद्रियगम्य आहे). ब्रह्म सम आहे, माया विषमरूपी आहे. माया लक्ष्य आहे, तर ब्रह्म अलक्ष्य आहे. माया साक्ष (पुराव्याने सिद्ध करण्यासारखी) आहे, तर ब्रह्म असाक्ष आहे. (माया ही तर्काच्या कक्षेत पडत असल्याने) मायेमध्ये पूर्वपक्ष व उत्तरपक्ष असे दोन पक्ष आहेत; ब्रह्मात मात्र तसले पक्ष नाहीत. माया पूर्वपक्ष (= अनेक आणि निरसन करण्यास योग्य) आहे, तर ब्रह्म सिद्धान्त (= एक अबाधित) आहे. माया अनित्य, असत् आहे; ब्रह्म नित्य, सत् आहे. ब्रह्माला कर्म नाही (म्हणजे ते कर्मरहित, निष्क्रिय आहे) व त्याला हेतू नाही; तर माया कर्म करणारी (= क्रियाशील) व हेतूने युक्त आहे. ब्रह्म अखंड घनदाट आहे; माया खंडित, पंचभूतिक व पोचट (पोकळ) आहे. ब्रह्म हे निरंतर (= अखंडपणे) पूर्ण (निघोट) आहे, तर माया जुनी, नाशवंत, अपूर्ण आहे. माया घडते (निर्माण होते, घडविली जाते), ब्रह्म घडत नाही. माया पडते (स्थानभ्रष्ट होते), ब्रह्म पडत नाही, माया बिघडते (बदलते, बाधित होते), ब्रह्म बिघडत नाही, ते जसेच्या तसे राहते. ब्रह्म कायमचे असते (असतच असते), तर माया निरास करताच नाहीशी होते. ब्रह्माला कल्पान्त (= प्रलय,नाश) नाही, मायेला कल्पान्त आहे. माया कठिण आहे, ब्रह्म कोमल आहे. माया लहान आहे, ब्रह्म विशाल आहे. माया नाश पावते, ब्रह्म सर्वकाळी असतेच. जसे बोलावे तशी ब्रह्म वस्तू नव्हे म्हणजे ब्रह्म बोलण्याच्या टप्प्यात येत नाही, तर जसे बोलावे तशी माया असते म्हणजे शब्दांनी मायेचे वर्णन करता येते, व तशी ती असते. काळ (नाश) ब्रह्मापर्यंत पोचत नाही,काळ मायेवर झडप घालतो. अनेक रंगरूपे निर्माण करणे हा मायेचा खेळ आहे (ब्रह्म तसे करीत नाही). माया भंगते वा मोडते, ब्रह्म अभंग आहे, ते जसेच्या तसे राहते. या जगात जितके चल व अचल (चेतन-अचेतन) दिसते आणि बदलत जाते ते सर्व माया आहे; तर (न बदलणारा) परमेश्वर (= ब्रह्म) चराचर विश्वाला आत बाहेर व्यापून आहे. सर्व उपाधीपेक्षा (= विश्वाच्या बंधनापेक्षा) वेगळा असा परमात्मा (= ब्रह्म) आहे (माया तशी नाही). जसे आकाशाचे प्रतिबिंब पाण्यात पडले तरी आकाश

पाण्याला स्पर्श करीत नाही (म्हणजे आकाश अलिप्त असते) तद्वत ब्रह्म हे विश्व व्यापूनही अलिप्त असते (६-५.२-२४). असा ब्रह्म व माया यांमध्ये सर्व बाबतीत फार मोठा फरक आहे.

अशाप्रकारे भाव आणि अभाव, सार व असार, जीव तथा शिव, माया आणि ब्रह्म यांचे यथायोग्य ज्ञान झाले की जन्म मरण संपते (९-४-२४) आणि आपण ब्रह्मरूप होतो.

---

**तळटीपा**

१. तपशीलासाठी पहा : - याच ग्रंथातील चौदा ब्रह्मे व एक मुख्य ब्रह्म हा लेख.

२. परमेश्वर इत्यादी शब्द रामदासस्वामी जसे माया सूचित करण्यास वापरतात, त्याचप्रमाणे निर्गुणब्रह्मासाठीही ते परमेश्वर (७-२-५०), निर्गुणदेव (६-२-२८), ईश्वर (१८-६-१३), आत्मा (६-३-१), परमात्मा (१०-१०-२) इत्यादी शब्द वापरतात. त्यामुळे संदर्भानुसार या शब्दांचा अर्थ घ्यावा लागतो.

३. आकाश, वायू, तेज, जल व पृथ्वी ही पंचभूते होत.

४. याचा खुलासा पुढे योग्य स्थळी येतो.

५. सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण

६. सुख हवे असेल तर रघुनाथाच्या भजनी लागले पाहिजे (३-१०-६३). आयुष्य हेचि रत्नपेटी । माजी भजनरत्ने गोमटी । ईश्वरी अर्पूनिया लुटी । आनंदाची करावी (३-१०-२७), असे रामदास सांगतात.

७. ब्रह्मा विष्णु आणि हर । हे जयाचे अवतार । तोचि देव हा निर्धार । निश्चयेसी (८.१.२१), येक ब्रह्मा विष्णु महेश । ऐकोन म्हणती हे विशेष । गुणातीत जो जगदीश । तो पाहिला पाहिजे (१९.५.२०).

८. कवीबद्दलही रामदास सांगतात की 'हे निरंजनाची खूण । की हे निर्गुणाची वोळखण। माया विलक्षणाचे लक्षण । ते हे कवी ।' (१-७-८). कवी म्हणजे क्रांतदर्शी ऋषी, मुनी, सज्जन.

९. तथापि सदगुरूचे वर्णन करण्याची तीव्र इच्छा असल्याने, मायायोगे मी सदगुरुमहिमा सांगेन (१-४-६) असे रामदास म्हणतात.

१०. विवेकाच्या जोडीने वैराग्यही हवे. संसारातील दु:खामुळे वैराग्य उत्पन्न होते (५-३-३५). आणि 'विषयी वैराग्य उपजले । तयासीच पूर्ण ज्ञान झाले' (५-६-६१).

११. दिसेल ते नासेल । आणि येईल ते जाईल । जे असतचि असेल । तेचि सार ॥ १३-२-२.

१२. जीवशिव पिंडब्रह्मांड । मायेअविद्येचे बंड । हे सांगता असे उदंड । परी आत्मा तो वेगळा ॥ (८-७-४३). ब्रह्मालाच परमेश्वर, परमात्मा, आत्मा अशी नावे आहेत (७-२-५०). आत्म्यासाठी पहा - ८.७.४४-५४.

१३. आधी दृश्य सोडिले । मग शून्यत्व वोलांडिले । मूळमायेपरते देखिले । परब्रह्म ॥ ८-१०-७०

१४. भ्रम म्हणजे 'येक असता येक वाटे । येक सांगता येक निवटे । येक दिसता येक उठे । या नाव भ्रम' ॥ १०.६.२३.

१५. देवपद आहे निर्गुण । ६.९.३२.

१६. जो मनुष्य आंतरनिष्ठ म्हणजे आत्मनिष्ठ झाला आहे, त्यालाच माया ही बाजीगरीसारखी दिसते (१५.१०.३१)

१७. अष्टधा प्रकृति संपूर्ण । नाशिवंत ॥ (१२-३-१९). अष्टधा प्रकृती म्हणजे माया.

१८. सगुण व निर्गुण यांचा खुलासा असा : -चंचळपणे विस्तारले । सगुण ऐसे बोलिले । येर ते निर्गुण ऐसे बोलिले । येर ते अवघेचि जाले । मायेमध्ये (१६.९.१६)

१९. माया म्हणजेच अष्टधा प्रकृती, म्हणून देवाला (ब्रह्म[illegible]) येणारे साक्षित्व हे अष्टधा प्रकृतीमुळे आहे हे ओळखले पाहिजे (११-[illegible]-[illegible]५) असे रामदासस्वामी सांगतात.



## विभाग - २

**१) ब्रह्म व माया हा भेद कोण करते ?** - ब्रह्म सत्य आहे, माया असत्य आहे. गुरूंनी जे ब्रह्म सांगितले ते कळले, तथापि मायेचेही अनुसंधान लागलेले आहे. अंत:करणात ब्रह्म प्रकाशत आहे, पण प्रत्यक्षात माया दिसत आहे. असे हे द्वैत दिसून येते. तेव्हा माया ब्रह्माचे हे द्वैत कोण करते व या द्वैताचे निरसन कसे करावयाचे (७.५.१-२) ? असा प्रश्न श्रोता करतो. त्यावर वक्ते रामदास सांगतात : माया व ब्रह्म या दोघांचेही ज्ञान होते आहे. ठीक आहे. येथे प्रश्न असा आहे:- माया आणि ब्रह्म यांना जाणणारा कोण आहे (७-५-३)? या प्रश्नाचे उत्तर 'मन' असे आहे. म्हणजे असे : मन संकल्प-विकल्प करते. मनाने केलेला ब्रह्माचा संकल्प (विचार) खरा असतो; पण मनाने केलेली मायेची कल्पना[२०] ही खोटी असते; तिला विकल्प म्हणतात. तेव्हा संकल्प-विकल्प, माया-ब्रह्म, हे द्वैत मन[२१] करते (७.५.४). दृश्य हे माया आणि ब्रह्म हे मायातीत अशी कल्पना करून मन खुणेने माया व ब्रह्म या दोन्हीचे अस्तित्व मानते. पण ब्रह्म हे कल्पनारहित आहे हे ज्ञानी माणसे जाणतात. ब्रह्म हे मन व बुद्धी यांना अगोचर, कल्पनेच्या पलीकडे आहे. त्याचा अनुभव आला की द्वैत उरत नाही. जोपर्यन्त द्वैताचा अनुभव येत असतो तोपर्यन्त ब्रह्माचा अनुभव येत नाही. आणि ब्रह्माचा अुनभव[२२] आला की द्वैत उरत नाही. द्वैत आणि अद्वैत या दोन्हीही मनाला भासणाऱ्या कल्पना आहेत. कल्पना फार सामर्थ्यसंपन्न आहे; ही कल्पना ब्रह्म मायेची कल्पना करते. कल्पना मायेचे निवारण करते. तसेच ब्रह्माची स्थापनाही करते (७.५.१५-१८). खरे पाहिल्यास माया व ब्रह्म हे द्वैत नाहीच; ते मनाने कल्पिलेले आहे. आहे ते एकमेव निश्चळ ब्रह्म. ते ब्रह्म·हेच आपले स्वरूप आहे.

**(२) विश्वाचा कर्ता व मायेचा नियन्ता ईश्वर आहे काय ?** - एक शंका अशी आहे:- ब्रह्म निर्गुण व निरवयव आहे. तेथे चराचर विश्व कसे दिसू लागते (८-२-१) ? म्हणजे असे:- देव (=ब्रह्म) जर निर्गुण आहे तर मग सृष्टीचा कर्ता कोण? निर्गुण ब्रह्मात कर्तृत्व नसल्याने ते कर्ता होऊ शकत नाही. तेव्हा सृष्टीचा कर्ता सगुण ईश्वर मानावयास हवा. कारण कर्तेपणा हा गुण आहे. पण देव जर सगुण मानला तर तो नाशवंत ठरतो (८-२-१७). बरे, 'मायोपाधि जगडंबर' (८-१-४३) असे म्हणून जर म्हटले की, माया स्वतंत्र आहे व ती हे विश्व रचते, तर हे म्हणणेही विपरीत ठरते. माया स्वतंत्र आहे, तिला कुणी केलेले नाही, ती स्वत:च विश्वरूपाने विस्तारते, असे मानले तर देवाला काहीच स्थान राहात नाही (८.२.१८.१९). आता, 'देव स्वत:सिद्ध निर्गुण

आहे व त्याचा स्वतंत्र असणाऱ्या मायेशी काही संबंध नाही, असे जर म्हटले तर ते (तुमच्या) अद्वैताला विरोधी होते (८-२-२०). कारण मग निर्गुण देव (= ब्रह्म) आणि माया अशी दोन स्वतंत्र तत्त्वे होतात. मग अद्वैत कुठले? बरे, सगळे कर्तेपण जर मायेकडे असेल तर मग अर्थ असा होतो की, भक्तांचा उद्धार करणारा कोणी देव नाही. आणि देवाशिवाय नुसती माया असेल व तिच्यावर सत्ता गाजविणारा कुणी देव नसेल तर मायेचा लय कोण करील? आम्हा भक्तांना कोण सांभाळील (८.२.२१-२२) ? म्हणून माया स्वतंत्र आहे असे म्हणणे बरोबर नाही. तेव्हा मायेला निर्माण करणारा व तिच्यावर स्वामित्व गाजविणारा एक ईश्वर मानावयास हवाच. तेव्हा तो ईश्वर कसा आहे व मायेचा विचार काय हे आम्हास कळावयास हवे (८.२.२३-२४).

**समाधान :-** वरील शंकेचे समाधान करण्यापूर्वी, ईश्वर आणि माया यांच्या संदर्भात असणारी भिन्न मते रामदास प्रथम अशी देतात : (१) देवाच्या इच्छेने माया झाली. देवाला इच्छा झाली नसती तर माया निर्माण झाली नसती. (२) देव निर्गुण आहे; त्याला इच्छा नाही; म्हणून माया झाली नाही; ती मिथ्या आहे. (३) प्रत्यक्ष दिसणारी माया नाही कशी म्हणता येईल? (तेव्हा माया आहे आणि ती) माया ईश्वराची अनादि शक्ती आहे (४) जर माया खरी असती तर तिचा निरास ज्ञानाने कसा होईल? (ज्ञानाने मिथ्या वस्तूचा निरास होतो म्हणून) माया मिथ्याच आहे. (५) जर माया मिथ्या आहे तर मग तिच्या त्यागासाठी देवाने भक्ती हे साधन[२३] का सांगितले आहे ? तसेच, मायेतून दूर होण्यास अनेक साधने सांगितली जातात; पण मायेला बाजूला सारता येत नाही. तेव्हा माया मिथ्या कशी? (६) योग, पुराणे इत्यादी मायेला मिथ्या म्हणतात; पण नुसते माया मिथ्या म्हटले की लगेच माया सुटत नाही. (७) अज्ञानी माणसाला मायेचे मिथ्या भान खरे वाटते. तेव्हा जो कोणी जसा निश्चय करतो तशी त्याला माया वाटते. (८) कुणी म्हणतात :- माया मुळीच नाही (८.२.२७-३८). असा बराच मतभेद (८-२-५२ पर्यंत) सांगून झाल्यावर, रामदास सांगू लागतात:- वरील शंकेत दोन भाग अपेक्षित आहेत; मिथ्या असणारी माया ब्रह्मात कशी झाली (८-२-५३) ? आणि विश्वाचा कर्ता कोण? या दोन प्रश्नांची उत्तरे पुढीलप्रमाणे आहेत : - निश्चळ ब्रह्मात माया झाली (८-३-२७); तरी ब्रह्माचे मूळचे निर्गुणत्व तसेच राहाते. प्रथमपासून मूळ माया ब्रह्मात नसते. ती निर्माण झाल्यावर जरी ती खरी वाटते तरी ती पुन: लय पावते (८.३.२९-३०).

मूळ ब्रह्मस्वरूपात माया नाही; पण ती खरी आहे असे भासते (८-३-५०). ज्याप्रमाणे निश्चळ आकाशात वारा वाहतो, वारा आकाशात उत्पन्न होतो आणि तेथेच वाहतो, त्याप्रमाणे निश्चळ परब्रह्मात चंचळ माया निर्माण झाल्याचा भास होतो व माया निर्माण झाल्याचा भास हा भ्रम आहे (१०.१०.११) म्हणजेच माया हे अस्तित्वात असणारे असे स्वतंत्र तत्त्व नाही. माया मिथ्या आहे आणि माया स्वत:च मिथ्या असल्याने तिचा सर्व खेळ मिथ्या आहे. ज्याप्रमाणे माणसाच्या चंचळ नजरेला गगनातील आभाळात सेना दिसते; पण ती खोटी असते, त्याप्रमाणे मायेचा खेळ मिथ्या आहे (८.३.५३-५४).

काहीजण म्हणतात की हे सर्व ब्रह्मांड माया निर्माण करते (१३-८-१९); पण वस्तुस्थिती अशी आहे:- मुळात विश्व झालेच नाही. (८-३-१). अद्वैतात द्वैत असत नाही (८-३-८). याचा खुलासा असा:- सर्वकर्त्या परमेश्वराने विश्वाचा विस्तार केला. मूळ परमात्मा अनंत शक्ती निर्माण करतो. अनंत शक्तीनी युक्त असतो तो मूळ पुरुष[२४] म्हणजे मूळ माया, आणि सगळे कर्तेपण मूळमायेत असते (८.३.११-१४); पण ही माया मिथ्या आहे. विश्वात मायेचा विस्तार आहे; पण ती सर्वस्वी खरी नाही (८.३.२१). ब्रह्माच्या दृष्टीने पाहिल्यास हे विश्व लटके (मिथ्या) आहे. तेव्हा लटक्याचा कर्ता कोण हा प्रश्नच चूक आहे (१३.८.३१). वंध्यापुत्राचा बाप कोण अशासारखा हा प्रश्न आहे. विश्व हे स्वभावत: झाले (१३-८-११). ब्रह्मावर विश्वाची[२५] कल्पना केली गेली. ब्रह्म विश्वरूपाने भासते.

**मूळमाया कोठून आली व कोणी केली ?**- निर्गुण अशा मूळ ब्रह्मात माया नव्हती.मग साहजिकच सकळ माया कोठून आली (८-१-५७) असा प्रश्न निर्माण होतो. म्हणून शिष्य गुरूंना विचारतो:- जर मुळात ब्रह्मामध्ये माया नव्हती, तर 'ब्रह्मी माया कैसी जाली' (८-१-५९) ? जर 'येक ब्रह्म निराकार । मुक्त अक्रिय निर्विकार' (८-२-४) आहे तर 'तेथे माया वोडंबर । कोठून जाली' (८-२-४) ? आणि जर ब्रह्म निराकार आहे, तर त्या 'निराकारी कैसी जाली मूळमाया' (८-३-२५) हा प्रश्न निर्माण होतोच.

यावर 'मायोद्भवाचे शोधिले पाहिजे मूळ' (१०-८-२८) असे म्हणून रामदासस्वामी या प्रश्नाचे उत्तर असे देतात :- ब्रह्मा-विष्णू-महेश या तीन देवांनी मूळमाया निर्माण केलेली नाही; कारण हे तीन देव मूळ मायेच्या अलीकडचे[२५] म्हणजे तिच्यानंतरचे आहेत. म्हणजे असे : - मूळ मायेतून[२५] गुणक्षोभिणी माया उद्‌भूत होते व गुणक्षोभिणीपासून त्रिगुणात्मक असणारे ब्रह्मा, विष्णू व महेश हे तीन देव उत्पन्न होतात (१०.२.५-६) या तीन देवांखेरीज अन्य देवही मूळ माया निर्माण करू शकत नाहीत. कारण[२५] त्या

त्या देवांची रूपे ही मूळ मायेमुळेच आहेत. पाच भूतेही माया निर्माण करीत नाहीत; कारण माया ही स्वतःच सूक्ष्म अशा पाच भूतांनी बनलेली आहे. तसेच मायेने मायेला निर्माण केले असेही म्हणता येत नाही; कारण अद्वैत वेदान्तात मायेला निर्माण करणारी दुसरी माया मानलेली नाही (१०.२.१२-१३).

अशाप्रकारे मायेचा अन्य कोणी उत्पादक नसल्याने असे म्हणावे लागते:- ब्रह्मापासून मूळमाया झाली (९-६-२६, १०.४.९). आधी एक नित्यमुक्त, क्रियारहित परब्रह्म होते; तेथे अव्याकृत (अस्पष्ट) व सूक्ष्म अशी मूळ माया झाली (८.२.३). अचंचळ अशा ब्रह्मांत चंचळ माया सूक्ष्म रूपात येते (१५.७.१). निराभास अशा ब्रह्मामध्ये मूळ मायेचा जन्म झाला (१०.३.१). दृष्टांत देऊन सांगावयाचे झाल्यास आकाशात ज्याप्रमाणे आभाळ येते व जाते त्याप्रमाणे ब्रह्मात मूळ माया उत्पन्न होते व लयास जाते (१७.२.७). आकाशात जसा वायू उत्पन्न होतो तशी मूळमाया ब्रह्मात होते (१०.९.१). निश्चळ आकाशात चंचळ वायू निर्माण होतो, त्याप्रमाणे परब्रह्मामध्ये मूळमाया निर्माण होते (८.३.२७). निराकार अशा आकाशात जसा वायूचा विकार होतो[२६] म्हणजे वायूची झुळुक येते, त्याप्रमाणे ब्रह्मात मूळमाया येते (९-६-१).

पण वरील म्हणण्याचा अर्थ असा नव्हे की, परब्रह्माने माया निर्माण केली. कारण परब्रह्माच्या ठिकाणी कर्तृत्व नाही. तसेच, मूळमाया खरी मानली तरच ब्रह्मामध्ये कर्तृत्व येईल; पण माया खरी नाहीच, ती मिथ्या आहे. त्यामुळे ब्रह्मात कसे बरे कर्तृत्व मानता येईल (१०.२.१३-१४) ? तेव्हा ब्रह्मामध्ये माया झाली याचा अर्थ इतकाच आहे की, सनातन असणाऱ्या ब्रह्मात माया हे मिथ्याभान[२७] विवर्तरूपाने भासू लागते (८.२.२)

**मायेचा ब्रह्मावर परिणाम होतो काय ?** - शंका अशी येते जर माया ब्रह्मातच[२८] निर्माण होते व तेथेच तिचा खटाटोप चालतो, तर मायेचा ब्रह्मावर काही परिणाम होतो की नाही? समाधान :- या प्रश्नाचे उत्तर नाही असे आहे. माया आणि तिचा खटाटोप यातील काहीही ब्रह्मस्वरूपात घडत नाही (८-३-५२). म्हणजे माया व तिची क्रिया यांचा निर्गुण ब्रह्मावर काहीही परिणाम घडत नाही. ब्रह्म आहे तसेच निर्गुण, निराकार, निर्विकार, निश्चल व विमल राहते. दृष्टान्ताच्या द्वारा हे पुढीलप्रमाणे स्पष्ट करता येते:- (१) आकाशात वायु निर्माण झाल्यामुळे जसा आकाशाच्या रूपाला धक्का लागत नाही, त्याप्रमाणे ब्रह्मात मूळमाया निर्माण झाली तरी निर्गुण

ब्रह्म तसेच राहते (८.३.२८-२९) (२) आकाशात आभाळ (मळभट) आले. त्या आभाळामुळे आकाश निश्चळ नाही असे जरी भासते / वाटते, तरी तत्त्वत: आकाशाची निश्चळता मुळीच लोपत नाही; त्याप्रमाणे मायेमुळे निर्गुण ब्रह्म सगुण झाले असे भासते/ वाटते, तरी प्रत्यक्षात मात्र तसे काही घडत नाही; निर्गुण ब्रह्म आहे तसेच राहते. गगनात आभाळ झाले आणि गेले तरी त्याचा आकाशावर काहीही परिणाम होत नाही. आकाश आहे तसेच राहाते. त्याप्रमाणे माया आली आणि गेली (म्हणजे नष्ट झाली) तरी निर्गुण असणारे ब्रह्म सगुण होत नाही. ते आहे तसेच निर्गुण राहते (८.३.३७-३९).

याप्रमाणे माया-ब्रह्माविषयीच्या काही शंकांचे निरसन झाले. आता जी मूळमाया ब्रह्मात निर्माण होते व विश्वोत्पत्ती हा जिचा खेळ आहे, त्या मूळ मायेचे स्वरूप काय, इत्यादि भाग आता पुढे दिला आहे.

**मूळ माया म्हणजे काय ?** - निश्चळ ब्रह्मात चंचळ निर्माण होते (१७.१.१). निश्चळ ब्रह्मात उद्भूत होणाऱ्या या[२९] चंचळाला मूळ माया[३०] म्हणतात (१०.१०.५-७). निश्चळ ब्रह्मात हे जे चलन ( = हालचाल, चांचल्य) किंवा चंचळ झाले ते इच्छा, स्फूर्ती किंवा स्मरण या स्वरूपाचे असते (१०.१०.१२). वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास, निश्चळ ब्रह्मात चंचळ म्हणजे निश्चळ अशा ब्रह्मात स्वत:चे[३१] स्मरण स्फुरले (१७.२.६). निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी 'अहं' (=मी) अशी स्फूर्ती (=स्फुरण) झाली (८-३-५१). आणि निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी 'अहं' अशी जी स्फूर्ती येते तीच माया (८-३-५१). निश्चळ ब्रह्मास अहंपणाने होणारी स्वत:ची[३२] जाणीव म्हणजे मूळ प्रकृती[४] (१०.१०.१३). आणि मूळ प्रकृती म्हणजेच मूळ माया (१०.१०.१४). मूळ ब्रह्मात जे पहिले स्फुरण झाले तेच अंतरात्म्याचे म्हणजे मूळ मायेचे स्वरूप आहे (१६-७-४). निराकार ब्रह्मामध्ये स्फूर्तिरूप अहंकार उठला (४.१०.१). ब्रह्मात उठणारा स्फूर्तिरूप अहंकार (=मूळ माया) वायुस्वरूप आहे (४.१०.२) म्हणजे मूळ माया[३३] वायुस्वरूप आहे. वायूत जाणीव असते. ही जाणीव म्हणजेच इच्छा (१०.४.१०) अर्थात ही इच्छा म्हणजे 'अहं बहु स्यां' ही इच्छा वा कल्पना किंवा संकल्प होय. म्हणजे आता असे म्हणता येते की, मूळ ब्रह्मात कल्पना आली (११.१.८-९), ब्रह्मात संकल्प उठला (१२.६-४). निश्चळ परब्रह्मात चंचळ संकल्प[३४] निर्माण झाला (१३-३-३). हा संकल्प[३५] (=जाणीव) म्हणजे मूळ माया (१५.७.२). मूळ माया[३६] संकल्परूप आहे (२०.९.३३). मूळ माया ही मुळात अत्यंत सूक्ष्म कल्पना आहे (२०.२.१९).

वरील भाग रामदासस्वामी निराळ्या शब्दांत असा सांगतात:- मूळ माया वायुस्वरूप

आहे. वायूत जाणीव असते (१०-४-१०). म्हणून वायू आणि जाणीव या दोहोंच्या मेळाव्याला मूळ माया[३७] म्हणावे (१०-९-५). ब्रह्माच्या निश्चळ स्वरूपातील चंचळ स्थिती म्हणजे वायू (१०-९-४). या वायूमध्ये जगज्योती[३८] असते (१०-३-११,१३). म्हणून वायू, जाणीव किंवा जगज्योती यांच्या मेळाव्याला मूळ माया म्हणतात (१०.९-७)

अशाप्रकारे, निश्चळ ब्रह्मात उठणारा चंचळ संकल्प वा कल्पना किंवा स्मरण अथवा स्फूर्ती/अहंकाररूप स्मरण अथवा इच्छा म्हणजेच मूळमाया आहे.

**मूळमायेची अनेक नावे** - निश्चळ वा अचंचळ ब्रह्मात चंचळ निर्माण होते, ते चंचळ म्हणजे माया. या चंचळाला किंवा मूळ मायेला अनेक नावे दिली जातात (१०.१०.५-७). मूळ मायेला शिवशक्ती असेही म्हणतात (१०.१०.७). या शिवशक्तीला अनंत नावे आहेत (५.४.२१). निश्चळ ब्रह्मातील चंचळ म्हणजे मूळ माया इंद्रियगम्य नाही.तथापि त्या चंचळाची थोडीफार कल्पना यावी म्हणून त्याला अनेक नांवे दिलेली आहेत (१०.१०.६). रामदास ही नावे अशी देतात:-

निश्चळ ब्रह्मात निर्माण झालेल्या चंचळाला मूळ माया, मूळ प्रकृती, मूळ पुरुष[३९], शिवशक्ती म्हणतात (१०.१०.७). मूळब्रह्मात जो चंचळ संकल्प उठला, त्याला अर्धनारीनटेश्वर[४०] म्हणतात. त्यालाच पड्गुणेश्वर[४१] म्हणतात. त्यालाच सर्वेश्वर, सर्वज्ञ, साक्षी, द्रष्टा, ज्ञानघन, परेश, परमात्मा, जगज्जीवन, मूळ पुरुष अशी नावे देतात (१२.६.४-५). निश्चळ ब्रह्मातील चंचळ संकल्पाला आदिनारायण म्हणतात (१३.३.३). मुळात जो हरिसंकल्प आहे त्यालाच अर्धनारीनटेश्वर म्हणतात. षड्गुणेश्वर तोच आहे (२०.५.८)

सर्व तत्त्वांत मुख्य तत्त्व असणाऱ्या सत्त्वगुणाला (शुद्धसत्त्वगुणाला) अर्धमात्रा, महत्तत्त्व, मूळमाया म्हणतात (१२.५.११)

निश्चळ ब्रह्मात जे चंचळ निर्माण होते तोच आत्मा[४२]. तो सर्वांच्यापेक्षा श्रेष्ठ असल्यामुळे त्याला परमात्मा म्हणतात. त्यालाच चैतन्य, साक्षी, षड्गुणेश्वर ही नावे आहेत. तो सर्व जगाचा स्वामी असल्याने त्याचे जगदीश्वर असे नाव आहे (१७.१.१-२). जगदीश्वर, मूळमाया यांनाच षड्गुणेश्वर[४३] म्हणतात (१३.३.४.). मूळमाया अथवा मूळ पुरुष यानाच अनंतनामी जगदीश म्हणतात (८.३.२०). मूळमायेलाच पुरुष प्रकृती म्हणतात (१०.९.७.; २०.५.८). पुरुषप्रकृतीलाच शिवशक्ती असे नाव आहे. मूळमायेतील वायूला प्रकृती म्हणतात आणि जगज्ज्योती म्हणजे पुरुष. वायूमध्ये जी विशेष

जाणीव आहे तोच प्रकृतीमधील पुरुष आहे. वायू म्हणजे शक्ती व जाणीव म्हणजे ईश्वर (शिव). त्यालाच अर्धनारीनटेश्वर म्हणतात (१०.९.८-१०). मूळ मायेला अर्धनारीनटेश्वर म्हणतात (२०.५.८).

**लिंगानुसार नावांचे वर्गीकरण** - मूळमायेला असणारी नावे तीनही लिंगात आहेत. लिंगानुसार ही नावे संक्षेपाने अशी सांगता येतील : - (१) स्त्रीलिंगी नावे:- मूळ माया, मूळ प्रकृती (१०.१०.७), गुणेश्वरी (१७.१.३) जगदीश्वरी, परमेश्वरी, विश्वेश्वरी, त्रैलोक्यजननी, जाणीवकळा, जगज्योती, जीवनकळा इत्यादि (१०.१०.२२-२६)

(२) नपुंसकलिंगी नावे:- अंतःकरण, चित्त, चैतन्य, जीवित इत्यादी (१०.१०.३०)

(३) पुल्लिंगी नांवे:- मूळ पुरुष (१०.१०.७), परमात्मा, परमेश्वर, परेश, ज्ञानधन, ईश्वर, जगदीश, जगदीश्वर, जगदात्मा, आत्मा, अंतरात्मा, विश्वात्मा, द्रष्टा, साक्षी, सर्वात्मा, क्षेत्रज्ञ, शिवात्मा, देही, कूटस्थ इत्यादि (१०.१०.१६-१८)

**मूळ मायेची चौदा नावे** - दासबोधाच्या विसाव्या दशकात सूक्ष्म मूळ मायेला चौदा नावे (२०.३.१३; २०.५.११) आहेत असे म्हटले आहे. ही चौदा नांवे पुढीलप्रमाणे दिली जातात : - (१) चैतन्य (२) गुणसाम्य (३) अर्धनारीनटेश्वर (४) प्रकृतिपुरुष (५) शिवशक्ती (६) षड्गुणेश्वर (७) माया (८) अंतरात्मा (९) अर्धमात्रा गुणक्षोभिणी[४४] (१०) शुद्धसत्त्वगुण[४४] (११) सत्त्व[४४] (गुण) (१२) रज[४४] (गुण) (१३) तम[४४] (गुण) आणि (१४) मन (२०.५.६-१०, २०.९.२३-२९). इतक्या प्रकारांनी ज्ञानात्मा म्हणजे आदिसंकल्प अथवा हरिसंकल्प प्रत्ययास येतो (२०.५.१०) असे रामदास म्हणतात.

या चौदा नावांपैकी चैतन्य, अर्धनारीनटेश्वर, शिवशक्ती, षड्गुणेश्वर, अंतरात्मा, माया, मूळ माया, शुद्ध सत्त्वगुण, अर्धमात्रा, गुणक्षोभिणी, प्रकृतिपुरुष ही नऊ नावे वर येऊन गेली आहेत. उरलेली गुणसाम्य, सत्त्व, रज, तम व मन[४५] ही पाच नावे नवीन आहेत.

**काही नावांचे अधिक स्पष्टीकरण** - मूळ मायेचे स्वरूप अधिक स्पष्ट होण्यास वर दिलेल्या नावांतील काही नावांचे स्पष्टीकरण पाहाणे योग्य होईल. (१) आत्मा, अंतरात्मा:-जेथे चंचळपण[४६] असते तेथे अंतरात्मा असतो (२०.६.९). अंतरात्म्याचा उल्लेख रामदास कधी आत्मा या नावानेही करतात. मुळात हरिसंकल्प आहे, तोच सर्वांचा आत्माराम होय (२०.५.६). आत्मा चंचळ आहे (१२.५.१५). जाणीव म्हणजेच अंतरात्मा. जेथे जाणीव असते तेथे अंतरात्मा असतो. ही जाणीव नाना

ठिकाणी भिन्न प्रकारानी व्यक्त होते. प्रकृतिपुरुष, मूळ माया (२०.६.१७), आदिशक्ती, शिवशक्ती, मुख्य मूळ माया, सर्वशक्ती हे सर्व आत्म्याचे (= अंतरात्म्याचे) गुण आहेत (२०.६.२०) म्हणजे हे सर्व जाणीवेचे भिन्न प्रकार आहेत. मूळमायेत जाणीव आहे. मूळ मायेत अंतरात्मा आहे; त्याचा महिमा कळत नाही. (२०.८.१८). अंतरात्मा म्हणजेच सगुणदेव वा ईश्वर होय (१४.९.१३). ब्रह्मा-विष्णू-महेश या तीनही श्रेष्ठ देवांवर अंतरात्म्याची सत्ता आहे (१८.८.७-८). सृष्टीतील सर्व पदार्थांना, मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्वांना चाळवणारा आत्मा आहे (१०.१०.३९). अंतरात्मा[४७] (=परमात्मा) सर्वांच्या अंत:करणात असतो (१०.१०.२७). (२) चैतन्य:-मूळ माया पदार्थांना चेतविते, चेतना देते; म्हणून तिला चैतन्य[४८] म्हणतात (२०.२.२१). निश्चळ ब्रह्मात चंचळ झाले; ब्रह्मामध्ये चंचळ संकल्प उठला, म्हणजेच निश्चळ ब्रह्मात चैतन्य जागे झाले. म्हणून त्या संकल्पास चैतन्य म्हणतात (२०.५.५-७). हे चैतन्य जडाला चेतना देते (२०.९.२३). (३) अंत:करण:-मूळ माया ही संकल्परूप[४८] आहे; तेच[४९] अंत:करणाचे स्वरूप आहे (२०.९.२३). म्हणून मूळ मायेला अंत:करण म्हटले आहे. (४) अर्धनारीनटेश्वर, षड्गुणेश्वर:-प्रकृती[५०] पुरुष, [५१]शिवशक्ती या मिश्रणालाच षड्गुणेश्वर म्हणतात (२०.९.२६); त्यालाच अर्धनारीनटेश्वर म्हणतात (२०.३.१०). मूळ मायेत दोन तत्त्वे आहेत:- त्यातील एकाला प्रकृती वा शक्ती म्हणतात तर दुसऱ्याला पुरुष अथवा शिव म्हणतात. त्या दोन्हीच्या मिश्रणाला अर्धनारीनटेश्वर किंवा षड्गुणेश्वर म्हणतात आणि:- त्रिगुणाकरता जो ईश्वर । अर्धनारीनटेश्वर । सकळ सृष्टीचा विस्तार । तेथून जाला ।। (१.३.१,२५) असे आहे. (५) जाणीवकळा:-मूळ मायेत जाणीव आहे म्हणून जाणीवकळा हे नाव; हाच खुलासा जगज्योती आणि जीवनकळा या नावांच्या बाबतीत आहे. (६) त्रैलोक्यजननी :- मूळ माया ही त्रैलौक्याच्या उत्पत्तीला जबाबदार आहे; म्हणून हे नाव, याच्या अनुषंगानेच जगदीश्वरी, विश्वेश्वरी, परमेश्वरी ही नावे आहेत. (७) मूळ प्रकृती (अष्टधाप्रकृती):- मूळ मायेला मूळ प्रकृती हे नाव आहे. कारण तीच विश्वाचे मूळ कारण आहे. या मूळमायेलाच अष्टधा प्रकृती हा पर्यायी शब्द रामदास वापरतात हे पुढील गोष्टींवरून स्पष्ट होते. पंचभूते आणि त्रिगुण यांचे मिश्रण असणारी मूळ माया ब्रह्मात निर्माण होते; तिलाच अष्टधाप्रकृती म्हणतात (१०.४.९). मूळ मायेतच अष्टधाप्रकृतीचा विचार येतो (१३.३.४; २०.२.२२). मूळ ब्रह्मात जी कल्पना आली ती मूळमाया; मुळात अष्टधा प्रकृती कल्पनारूप होती; पुढे तीच फोफावली

(११.१.७,९). (८) सत्त्व, रज, तम, गुणसाम्य:- सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांचे मिश्रण (कर्दम) मूळमायेत असते (२०.३.९). मूळमायेतून पुढे हे तीन गुण प्रगट होतात; म्हणून ही तीन गुणांची नावे मूळमायेची नावे आहेत (२०.५.९). तसेच, ज्या अवस्थेत सत्त्व-रज-तम हे तीन गुण समान असतात, ती [५२]गुणसाम्य अवस्था होय (२०.९.२४). मूळ मायेत गुप्त अथवा सूक्ष्म रूपाने असणारे गुण साम्यावस्थेत असतात म्हणून गुणसाम्य हे नाव मूळमायेला लावले जाते (२०.२.२५). ब्रह्मातला मूळ संकल्प म्हणजे मूळमाया; मूळ संकल्पात गुणांचे प्रमाण समान असते म्हणून त्यास गुणसाम्य म्हणतात (२०.५.७).

मूळमायेत गूढ रूपाने असणाऱ्या गुणांच्या साम्यास-गुणसाम्यास - संकेताने (खूण म्हणून) महत्तत्त्व म्हणतात (२०.२.२३). जेथे सत्त्व रज व तम हे तीन गुण मिश्रित व गूढ रूपात असतात, त्याला महत्तत्त्व म्हणतात (२०.३.९). जेथे तीन गुण गूढरूपाने असतात त्याला महत्तत्त्व म्हणतात; त्यालाच अर्धमात्रा, शुद्धसत्त्वगुण व गुणक्षोभिणी म्हणतात (२०.९.२७). या स्पष्टीकरणाने गुणेश्वरी या नावाचेही स्पष्टीकरण होते.

**मूळमायेचे स्वरूप** - मूळ परब्रह्मात जो पहिला मूळ-संकल्प उठला तो जाणीवरूप आहे; म्हणून मूळमाया[५३] जाणीवरूप (१५.७.२; १०.१०.१५; ९.८.२६) वा जाणीवमय (२०.२.१९) आहे. मूळमायेतील जाणीवेला जरी अनेक नावे आहेत तरी मूळ जगज्ज्योती एकच आहे (१०.१०.३२).

निश्चळ ब्रह्मात उठणारा स्फूर्तिरूप अहंकार हा वायुस्वरूप आहे (४.१०.१-२). म्हणजे मूळमाया वायुस्वरुप आहे (९.६.८; १०.३.२). वायू भासतो पण त्याचे रूप कळत नाही; त्याप्रमाणे माया भासते पण तिचे रूप कळत नाही (८.३.३१). खरे म्हटले तर वायु दाखविता येत नाही; वाऱ्याकडे पाहिले तर केवळ धूळच दिसते; त्याप्रमाणे मूळ माया भासते[५४] पण दिसत नाही (८.३.३२-३३). कारण मूळमाया[५५] सूक्ष्म आहे (१०.३.१८).

स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे पिंडात चार तसेच ब्रह्मांडात चार मिळून[५६] आठ देह[५७] आहेत (८.७.४०-४१). ब्रह्मांडात ईश्वराला चार देह आहेत (१०.१०.१५). मूळमाया म्हणजे ब्रह्मांडातील चौथा देह (१७.३.२०) म्हणजे[५८] महाकारण देह आहे (२०.३.१२). म्हणजे सर्व देहांत आठवा देह मूळमाया आहे (११.४.११; १३.२.१९). अशाप्रकारे मूळप्रकृती म्हणजे मूळमाया हा ब्रह्मांडातील महाकारण देह आहे (१०.१०.१३).

मूळमायेत आदिशक्ती, शिवशक्ती इत्यादी सर्व शक्ती असतात (१७.२.९). मूळ पुरुष (= मूळ माया) अनंत शक्ती निर्माण करतो (८.३.१३). सगळ्या सृष्टीचे सूक्ष्म बीज मूळमायेत आहे (२०.२.२०)

शारदेची स्तुती करताना रामदास तिला 'माया' (१.३.१३), 'वैष्णवी माया' (मोहात पाडणारी माया) (१.३.२३) अथवा 'महामाया' (१.३.१) म्हणतात व तिचे वर्णन करताना ते सांगतात. (शारदारूपी) मूळमाया अनंत ब्रह्मांडे निर्माण करते व नष्ट करते (१.३.१५; १.३.६). ती अनंत ब्रह्मांडांना झाकणारी म्हणजे आपल्या पोटात सामावून घेणारी आहे. आलंकारिक भाषेत सांगायचे झाल्यास, आपल्याला कल्पना येणार नाही अशा विलक्षणपणाने पसरत जाणारी वेल म्हणजे माया आहे; तिच्यावर फुलांच्या रूपात अनंत ब्रह्मांडे लगडलेली असतात (७.१.१०). ती ब्रह्मदेव इत्यादि देवांची जननी आहे (१.३.१५). ती दृश्यरूपाने भासमान होते. (१.३.२४)

मायेवाचून भजन व भक्तिभाव यांना स्थान नाही (१.३.२५); कारण मायेमुळे द्वैत आहे. माया ही द्वैताची जननी असून ती स्वत: मात्र अद्वैताची खाणी आहे (७.१.९); कारण ती परब्रह्मापासून कधीच वेगळी असत नाही. (शारदारूपी) मूळमाया ही मूळ पुरुषाची कन्यारूपाने जननी आहे (७.१.१०). म्हणजे असे:-ती मूळपुरुषापासून म्हणजे परब्रह्मापासून जन्म घेते म्हणून ती त्याची कन्या आहे; नंतर ती ब्रह्माला साक्षी बनविते म्हणून ती त्याची माता होय.

मूळमाया ही नाना कल्पनारूप आहे; तिची अनेक सूक्ष्म रूपे आहेत; ती सूक्ष्म असून मिश्रणरूप आहे (२०.५.४-५). मूळमायेत पाच भूते आणि तीन गुण एकमेकात मिसळलेले आहेत. मुळात म्हणजे मूळमायेत तीन गुण व पाच भूते यांचे मिश्रण आहे; तेथे ते सूक्ष्म आणि एकरूप आहेत (९.६.१४-१५). मूळमायेमध्ये तीन गुण व पाच भूते कशी याचे स्पष्टीकरण असे:- निश्चळ ब्रह्मात स्वत:चे स्मरण स्फुरले; ते चित्स्वरूप-चैतन्य-आहे अशी कल्पना केली गेली; त्या स्मरणात गुणांचा समतोल असल्याने तेथे गुणसाम्य असते. (१७.२.६). तसेच, मूळमाया ही वायुस्वरूप आहे (९.६.८). हा वायू म्हणजे मूळमाया पंचभूतांनी युक्त असतो (८.४.४१). म्हणून मूळमाया ही पंचभूतिक (पाच भूतांनी युक्त) आहे. (८.३.५८,६०;८.४.७). अशी ही मूळ माया आहे.

**तळटीपा**

२०. तथापि माया कल्पनेसी दिसे । ८.८.४७

२१. एकीकडे ब्रह्माचे ज्ञान व दुसरीकडे मायेचे सुद्धा ज्ञान असणारी तुर्या अवस्था आहे. तुर्या ही अवस्था ब्रह्म व माया दोन्ही जाणते. म्हणून तिला सर्वसाक्षिणी अवस्था म्हटले जाते (७.५.५; ७.४.४९).

२२. ज्या ज्ञानात वृत्तीला स्थान नाही ते खरे ब्रह्मज्ञान; ते पूर्ण समाधान देते; ते ज्ञान झाले की ब्रह्म व माया यांचे चिंतनच संपते (७.५.१४).

२३. भगवान कृष्ण सांगतात : दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया । मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ भगवद्गीता ७.१४.

२४. गुरुलिंगगीतेत (१.६१) श्रीनिंबरगीकर महाराज सांगतात:- विश्वाच्या उत्पतीला कर्ता असा कोणीच नाही; परंतु ती हरीच्या ठिकाणी कल्पनेने निर्माण झाली आहे.

२५. पुढे विश्वोत्पत्तीचा भाग पहा.

२६. ऐसी आत्मस्थिती संचली । तेथे माया कैसी जाली । जैसी आकाशी वाहिली । झुळूक वायूची ॥ ६.३.१२

२७. विवर्त:- स्वत:च्या स्वरूपाचा त्याग न करता जेव्हा त्या वस्तूची वेगळ्या स्वरूपात मिथ्याप्रतीति (मिथ्याभान) येते तेव्हा तेथे विवर्तभाव असतो. उदा.रज्जूवर होणाऱ्या सर्पाच्या भानामध्ये रज्जू ही स्वत:च्या स्वरूपाचा त्याग न करता सर्पाकाराने मिथ्या भासते.

२८. भ.स.श्री. राम गोविंद केळकर ऊर्फ श्रीदासराममहाराज आपल्या एका अभंगात म्हणतात- ब्रह्मावरी झाली माया ।

२९. तुझी माया हे चंचळ । करी विश्वाचा खेळ ॥; चंचळ ते माया निश्चळ ते ब्रह्म (श्रीदासराममहाराज).

३०. मूळमायेच्या आत्मा, मूळप्रकृती, इत्यादी नावांसाठी पुढे पहा.

३१. हे स्मरण म्हणजे मूळमाया आहे. मूळमायेपासूनच सर्व देवतांची उत्पत्ती आहे. म्हणून रामदास सांगतात:- हे स्मरण सर्व देवतांचे मूळ आहे; या स्मरणाचे अंश म्हणजे नाना देवता आहेत (१९.५.५)

३२. अहं बहु स्यां । (मी पुष्कळ व्हावे) अशी अहंपणाने ब्रह्माला इच्छा झाली. ही मूळप्रकृती (=मूळमाया) ब्रह्मांडाचा महाकारण देह आहे (१०.१०.३)

३३. चंचळता झाली वायुरूप माया । श्रीदासराममहाराज.

३४. पहा:- मूळसंकल्प तो हरिसंकल्प (२०.४.१९); मूळमायेचे सेवटी । हरिसंकल्प मुळी उठी (१७.३.२५); मग त्या पलीकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण (१७.३.२६);

हरिसंकल्प मुळी होता (१८.४.२८). मग या मूळ हरिसंकल्पाप्रमाणेच मूळमायेचा खटाटोप चालतो (२०.४.१९)

३५. तेथेच षड्गुणेश्वर ईश्वराची ओळख घडते; त्यालाच प्रकृतिपुरुष, शिवशक्ती, अर्धनारीनटेश्वर अशी नावे आहेत (१५.७.२-३)

३६. मुळीच्या संकल्पाचा आरोप । मूळमाया । (२०.५.५)

३७. मूळमाया हा शब्द स्त्रीलिंगी आहे; म्हणून स्त्रीची कल्पना येते; पण वायू ही कल्पना मुख्य आहे:- जसे सरिता हा स्त्रीलिंगी शब्द असल्याने स्त्रीची कल्पना येते; पण सरिता म्हणजे स्त्री नसून पाणीच आहे. तसे मूळमायेच्या बाबतीत जाणावे (१०.९.६)

३८. मूळमायारूप वायूतील जाणीव हा जगज्योतीचा मूळ झरा होय (१०.९.५). जगज्जोतीचा खुलासा पुढे येतो.

३९. मूळपुरुष=मूळमाया (८.३.१४,२३)

४०. निर्गुण ब्रह्मामध्ये जो (संकल्परूप) गुणविकार उत्पन्न झाला तोच षड्गुणेश्वर, तोच अर्धनारीनटेश्वर (१७.२.८)

४१. शिवशक्ती व प्रकृतिपुरुष यांचा विचारही तोच आहे (२०.५.८)

४२. अविद्या जड आत्मा चंचळ (१३.७.६); ब्रह्म निराकार निश्चळ । आत्म्यास विकार चंचळ (१८.८.१)

४३. अष्टधा प्रकृतीचा विचार तेथेच आहे (१३.३.४)

४४. शुद्ध सत्त्वगुणाची कल्पना, अर्धमात्रा गुणक्षोभिणी, तिच्यातून पुढे प्रकट होणारे सत्त्व-रज-तम हे तीन गुण ही मूळमायेचीच नावे आहेत (२०.५.९)

४५. मन म्हणजे चित्त असे घेतल्यास, चित्त हे नाव मागे येऊन गेले आहे.

४६. जड अनात्मा चेतवी आत्मा । सर्वी वर्ते सर्वात्मा । अवघा मिळोन चंचळात्मा । निश्चळ नव्हे।। १३.७.९.

४७. अंतरात्म्याचे हे स्पष्टीकरण विश्वात्मा, सर्वात्मा, जगदात्मा, जगदीश, ईश्वर, परमेश्वर इत्यादींच्या बाबतींतही समान आहे.

४८. चैतन्य, संकल्प, अंत:करण देहातही असतात (२०.९.२३). पिंडातही मन, माया, अर्धनारीनटेश्वर, इत्यादि आहेत (२०.९.२५,२९).

४९. अंत:करणाचे स्पष्टीकरण मन व चित्त यांनाही लागू पडेल.

५०. पुरुषइच्छेमध्ये प्रकृती । प्रकृतीमध्ये पुरुषव्यक्ती । प्रकृति पुरुष बोलती । येणे न्याये ।। १६.७.४०.

५१. तसेच :- मूळी शिवशक्ती खरे । पुढे जाली वधूवरे । चौऱ्यांशी लक्ष विस्तारे । विस्तारली जी ।। १७.२.३३.

५२. समान गुण गुणसाम्य (२०.९.२४); सूक्ष्मरूपे गुणसौम्य । त्यास बोलिजे गुणसाम्य (२०.३.११)

५३. वासना जाणीजे जाणीव हेत । जाणीव मुळीचा मूळतंत । मूळमायेत असे निश्चित। कारणरूपे ।। ९.८.१३.

५४. जेव्हा अविद्या-माया विस्तारते (८.३.३२-३३), तेव्हा ती दृश्यरूपाने (सृष्टिरूपाने) जडत्वात येते (११.१.९).

५५. मूळमाया=प्रकृतिपुरुष सूक्ष्म आहेत (१७.३.१८).

५६. आठ देहांसाठी पहा:- ९.५.४. या आठ देहांत प्रकृती व पुरुष हे दोन मिसळले तर एकूण दहा देह होतात (८.४.४१).

५७. देहापेक्षा साक्षी आत्मा वेगळा असतो (८.७.४२). पिंडामध्ये जीव हा देह धारण करणारा आहे तर ब्रह्मांडात शिव हा देह धारण करणारा आहे (१३.१.२४).

५८. तैसेचि ब्रह्मांडेविण काही । मूळमायेसी जाणीव नाही । ९.७.२.



# विभाग - ३

**विश्वोत्पत्ती व विश्वसंहार** - मूळमाया ही विश्वोत्पत्तीचे आणि तदनुषंगाने विश्वनाशाचे मूळ कारण आहे. म्हणून आता विश्वाची उत्पत्ती व प्रलय यांचा विचारही आवश्यक ठरतो. तो पुढे दिला आहे.

**विश्वोत्पत्तीपूर्वी** :- निर्गुण, निश्चळ, ब्रह्म हे एकमेव सत्य आहे. ब्रह्मात मुळात माया नव्हती (८.३.५०). मायाच नसल्याने तेथे सृष्टीही नव्हती (६.६.१.). चंचळ मूळमाया निर्माण होण्यापूर्वी ब्रह्म निश्चलपणे असते (२०.२.१). नंतर निश्चळ अशा परब्रह्मात प्रथम चंचळ मूळमाया निर्माण झाली आणि मग निश्चळ ब्रह्मामध्ये / ब्रह्मापासून विश्वनिर्मितीला (भूगोल) प्रारंभ झाला (१३.३.२).

**विश्वोत्पत्तीचा आराखडा** - मूळमायेपासून होणाऱ्या विश्वोत्पत्तीचा वृत्तांत दासबोधात कमी जास्त विस्ताराने अनेक ठिकाणी[५९] आलेला आहे. त्याचा तपशील देण्यापूर्वी विश्वाच्या उत्पत्तीचा ढोबळ आराखडा आपल्या दृष्टीपुढे असावा म्हणून तो येथे दिला आहे.

प्रथम ब्रह्म असते. ब्रह्मात मूळमाया होते. मूळमायेपासून गुणमाया होते. गुणमाया ही सत्त्व, रज, तम हे तीन गुण प्रगट करते. सत्त्व म्हणजे जाणीव (तो विष्णू). रज म्हणजे जाणीव व नेणीव (तो ब्रह्मदेव). तम म्हणजे नेणीव (तो रुद्र). तमोगुणापासून आकाश, वायू, तेज, जल व पृथ्वी ही पंचमहाभूते उद्‌भूत होतात. मग पृथ्वीवर वनस्पती, प्राणी इत्यादी उत्पन्न होतात. पंचभूतांच्या कमी जास्त मिश्रणाने सर्व चराचर सृष्टीचा उद्‌भव होतो.

**मूळमायेतून विश्वोत्पत्ती** - ब्रह्मांड अथवा सृष्टी निर्माण होण्यापूर्वी मूळमाया होती; त्यावेळी सप्तकंचुक ब्रह्मांड नव्हते; ब्रह्मा-विष्णू-महेश, पृथ्वी, मेरू, सप्तसागर हे सर्व मूळमायेनंतरचे आहेत (८.४.४७-४९). विश्वनिर्मिती हा [६०]मूळमायेचा खेळ, लीला आहे (९.६.३३). मूळमाया ही लोकजननी आहे (१०.२.६). मूळमायेकडेच सर्व कर्तृत्व आहे (८.३.१४). मूळमायेत अनंत शक्ती आहेत (८.३.१९). त्या अनंत शक्तीतून दृश्य व व्यक्त पदार्थ उद्‌भूत होतात (१७.२.९). सगळ्या सृष्टीचे सूक्ष्म बीज मूळमायेत असते (२०.२.२०). वडाच्या बीजात वटवृक्ष असतो, पण दिसत नाही. कारण तो सूक्ष्म असतो; पण त्यातूनच प्रचंड वटवृक्ष होतो. त्याप्रमाणे मूळमाया बीजरूप आहे; तिच्यापासून विश्वाचा विस्तार होतो (१०.९.२-३). विश्व म्हणजे मायेचा विकार व विस्तार आहे (११.२.१०).

मूळमायेला मागे पाहिल्याप्रमाणे अनेक नावे आहेत. त्यातील आत्मा, अंतरात्मा, जगदीश्वर, परमेश्वर यांचा निर्देश करून त्यांच्यापासून सृष्टी होते, असेही रामदासस्वामी सांगतात. उदा. (१) मूळमायाच नाना विकारांचे[६१] मूळ आहे (१५.७.१), नाना प्रकारचे जीव मूळमायेच्या गुणाने होत असतात (१५.८.१६-२५). मायादेवीने पंचभूतांच्या द्वारा केलेल्या गडबडीत सूक्ष्म तत्त्वांमध्ये कोणीच लक्ष घालीत नाही (१७.३.१९). (२) अंतरात्मा:-[६१] सकळ देवांचे मूळ । तो हा अंतरात्माची केवळ (१८.१.१६). (३) आत्मा:-मूळापासून सेवटवरी । सकळ काही[६१] आत्माच करी । आत्म्यापैलीकडे निर्विकारी । परब्रह्म ते ।। (१६.७.१३). (४) जगदीश्वर:- जितुके काही निर्माण झाले। तितुके जगदीश्वरे निर्मिले ।। (१८.२.२६). (५) परमेश्वर/ईश्वर:- स्तंभेविण उभारली । ऐसी विचित्र कळा केली । त्या नाव देव (८.१.२८); परमात्मा परमेश्वरु । सर्वकर्ता जो ईश्वरु । तयापासूनि विस्तारु । सकळ जाला (८.३.१२); विचित्र भगवंताची करणी । तेणे केली उभारणी । अनंत ब्रह्मांडांची (८.३.११).

**मूळमायेतील मिश्रण** - मूळमायेमध्ये तीन गुण व पाच भूते यांचे मिश्रण असते; तेथे ते सूक्ष्म व एकरूप असतात (९.६. १४-१५). मूळमायेत सूक्ष्मपणाने पंचभूते आणि त्रिगुण असतात (१५.७.९). विश्वनिर्मितीचा मूळ मायेचा खेळ पाहिला तर कळून येते की, ती पंचभूते व तीन गुण यांनी बनलेली आहे (९.६.३३). मूळमाया वायुस्वरूप आहे (९.६.८; १०.४.१०); त्या वायूमध्ये पाच भूते आणि तीन गुण असतात (१०.९.१; १०.३.२). हीच गोष्ट वेगळ्या शब्दांत अशी सांगितलेली आहे : -

ब्रह्मात प्रथम चंचळ संकल्प उठला. त्या संकल्पात असणारी चंचळपण आणण्याची शक्ती म्हणजे वायू आहे. हा वायू तीन गुण आणि पंचभूते आणतो. याचा अर्थच असा की, चंचळपणात म्हणजेच मूळमायेत प्रथमापासूनच तीन गुण आणि पंच भूते असतात (१५.७.४). तीन गुण व पंच भूते यांचे हे सूक्ष्म मिश्रण म्हणजेच विश्वाच्या पसाऱ्याचे सूक्ष्म बीज होय.

**मूळमायेतील पंच भूते** - मूळमाया वायुस्वरूप आहे (९.६.८). या सूक्ष्म वायूचा शोध घेतला तर त्यामध्ये सूक्ष्म पंच भूते दिसतात (८.४.४०). अशा प्रकारे पंच भूते बीजरूपाने म्हणजे सूक्ष्मरूपाने मूळमायेत असतात (९.६.२). मूळमायेत पंच भूते असतात हे रामदास पुढीलप्रमाणे दाखवितात :-

अहं बहु स्यां हा ब्रह्मात उठलेला चंचळ संकल्प म्हणजे मूळमाया. इच्छा ही चांचल्यामुळे येते; चांचल्य हा वायूचा गुण आहे; म्हणून मूळमायेत वायू आहे. शब्द हा

आकाशाचा गुण आहे; ब्रह्मातील अहं हे स्फुरण ॐकाराच्या नाद - शब्द-रूपाने प्रगटते; म्हणून मूळमायेत आकाश आहे. उपर्युक्त इच्छेला बळ वा सामर्थ्य प्राप्त होते; बळ हा तेजाचा गुण आहे; म्हणून मूळमायेत तेज आहे. या इच्छेतील मृदुत्व तेच जळ; मृदुत्व हा जलाचा गुण आहे; म्हणून मूळमायेत जल आहे. इच्छेनंतर जड पदार्थ निर्माण होतात; जडत्व हा पृथ्वीचा गुण आहे; म्हणून मूळमायेत पृथ्वी आहे (८.३. ५९-६०).

ही पाच भूते आकाराला येऊन वेगळी दिसू लागली तरी ती एकमेकात मिसळलेली[६२] असतातच (९.६.२२). पंचभूते ही व्यक्त असोत अथवा अव्यक्त असोत, स्थूल असोत किंवा सूक्ष्म असोत, एकेका भूतात पंचभूते असतातच (८.३.६१-६२).

मूळमाया वायुस्वरूप आहे, वायूत जाणीव असते (१०.४.१०). जेथे चलन नसते तेथे जाणीव नसते. जेथे चलन असते तेथे जाणीव[६३] असते. वायू हा चलनात्मक आहे; म्हणून चलनात्मक वायूचा म्हणजे मूळमायेचा जाणीव हा गुण आहे (९.६.१३) म्हणजे मूळमायेत[६४] जाणीव आहे. मूळमायेच्या या जाणीवेमुळेच, जाणीव नेणीवेचा म्हणजे ज्ञान-अज्ञानाचा विचार करण्याचा प्रसंग येतो. म्हणजे वायूमुळे (= मूळमायेमुळे) जाणीव[६५] व नेणीव यांना स्थान प्राप्त होते (९.६.११-१२). कारण जाणीव म्हटले की, तिच्या मागोमाग सापेक्षतेने नेणीव येतेच.

मूळमायेत जाणीव आहे. साहजिकच तिच्या घटकभूत असणाऱ्या पंच भूतांतही जाणीव असतेच. पंच भूतांत जाणीव कशी असते या संदर्भात रामदास सांगतात :-

जाणीव म्हणजे हेतुपूर्वक किंवा ज्ञानपूर्वक हालचाल. जाणीव हे वायूचे लक्षण आहे. वायूत सगळे गुण असतात. म्हणून जाणीव व नेणीव यांच्या मिश्रणाने पंच भूतांचा प्रवास चालू असतो. म्हणून पंच भूतांत जाणीव आहे. आणि ही जाणीव सूक्ष्मपणे वा स्थूलपणे कुठे स्पष्ट दिसते तर कुठे स्पष्ट दिसत नाही. जसे वायू वाहात नाही तेव्हा तो आहे असे वाटत नाही, तसे सुप्तरूपाने असणारी जाणीव दिसत नाही; पण सूक्ष्मरूपाने ती पंच भूतांत असतेच (९.६.१८-२३).

**मूळमायेतील गुण** - मूळमायेला शुद्ध सत्त्वगुण नाव आहे (२०.९.२७). तर शुद्ध सत्त्वगुणसुद्धा मूळमायेत असतो असेही रामदास सांगतात (२०.२.२३). जेथे सत्त्व, रज व तम हे तीन गुण गूढरूपाने असतात त्याला महत्तत्त्व अथवा शुद्धसत्त्वगुण म्हणतात (२०.९.२७). मूळमायेत सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असतात.

जाणीव आणि नेणीव ही गुणांची लक्षणे आहेत (२०.३.६). जाणीव, नेणीव आणि जणीव-नेणीव हे अनुक्रमे सत्त्व, तम आणि रज या गुणांचे लक्षण आहे (९.६.३८). मूळमायेतील जाणीव म्हणजे सत्त्वगुण, नेणीव म्हणजे तमोगुण, आणि त्या दोहोंमधला म्हणजे जाणीव-नेणीव यांनी युक्त (९.६.३) म्हणजे त्या दोहोंचे मिश्रण असणारा रजोगुण आहे (२०.३.७).

मूळमायेत सूक्ष्मरूपाने सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असतात. मूळमायेत गुप्तपणाने म्हणजे सूक्ष्मपणाने असणारे हे तीन गुण साम्यावस्थेत असतात (२०.२.२५). विश्वोत्पत्तीच्या वेळी ही त्रिगुणांची साम्यावस्था ढळते. याचे कारण असे:-

मूळमाया वायुस्वरूप आहे. पंच भूतांनी युक्त असा वायू म्हणजेच मूळमाया (८.४.४१). मूळमायेचे चलन (=हालचाल, शक्ती) हे वायूचे लक्षण आहे. वायूतील या शक्तीमुळे हालचाल निर्माण होऊन सूक्ष्म तत्त्वे स्थूलत्वाप्रत / जडत्वाप्रत जाऊ लागतात (८.३.५६) आणि क्रमाने सृष्टिरचना होते. विश्व म्हणजे तीन गुण व पाच भूते यांचा अवाढव्य असा खटाटोप आहे (९.६.५३). पाच भूतांनी युक्त असणारी मायाच सर्वत्र विस्तारली आहे (८.३.६२)

**गुणमाया अथवा गुणक्षोभिणी माया** - मूळमायेतून विश्वाचा अंकुर फुटत असताना, जो पहिला विकार होतो तो म्हणजे गुणमाया अथवा गुणक्षोभिणी माया. मूळमाया बहुगुणी आहे, अधोमुख होऊन तीच गुणक्षोभिणी बनते. (१२.६.६). मूळमायेतील गुणांची साम्यावस्था ढळून, मूळमायेत गुणांचा थोडा विकार झाला की तिला गुणक्षोभिणी माया म्हणतात (९.६.८). हीच गोष्ट रामदासस्वामी भिन्न शब्दांत अशी सांगतात:-

मूळमायेपासून गुणक्षोभिणी माया निर्माण होते (८.४.२; १०.२.६). मूळमायेतून आणि एक माया उद्‌भवली. तिने गुणाना जन्म[६६] दिला म्हणून तिला[६७] गुणक्षोभिणी माया म्हणतात (८.४.२). ज्या मायेतून गुण[६८] प्रगट होतात तिला गुणक्षोभिणी म्हणतात (२०.२.२४) अथवा मूळमायेपासून गुणमाया झाली (९.६.२६). मूळमायेत तीन गुण प्रगटताच ती गुणमाया होते (११.१.९). म्हणजे गुणक्षोभिणी माया आणि गुणमाया हे दोन्ही शब्द समानार्थी आहेत.

**गुणमायेलाही अष्टधा प्रकृती हे नाव** - गुणमायेलाही अष्टधा प्रकृती हे नाव आहे ही गोष्ट रामदासकृत अष्टधा प्रकृतीच्या पुढील वर्णनावरून कळून येते. (१) मूळमाया ही अष्टधा प्रकृतीचे मूळ आहे (२०.२.२०). मुळात हरिसंकल्प होता; तो संकल्प म्हणजे मूळमाया, आणि संकल्प हे अष्टधा प्रकृतीचे मूळ आहे (१८.४.२७-२८). (२) मूळ

ब्रह्मात जी कल्पना आली तीच मूळमाया (११.१.८-९). कल्पना म्हणजे निश्चळ ब्रह्मातील चंचळ. कल्पना हे अष्टधा प्रकृतीचे मूळ आहे. साकार झालेली कल्पना म्हणजे अष्टधा प्रकृती. अष्टधा प्रकृती ही कल्पनेची मूर्ती अथवा मूर्तिमंत कल्पना आहे (११.१.५-६). (३) मूळमाया पंचभूतिक आहे (८.३.६०-६१; ८.४.७). अष्टधा प्रकृतीचे मूळ स्वरूप पंचभूतिक आहे (१२.६.१०).

अष्टधा प्रकृती या नावाचे स्पष्टीकरण असे आहे : गुणमायेत तीन गुण व पंच भूते असतात (९.६.२६-२७). गुणमाया व तिच्यातून उद्‌भवणारे तीन गुण हे पंचभूतिक असतात (८.४.४१). पाच भूतांमध्ये तीन गुण मिसळले की आठ प्रकार होतात, म्हणून अष्टधा प्रकृती हे नांव दिले आहे. अष्टधा प्रकृती पंचभूतिक आहे (८.४.४२). पाच भूते आणि तीन गुण मिळून अष्टधा प्रकृती बनलेली आहे (१२.६.११). तेव्हा तीन गुण आणि पाच भूते हे दोन्ही मिळून आठ तत्त्वे जिच्यामध्ये आहेत तिला अष्टधा प्रकृती म्हणतात (११.१.७).

अशा प्रकारे गुणक्षोभिणी माया, गुणमाया व अष्टधा प्रकृती हे शब्द समानार्थी आहेत. (मागे पाहिल्याप्रमाणे रामदास मूळमायेलाही अष्टधा प्रकृती म्हणतात. तेव्हा अष्टधा प्रकृतीचा विवक्षित अर्थ त्या त्या संदर्भावरून ठरवावा लागतो हे उघड आहे).

**मूळमायेतून गुणमाया होते म्हणजे काय ?** - मूळमायेत असणारे तीन गुण व पंचभूते गुणमायेत असतातच (९.६.२६-२७). मूळमायेत हे तीन गुण साम्यावस्थेत असतात. आता गुणमाया प्रगटली की मूळमायेत सूक्ष्मरूपाने असणाऱ्या तीन गुणांची साम्यावस्था संपते आणि ते तीन गुण स्पष्ट वा व्यक्त होतात. म्हणून गुणक्षोभिणी / गुणमाया ही तीन गुणांना व्यक्त दशेत आणणारी संधी (=मधली अवस्था) आहे. एक उदाहरण देऊन रामदास ही गोष्ट पुढीलप्रमाणे स्पष्ट करतात:- दाण्यांनी भरलेले कणीस प्रथम बंद असते; ते उकलले की दाणे मोकळे होतात, म्हणजे दाणे स्पष्टपणे दिसू लागतात. त्याप्रमाणे मूळ मायेत तीन गुण असतात, तिच्यापासून होणारी गुणमाया ही त्या तीन गुणांना व्यक्त किंवा स्पष्ट दशेला आणते (९.६.६-७)

गुणक्षोभिणी मायेमध्ये सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण[६९] जन्म पावतात (१३.३.५); गुणक्षोभिणी / गुणमायेतून प्रथम सत्त्व, रज व तम[७०] हे तीन गुण निर्माण झाले म्हणजे[७१] व्यक्त / स्पष्ट झाले (८.४.३; ९.२६; १२.६.६). नंतर या गुणमायेमध्ये सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या मिश्रणाने (९.६.९) विश्वोत्पत्तीची प्रक्रिया सहजपणे सुरू होते.

गुणमायेलाच रामदासस्वामी अष्टधा प्रकृती म्हणत असल्याने, अष्टधा प्रकृतीपासून विश्वाचा उद्‌भव होतो असेही रामदास म्हणतात. अष्टधा प्रकृती फोफावली म्हणजे विस्तार पावली आणि ती विश्वाच्या रूपाने जडत्वास म्हणजे दृश्य जड आकारास आली (११.१.७-८). मूळापासून शेवटपर्यंत सर्व विश्वाची उत्पत्ती अष्टधा आहे (११.१.६). अष्टधा प्रकृतीचा विस्तार झाला व तो सृष्टिक्रमाने दृश्यस्वरूपात आकाराला आला (१२.८.१). म्हणून रामदासस्वामी सांगतात 'सगट माया विस्तारली । अष्टधा प्रकृती फोफावली । चित्रविचित्र विकारली । नानारूपे ।। (१२.२.१०).

आता गुणमायेनंतरचा विश्वोत्पत्तीचा तपशील पाहण्यापूर्वी पुढील दोन गोष्टी लक्षात घ्यावयास हव्यात.

**विश्वोत्पत्तीच्या वृत्तांतातील लक्षणीय गोष्ट** - (१) मूळमायेपासून विश्व उत्पन्न होते. मूळमायेत तीन गुण आणि पंचभूते यांचे मिश्रण असते; तेथे ते सर्व सूक्ष्म व एकरूप असतात; पण त्यांची स्पष्टता होताना मात्र एकातून एक निघाले असा क्रम सांगावा लागतो (९.६.१५). म्हणून मूळमाया वा प्रकृती विस्तार पावू लागली की एकातून एक निर्माण झाले (९.६.३९), असे सांगावे लागते. (२) दासबोधातील विश्वोत्पत्तीच्या हकीकतीमध्ये तीन मिश्र प्रवाहांचा मिलाफ झाला आहे. म्हणजे असे:- आपल्या संकल्पनेप्रमाणे रामदासानी सांगितलेला भाग हा एक प्रवाह. त्याच वेळी पुराणांनी सांगितल्याप्रमाणे विष्णूपासून ब्रह्मदेव व ब्रह्मदेवापासून सृष्टी झाली हा भाग येतो, हा दुसरा प्रवाह. यांच्या जोडीने उपनिषदांनी सांगितलेला भाग म्हणजे आत्म्यापासून आकाश, वायू, तेज इत्यादी सृष्ट्युत्पत्तीचा क्रमही सांगितला गेला आहे; हा तिसरा प्रवाह. या तीन प्रवाहांचा मिलाफ व वर उल्लेखिलेला विश्वोत्पत्तीचा आराखडा या गोष्टी लक्षात ठेवल्या म्हणजे विश्वोत्पत्तीचा वृत्तांत कळण्यात अडचण येत नाही.

**(अ) रामदासांची संकल्पना** - गुणमायेपासून सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण निर्माण होतात (८.४.३; ९.६.२६) म्हणजे तीन गुण स्पष्ट वा व्यक्त होतात. त्यातील तमोगुणापासून[७२] पंचभूते झाली. ही पंचभूते म्हणजे[७३] आकाश, वायू, तेज, जल आणि पृथ्वी ही होत; ही भूते व्यक्त दशेला येतात (१२.६.१०). पुढे त्या पाच तत्त्वांचा म्हणजे पंचभूतांचा विस्तार होतो (८.४.४). या पाच भूतांचा अफाट पसारा होतो (२०.२.२७). पंचभूतांचा विस्तार (१३.६.११) वा पसारा सगळीकडे विस्तारतो (१३.३.६). (येथेच सगळीकडे म्हणजे काय हे नीट लक्षात घ्यावे:- ब्रह्माला सोडून अन्यत्र कुठे तरी विश्वाचा पसारा असत नाही. विश्वाच्या आदी व अंती सत्य असे

ब्रह्मस्वरूप आहे. ब्रह्मात होणारी मूळमाया पंचभूतात्मक आहे; म्हणून पंचभूतेही ब्रह्मामध्ये / ब्रह्मावर असतात (८.३.६४). तेव्हा सगळीकडे म्हणजे ब्रह्मावरच). अशा प्रकारे मुळातली मूळमाया पहा अथवा अविद्यायुक्त भूमंडलावर पहा किंवा स्वर्ग मृत्यू - पाताळ या लोकांत पहा, सर्वत्र पाच भूतांचाच विस्तार आहे (८.३.६३). ब्रह्मगोळ म्हणजे ब्रह्मांड पांचभौतिक आहे (८.४.५७).

तीन गुणांपासून पंचभूते होतात, असेही रामदास कधी म्हणतात. (त्रिगुणांपासून जाली भूते । पावली स्पष्ट दशेते ॥ १३.७.५). म्हणजे असे : मूळमायेतील सूक्ष्म तीन गुण गुणमायेत स्पष्ट होतात. या गुणांमुळेच मूळमायेत असणारी पंचभूते स्पष्ट किंवा व्यक्त दशेला येतात (८.४.४४). इथली कल्पना अशी : - जाणीव-नेणीव हे गुणांचे स्वरूप आहे; जाणीव-नेणीव पंचभूतांतही असते. म्हणून गुणांपासून पंचभूते होतात, असे म्हटलेले दिसते.

अशाप्रकारे, प्रथम सूक्ष्म अथवा अव्यक्त असणारी पंचभूते ही सृष्टिरचनेत व्यक्त झाली (८.३.५७). म्हणजे ती वेगळेपणाने स्पष्ट होऊन दृश्य रूपास आली (९.६.२७). पाच भूते जेव्हा आकाराला आली तेव्हा ती दिसायला वेगळी दिसू लागली (९.६.२२). व्यक्त दशेला आलेली पंच भूते जड होऊन सर्व तत्त्वे बनतात. आणि यापुढील ब्रह्मांडातील तत्त्वरचना लोकांना माहीत आहे (८.४.४४-४५). म्हणजे असे होते : - पाच भूते क्षणोक्षणी बदलत राहतात; एका पदार्थात बदल होऊन दुसरा पदार्थ निर्माण होत राहतो (९.६.५२). दृश्य हे विकारी आहे; त्यात फरक पडत जाऊन नवीन नवीन वस्तू बनत राहतात (९.६.४१). एक पाणी हे तत्त्व घेतले तर त्याचे असंख्य व अपार[७४] विकार झालेले दिसून येतात. अशाप्रकारे पाचभूतांचा विस्तार म्हणजे चौऱ्यांशी लक्ष योनी (९.६.४३).

अशाप्रकारे विश्वाची उभारणी होते (११.१.११). मायेचा हा सर्व दृश्यात्मक पंचभौतिक पसारा गुंतागुतीचा आहे ( सकळ माया गथागोवी । ८.५.७०). या सर्व विस्ताराचे मूळ पंचभूतिक मूळमाया आहे; हा सर्व विस्तार मूळमायेनंतरचा आहे (८.४.५४)

**(आ) पौराणिक कल्पना लक्षात घेऊन** - ब्रह्मात निर्माण होणारी मूळमाया वायुरूप आहे; त्यात जो जाणता आहे तो ईश्वर किंवा सर्वेश्वर होय (१०-४-१६); वायूमध्ये (मूळमायेत) जो जाणीव हा गुण आहे तो ईश्वराचे लक्षण आहे; त्या ईश्वरापासून पुढे तीन गुण होतात (१०.९.११). ईश्वराचा तीन गुणांशी संबंध असतो. तीन गुणांमुळे त्याला तीन अंगे दिसतात; त्या तीन गुणांतून ब्रह्मा, विष्णू आणि महेश हे तीन देव

उत्पन्न होतात (१०.४.१७-१८). म्हणजेच मूळ[७५] मायेपासून ब्रह्मा, विष्णू व महेश हे उत्पन्न झाले (११.१.४). त्यामध्ये[७६] क्रम असा आहे. तीन गुण व्यक्त झाल्यावर, प्रथम विष्णू जन्मास आला; विष्णू म्हणजे शुद्ध[७७] जाणीव वा जाणती कळा किंवा सत्त्वगुण होय; विष्णू हा त्रैलौक्याचे पालन करतो (१२.६.६-७). नंतर जाणीव व नेणीव यांचे मिश्रण असणारा ब्रह्मदेव निर्माण झाला; त्याच्या कर्तृत्वगुणाने तीनही भुवने उत्पन्न होतात. पुढे रुद्रा[७८] चा जन्म होतो; तो तमोगुण आहे; तो सर्व संहाराचे कारण आहे (१२.६-६-९). वेगळ्या शब्दात सांगायचे झाल्यास मूळवायूत - मूळ मायेमध्ये-विष्णू होताच; पुढे त्याने चतुर्भुज देह धारण केला; असाच प्रकार[७९] ब्रह्मदेव व महेश यांच्या बाबतीत झाला (१०.४.२१-२२). पुढे ब्रह्मदेवाने सृष्टीची कल्पना केली; त्याच्या इच्छेप्रमाणे विश्व निर्माण झाले; विश्वा[८०] तील सर्व जीवसृष्टी ब्रह्मदेवाने निर्माण केली (१०.४.३१).

विश्वाच्या दृश्य पसाऱ्यात नाना लोक, नाना स्थाने, चंद्र, सूर्य, तारांगणे, सप्तद्वीपे, चौदा भुवने, शेष, कूर्म, सप्त पाताळे, एकवीस स्वर्ग, आठ दिक्पाळ, तेहतीस कोटी देव, बारा आदित्य, अकरा रुद्र, नऊ नाग, सात ऋषीश्वर, नाना देवांचे अवतार, मेघ, चक्रवर्ती मनु, नाना जीवांची उत्पत्ती (८.४.५०-५३) असा विस्तार आहे (८.४.५४) असे हे सृष्टिरचनेचे नवल आहे (१३.३.१४).

ज्या सत्त्वगुणाचा विष्णू बनला आहे, त्या विष्णूच्या अंशाने जग चालते. म्हणजे असे : - ज्या जाणीवेचा विष्णू झाला आहे ती जाणीव विश्वातील सर्व प्राण्यांत विभागली गेली आहे; तिच्या प्रेरणेने प्राणी स्वसंरक्षण करतो. या जाणीवेला[८१] जगज्जोती म्हणतात. सर्व प्राणी या जाणीवेमुळे जिवंत राहतात. ही जाणीव सगळ्या जगाला सांभाळते किंवा [८२] वाचविते, म्हणून तिला जगज्जोती म्हणतात; ती शरीराबाहेर गेली की प्राणी जिथल्या तिथे मरून पडतो (१.९.१२-१५,१८)

अशाप्रकारे मूळमायेतील जाणीवेत फरक होत होत हा सर्व विस्तार झाला आहे (१०.९.१९); 'मायावल्ली फोफावली' (१९.५.१५) आहे.

**(इ) उपनिषदांना धरून** - उपाधिरहित[८३] आकाश म्हणजे ब्रह्म (=आत्मा) (१०.३.१; ९.६.३७); मुळात अविनाश आत्मा होता (६.२.१२). आत्म्यात किंवा ब्रह्मात मूळमाया जन्मली (६.३.१२, १०.३.१); मूळ ब्रह्मात स्फूर्तिरूप अहंकार म्हणजे मूळमाया प्रगट होते (४.१०.१). हा अहंकार किंवा मूळमाया वायुस्वरूप आहे (४.१०.२; १०.३.२; ६.९.८). या वायूत पंच भूते व त्रिगुण आहेत (१०.३.२). या वायूपासून तेज, तेजापासून आप आणि आपापासून भूमंडळ आकारले (६.३.१३; ४.१०.२-३). म्हणजे वायूपासून अग्नी, अग्नीपासून पाणी व पाण्यापासून सृष्टी निर्माण झाली (८.१.२६-२८; ९.६.१६-१७).

वरील भागच सविस्तरपणे असा सांगतो येतो : - अंतरात्म्याला आकाश म्हणतात (१३.३.७; १२.६.१२). (हा वायूपलीकडील अंतरात्मा आहे १७.३.१६-१७). त्या आकाशापासून (अंतरात्म्यापासून) वायू जन्मला (१२.६.१२; ११.१.१; १६.७.२).या वायूचे उष्ण व शीत असे दोन प्रवाह असतात. शीत वायूतून तारा व चंद्र जन्मले. उष्ण वायूपासून सूर्य, अग्नी, विद्युत इत्यादि उत्पन्न झाले. तेज हे सुद्धा उष्ण व शीत असे दोन प्रकारचे आहे. तेजापासून पाणी होते. व पाणी आळून-घट्ट होऊन-पृथ्वी बनते (१२.६-१३-१५).

वायू ते पृथ्वी हा उत्पत्तीतील भाग रामदासस्वामी वेगळ्या पद्धतीने असाही सांगतात : - (१) वायूपासून अग्नी होतो. वायूमध्ये जे कठिण घर्षण असते त्यापासून अग्नी होतो. मंद वायूपासून शीतल पाणी निर्माण होते. पाण्यापासून पृथ्वी होते (११.१.१-३). (२) वायूपासून तेज जन्माला येते. वायूच्या दोन प्रवाहांच्या घासणीने अग्नी उत्पन्न होतो; तेथे सूर्यबिंब प्रगटते. जो शीत वारा वाहतो त्यामधून पाणी उत्पन्न होते; पाणी आळून पृथ्वी निर्माण होते (११.३.७-९).

आता, निर्माण झालेल्या पृथ्वीत नाना बीजे असतात; बीजापासून वनस्पती होतात (११.१.३). वनस्पतींपासून नाना रस, अन्नरस उत्पन्न होतात (१२.६.१६). पुढे जीवांच्या चार खाणी झाल्या; चार खाणींचा विस्तार झाला; नाना योनी प्रगटल्या व त्यांत [८४]प्राणी निर्माण झाले (११.१.१०). वेगळ्या शब्दांत :- पृथ्वीच्या पोटात अनंत बीजे असतात; पृथ्वी व पाणी यांच्या मीलनाने बीजांतून अंकुर फुटतात (१३.३.१०). मग पृथ्वीवर अमाप वनस्पती येतात (१२.६.१५). मग वृक्ष, वेली, पाने, धान्य, अन्न, अन्नापासून रेत व रेतापासून प्राणी अशी उत्पत्ती होते (१३.३.११-१३). पृथ्वीवरील चौऱ्यांशी लक्ष प्राणी अन्नरसावर जगतात (१२.६.१६).

अशी सृष्टिरचना झाली, अशाप्रकारे हे जड दृश्य विश्व आकाराला आले (१२.६.१७-१८).

**विश्वाची संहारणी** - विश्वाच्या उभारणीच्या अनुषंगाने विश्वाच्या संहारणीचाही विचार करावयास हवा. तो संक्षेपाने असा :-

विश्वाच्या प्रलयाच्या वेळी, जे ज्यातून निर्माण झाले आहे ते पुन्हा त्यातच विलीन होते (१२.६.१९; १५.४.२२). पृथ्वी जळात विरते; पाण्याला तेज शोषून घेते; वायू तेजाचा लय करतो आणि वायू आकाशात विरून जातो (१५.४.१९-२१; १४.९.६-९). अशाप्रकारे पंच भूतांचा कल्पान्त अथवा नाश होतो (१४.९.९; १५.४.२२). पंच भूते गुणमायेत[८५] विलीन होतात; गुणमाया[८५] मूळमायेत विरून

जाते; गुणमाया व मूळ[८६] माया परब्रह्मात लीन होते (१४.९.१०). हाच भाग रामदासस्वामी वेगळ्या पद्धतीने असा सांगतात :- (१) वायो वितुळताच जाण । सूक्ष्म भूते आणि त्रिगुण । ईश्वर[८५] मांडी अधिष्ठान । निर्विकल्पी ।। (१०.५.२५) (२) निर्माण पंच भूते इये । कल्पान्ती नासती यथान्वये । प्रकृति [८७]पुरुष जिये । हेही ब्रह्म होती ।। (५.६.४७). (३) महद्‌भूत मूळमाया । विस्मरणे वितुळे काया । पदार्थमात्र राहावया । ठाव नाही ।। दृश्य हालका लोळे गेले । जड चंचळ वितुळले । या उपरी शाश्वत उरले । परब्रह्म ते ।। (१३.४.२३-२४).

**विश्वसंहारानंतर** - माया आहे तोपर्यंत भेद व अभेद यांची भाषा संभवते. सृष्टी निर्माण होण्याच्या वेळी भेद होता; सृष्टीच्या संहारानंतर अभेद होतो (२०.८.१७). सृष्टीच्या प्रलयानंतर:- तेथे जीवशिव पिंड ब्रह्मांड । आटोन गेले थोतांड । माये-अविद्येचे बंड । वितळोन गेले ।। (११.१.१७). सृष्टीची संहारणी झाल्यावर, मायेचा निरास होऊन फक्त ब्रह्मस्वरूपाची स्थिती उरते (११.१.१६). प्रलयानंतर 'पुढे शाश्वत उरले । ते परब्रह्म' (१५.४.२३) असे होते.

**विश्व सत्य नाही** - आत्तापर्यंत ज्या विश्वाची उभारणी आणि संहारणी पाहिली ते विश्व खरे नाही. एक परब्रह्म मात्र सत्य आहे. ब्रह्माखेरीज जे काही अन्य भासते वा दिसते, ते भ्रमरूप आहे:- तीन गुण व पंच  भूते भ्रम आहेत. मी-तू, उपासना, ईश्वरभाव हे सर्व भ्रम आहेत (१०.६.९-११). सर्व रूपे आणि नामे भ्रम आहेत (६.२.१३). किंबहुना 'निर्गुण ब्रह्मावेगळे आवघे । भ्रमरूप' (१०.६.३६) आहे. साहजिकच माया व मायाजनित विश्व सत्य नाहीत. मायेने निर्माण केलेला हा विश्वभ्रम अविद्येच्या परिणामामुळे खरा वाटतो (८.१.४२). परंतु हे मायानिर्मित दृश्य जगडंबर-विश्वाचा पसारा-खरे आहे असे कुठलाच अद्वैत वेदान्त ग्रंथ सांगत नाही. जग अथवा[८८] सृष्टी मिथ्या आहे (८.१.४३-४४; ६.६.४६). ज्ञानी साधूंना साहजिकच हे विश्व मिथ्या वाटते. म्हणून रामदासस्वामी सांगतात 'दृश्य मिथ्या साधुजना' (६.७.४४), ज्ञानी माणसाला दृश्य हे स्वप्नासारखे मिथ्या आहे (६.७.४३).

**उपसंहार** - मायेच्या अलीकडे या विश्वात दृश्याचे दडपण (भीड) आहे (१४.९. २८). जे मायेच्या संभ्रमाने गोंधळलेले असतात, त्यांना हे विलक्षण अवघड चक्र कळत नाही (१४.९.२३). एखादा नुसता (शब्द) ज्ञानी जर मायेच्या दडपणाला बळी पडला तर त्याला निश्चळ परब्रह्म प्राप्त होत नाही. तो मायेच्या कक्षेत उगीचच बडबड करीत राहतो (१५.४.२८). याउलट परब्रह्म हे तर मायातीत, मायेच्या पलीकडे आहे (१४.९.२८).

माया आहे तोपर्यंत अन्वय व्यतिरेक[८९] आणि तर्क करावा लागतो. परंतु जेव्हा/

जेथे माया संपते, तेव्हा/तेथे अन्वय-व्यतिरेक आणि तर्क उरतच नाहीत (१८.५.३२). (अज्ञानी) माणसांना मायेचे प्रत्यक्षपण खरे वाटते. तथापि साधकाला मात्र ते खोटे (अप्रमाण) वाटते (५.९.३२). साधक हा प्रत्यक्ष असणाऱ्या मायेला अलक्ष करतो व अलक्ष असणारी ब्रह्मवस्तू अंतरात पाहात असतो (५.९.१६). साधनाच्या अभ्यासाने साधक हा माया सांडून स्वरूपी लीन होऊन जातो (५.९.३३). म्हणजे तो ब्रह्मरूप होऊन जातो.

अशाप्रकारे मायेचा हिशोब झाला, मायेचे देणे-घेणे संपले, काही बाकी उरली नाही; आणि साध्य असे ब्रह्म प्राप्त झाल्याने, साधनाला अवकाश उरला नाही; साधना आपोआप संपली (२०-१०-२७). माया संपूर्णपणे निरस्त झाली की अवस्था म्हणून उरत नाही (१५.४.२९). मायेचा नि:शेष निरास झाला की खरे आत्मनिवेदन घडते, तेथे शब्द पोचू शकत नाही; ते विज्ञान, ती स्वस्वरूपस्थिती, स्वानुभवानेच कळून येते (१५.४.२९-३०). विमल ब्रह्माचा साक्षात्कार झाल्यावर, उन्मनी अवस्था प्राप्त झाल्यावर, केलेल्या साधनेचे फळ मिळते, संसार सफळ होतो आणि निर्गुण व निश्चळ ब्रह्म अंतरात स्थिर होऊन राहते (२०.१०.२५-२६)

अशाप्रकारे विचाराने मायेचा निरास होऊन, आपण ब्रह्मरूपच होऊन राहतो.

**तळटीपा**

५९. पहा - ८.३.४९-६६; ८.४.२-७; ८.४.४०-४५; ९.६.१-५३; १०.९.१-२१; १०.१०.५-३२; ११.१.१-१०.

६०. मूळमाया म्हणजे निश्चळ ब्रह्मातील चंचळ होय. म्हणून भ.स.श्रीरामराय केळकर ऊर्फ श्रीदादामहाराज म्हणतात:- चंचळाचे गुणे विश्व रचिले; सदानंदरूपी चिद्गुण चंचळ । विश्वाचा हा खेळ केला तेणे ॥

६१. माया । अंतरात्मा (आत्मा) हेच सर्व विकार घडवून आणतात; पण त्यांचा आरोप मात्र ब्रह्मावर केला जातो (२०.७.१९).

६२. एकेका भूतात अन्य भूते कशी मिसळलेली असतात हे पंचीकरणाच्या सिद्धान्तानुसार ८.४.१३-३८ मध्ये रामदास विस्तृतपणे सागतात.

६३. जाणीव म्हणजे ज्ञान; नेणीव म्हणजे अज्ञान:- ज्ञान म्हणिजे जाणणे । अज्ञान म्हणजे नेणणे (२०.१.२३).

६४. मूळमायेत जाणीव कशी याचे आणखी एक स्पष्टीकरण रामदास असे देतात :- पिंडातील महाकारण देहात तुर्या ही सर्वसाक्षिणी अवस्था आहे; म्हणजे तेथे

जाणीव वा ज्ञान आहे. ब्रह्मांडात मूळ माया हा महाकारण देह आहे; म्हणून तेथे जाणीव किंवा ज्ञान आहे (९.६.४-५).

६५. जाणीव-नेणीव हे गुणांचेही लक्षण आहे (२०.३.६). जाणीव-नेणीव हे द्वंद्व निश्चळ ब्रह्मात असूच शकत नाही.

६६. जगदीश्वरापासून त्रिगुण । पुढे जाले ॥ १६.७.४. जगदीश्वर = मूळमाया.

६७. गुणांपुढील कर्दमासी । गुणक्षोभिणी बोलीजे ॥ (२०.३.८).

६८. गुणक्षोभिणीचे थोडे वेगळे वाटणारे स्पष्टीकरण रामदास असे देतात:-मूळमायेतून शुद्धसत्त्वगुण निर्माण होतो; त्याच्यामध्ये रजोगुण व तमोगुण हे गुप्तपणे म्हणजे सूक्ष्मरूपाने असतातच; त्याला महत्तत्त्व अथवा गुणक्षोभिणी माया म्हणतात. (१७.२.१०).

६९. येथूनच मूळ ॐकाराची मांडणी होते (१३.३.५). अकार, उकार, व मकार हे तीन मिळून ॐकार आहे (१३.३.६). विश्वोत्पत्तीच्या प्रक्रियेत अक्षरांनाही स्थान आहे. निश्चळ ब्रह्मातील अहं हे स्फुरण ॐकाराच्या नादरूपाने होते. तोच शब्द. शब्दद्वारा वेदशास्त्रे प्रगट होतात (९.६.१०). ॐकारात (=वायूच्या गतीत) तत्त्वे (=पंच भूते) मुळात असतातच (८.३.५५).

७०. मुळात मूळमायाच असल्याने, मूळमायेपासून तीन गुण निर्माण होतात (२०.२.१६), असेही रामदास सांगतात.

७१. मूळमायेपासून तीन गुणांपर्यन्तची तत्त्वे चंचळ असून एकदेशी आहेत; ती सर्वव्यापक नाहीत (२०.२.२५).

७२. गुणापासून [illegible] दशेते (९.६.२७) असेही रामदास म्हणतात.

७३. खरे म्हणजे तीन गुण व पंचभूते गुणमायेत असतातच. म्हणून गुणापासून आकाश उत्पन्न होते असे [illegible] नाही, तथापि शब्द या गुणाला अधिष्ठान हवे म्हणून आकाशाची [illegible] आहे (९.६.२८).

७४. पाण्याच्या [illegible] पहा.

७५. मूळमाया म्हणजेच [illegible], [illegible], [illegible], जगदीश, इत्यादी.

७६. दासबोधातील [illegible] (९.३.५) [illegible] झाला; विष्णूपासुन ब्रह्मदेव झाला; [illegible] निर्माण केली.

७७. सत्त्वगुणाचा देह [illegible] तो [illegible] (१०.९.४२)

७८. विष्णू जाणता आहे, [illegible] आहे (१०.४.१९).

७९. पुढे मुले-नातवंडे [illegible] झाला (१०.४.२२)

८०. ब्रह्मदेवकृत सृष्टीचा तपशील १०.४.३१-३८ मध्ये आहे.

८१. अनेक प्राणी निर्माण होती । परी येकची कळा वर्तती । तये नाव जगज्जोती । जाणती कळा ॥ ११.१.२६.

८२. तये कळेचे पोटी । देव असती कोट्यनुकोटी ॥ ११.९.११; देवदेवता, भुते, इत्यादी जाणीवेचे भिन्न प्रकार आहेत; ते नेहमी वायुरूपाने संचार करीत असतात (१०.९.२०-२१)

८३. आकाश हे दृश्याच्या उपाधीत सापडले की त्याला भूत म्हणतात (९.६.३४). जे ज्ञेयरूपाने अनुभवास येते ते पंच भूतांत मोडते. आकाश ज्ञेयरुपाने-शून्यपणाने-अनुभवास येते; म्हणून आकाश पंचभूतांपैकी एक आहे (९.६.३६-३७). आकाश व ब्रह्म यांतील फरकासाठी ८.५.३६-४२, ५५-६८ पहा.

८४. अष्टधा प्रकृतीपासून लहानमोठी शरीरे निर्माण झाली (११.२.१५).

८५. कारण:-जे जेथे निर्माण होते । ते तेथे लया जाते ॥ १४.४.२२.

८६. ईश्वर=मूळमाया.

८७. प्रकृतिपुरुष=मूळमाया.

८८. विश्व परब्रह्मी भास । श्रीरामराय गो. केळकर महाराज.

८९. एक असताना दुसरे असते हा अन्वय; एक नसताना दुसरे नसते हा व्यतिरेक.



# ३. पंचीकरण

सामान्य माणसांना परमार्थाचे अथवा अध्यात्माचे मार्गदर्शन करणाऱ्या भारतातील साधुसंतांमध्ये श्रीसमर्थ रामदास[१] स्वामी यांचा समावेश होतो. श्रीरामदासस्वामींचे आणखी एक वैशिष्ट्य असे आहे की त्यांनी व्यावहारिक किंवा प्रापंचिक गोष्टीतही लोकांना सविस्तर मार्गदर्शन केले आहे. त्यांचे हे मार्गदर्शन मुख्यत: त्यांच्या 'दासबोध' नामक ग्रंथांत दिसून येते. तसे पाहिल्यास रामदासस्वामींचा दासबोध हा एक अपूर्व ग्रंथ आहे. परंतु त्याच्याकडे परमार्थप्रेमी तसेच पंडितजन यांचे लक्ष जावयास हवे होते तितके गेलेले दिसत नाही. दासबोध या ग्रंथाबद्दल श्री. अण्णाबुवा[२] कालगावकर सांगतात, ''प्राणिमात्रांच्या सर्व आशाआकांक्षा पूर्ण करण्याचे सामर्थ्य कोण्या एका ग्रंथात आहे असे जर विचारले तर त्याचे उत्तर 'श्रीमत् दासबोध' असे देण्यास काही हरकत नसावी असे आम्हांस वाटते. अध्यात्माचा तर तो मेरुमणि असून ते अध्यात्म प्रत्यक्ष जीवनात कोणत्या साधनाने आणता येईल ती सर्व आचार संहिता आपणांस दासबोधात सापडेल.''

**प्रपंच आणि परमार्थ** - निसर्गत: प्रपंचात असणाऱ्या पुरुषाने प्रपंचाचे जोडीने परमार्थही करावयास हवा, अशी रामदासस्वामींची अपेक्षा आहे. त्यासाठी म्हणजे परमार्थाच्या आवश्यकतेसाठी काही कारणे त्यांनी अशी दिली आहेत : - (१)'परमार्थ सकळांस विसावा आहे' (दा. १.९.२०). (२) 'परमार्थ जन्माचे सार्थक । परमार्थ संसारी तारक' (दा.१.९.२१) असा आहे. (३) 'अपूर्वता या परमार्थची । वार्ता नाही जन्म मृत्याची । आणि पदवी सायोज्यतेची । संनिधचि लाभे' (दा.१.९.१३), असा प्रकार आहे.

या संदर्भात रामदास[३] स्वामींचे सांगणे असे आहे : - 'आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थविवेका' (दा. १२.१.१); कारण 'प्रपंची जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा' (दा. १२.१.९). तसेच 'प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणे तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी.' (दा.१२.१.२), आणि 'म्हणौनि सावधानपणे । प्रपंच परमार्थ चालवणे (दा.१२.१.१०) हे माणसाला इष्ट आहे.

**परमार्थास पंचीकरण आवश्यक** - नंतर रामदासस्वामी पुढे सांगतात : प्रपंच नेटका करावयाचा झाल्यास सुवर्ण म्हणजे द्रव्य आवश्यक आहे. आणि परमार्थ करावयाचा झाल्यास 'पंचीकरण' माहीत हवे, तसेच महावाक्याचे विवरण कळून यावयास हवे. ही

उत्तरोक्त गोष्ट जमली की जीव संसारातून[४] सुटून सायुज्य मुक्ती मिळवू शकतो. रामदास स्वामींच्या मते, पंचीकरणज्ञान आणि महावाक्य-विवरण हे परमार्थाला मूलभूत असल्याने, तेच पुन: पुन:[५] समजून घेतले पाहिजेत. तसेच पंचीकरण आणि महावाक्याचे विवरण हे परस्परापेक्षा भिन्न[६] आहेत हेही लक्षात घ्यावयास हवे. प्रस्तुत लेखात पंचीकरणाचे सविस्तर विवरण केलेले आहे. तत्पूर्वी महावाक्याचे विवरण संक्षेपाने सांगितले आहे.

**महावाक्याचे विवरण** - महावाक्य हा शब्द उपनिषदांतील काही विशिष्ट वाक्यांच्या बाबतीत वापरला जातो. उदा. सर्व खल्विदं ब्रह्म ( हे सर्व खरोखर ब्रह्म आहे.), अहं ब्रह्मास्मि (मी ब्रह्म आहे), तत्त्वमसि (ते तू आहेस), इत्यादी. महावाक्य या शब्दाने अहं ब्रह्मास्मि आणि तत्त्वमसि ही वाक्ये रामदासस्वामीना अभिप्रेत आहेत. शंकराचार्यांच्या केवलाद्वैत वेदान्तात जीव हा मूलत: ब्रह्मरूपच आहे; हे मत रामदासस्वामीना मान्य आहे. या संदर्भात रामदासस्वामी दासबोधात सांगतात : - ब्रह्म हे मुळात निराकार (दा. ४.१०.१), निर्विकल्प (दा.९.१.२), निर्विकार (दा. ८.५.४२), निराभास (दा. ९.१.४; ९.६.३७), निश्चळ (दा. ८.३.४८; १०.१०.११), निर्गुण (दा. ८.३.४४; ८.३.३९; ९.६.३२), अद्‌वैत (दा. ७.६.१; ७.७.१८) आहे. या निश्चळ ब्रह्मात[७] माया निर्माण होते (दा. ८.३.२७). आणि मायेपासून विश्वाचा विस्तार होतो. परंतु माया निर्माण होते हा भास आहे. माया निर्माण झाल्याचा भास हा भ्रम आहे (दा. १०.१०.१०-११). विश्वात मायेचा विस्तार आहे परंतु माया ही मिथ्या आहे. ती सर्वस्वी खरी नाही (दा. ८.३.२१). ब्रह्मावर मायेचे मिथ्या भान होते व जग विवर्तरूपाने भासते (ब्रह्म जे का सनातन । तेथे माया मिथ्याभान। विवर्तरूप भासे ॥ (दा. ८.२.२) म्हणजे जग हे झालेलेच नाही. तथापि संशय दूर करण्यास जगाची उत्पत्ति सांगितली जाते (अरे जे झालेचि नाही । त्याची वार्ता पुससी कायी । तथापि सांगो जेणे काही । संशय नुरे॥ (दा. ८.२.१)

अद्‌वैत ब्रह्म हे निर्विकल्प आहे (दा. ७.६.१), तर सर्व द्‌वैत हे कल्पनेमुळे भासते. 'कल्पना' द्‌वैताची माता (दा. ७.५.२०) आहे आणि या द्‌वैतात भासणारा तथाकथित जीव हा कुणी वेगळा नसून तो ब्रह्मच आहे; आपण जीव मुळात ब्रह्मरूप आहोत (दा. ९.१०.३१), आपण जीव म्हणजे निर्गुण आत्मा आहोत (दा. ६.३.२३; व २९-३०). आपण निर्गुण ब्रह्मरूप आहोत. आपण ब्रह्मरूप आहोत हेच खरे आपल्या स्वरुपाचे ज्ञान होय (दा. ५.६.१०). जीव - ब्रह्माची ही ऐक्यता अहं

ब्रह्मास्मि किंवा तत्त्वमसि या महावाक्यावरून कळून येते. या महावाक्यांचे विवरण हे मुख्य ज्ञानाचे लक्षण आहे (महावाक्याचे विवरण । हे मुख्य ज्ञानाचे लक्षण । दा. ५.६.१४). मी ब्रह्म आहे, तो परमात्मा मी आहे, ते ब्रह्म तू आहेस या महावाक्यांच्या विचारणेने सहज ब्रह्मस्थिती प्राप्त होते (सोहं हंसा तत्त्वमसि । ते ब्रह्म तू आहेसी । विचार पाहावा स्थिती ऐसी । सहजची होते ।। (दा. १३.२.२०). याप्रमाणे महावाक्यांच्या अर्थाच्या निदिध्यासाने आपणच ब्रह्मवस्तु आहोत असा साक्षात्कार होतो ( महावाक्याचा अर्थ घेता । आपण वस्तूची तत्त्वता ।। (दा. ५.६.१३). अशाप्रकारे महावाक्यांच्या विवरणाने परमार्थ साधतो.

**केवलाद्वैत वेदान्तामधील पंचीकरण :** अहं ब्रह्मास्मि सारख्या महावाक्यांच्या निदिध्यासनाला आद्य शंकराचार्यांच्या केवलाद्वैत वेदान्तात फार महत्व आहे. शंकराचार्यांचे हे अद्वैत तत्वज्ञान काही अंशांमध्ये रामदासस्वामींना[८] मान्य आहे. शंकराचार्यांच्या केवलाद्वैत वेदान्तात[९] 'पंचीकरण' ही एक संकल्पना आहे. ही संकल्पना संक्षेपाने अशी:- मुळात निर्गुण ब्रह्म आहे. तेथे त्रिगुणात्मक अज्ञान येते. मग तमोगुणप्रधान अशा अज्ञानाच्या विक्षेप नावाच्या शक्तीपासून आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी ही सूक्ष्म भूते क्रमाने उत्पन्न होतात. ती प्रथम स्वतंत्र वा वेगवेगळी असतात. पुढे त्यांचे परस्पर-मिश्रण होऊन स्थूल भूते निर्माण होतात व उत्तरोक्तापासून विश्वाचा पसारा होतो. सूक्ष्म भूतांच्या विशिष्ट अशा परस्पर मिश्रणाने पंचीकृत । स्थूल । महाभूते बनतात. पाच सूक्ष्म भूतांचा हा परस्पर संयोग ज्या विशिष्ट पद्धतीने होतो तिला पंचीकरण म्हणतात. या पंचीकरण प्रक्रियेने उद्भूत झालेल्या पंचीकृत/स्थूल/ महा भूतांत पाचही भूतांचे अंश असतात. प्रत्येक पंचीकृत भूतात इतर भूतांचे अंश कसे येतात हे पंचीकरणावरून समजून येते. ही पंचीकरण प्रक्रिया अशी आहे:- प्रत्येक सूक्ष्म भूत हे एक म्हणजे एक एकक आहे असे मानावयाचे. मग त्याचे १/२ + १/२ असे दोन समान भाग करावयाचे. नंतर प्रत्येक सूक्ष्म भूताच्या पहिल्या अर्ध्या (१/२) भागाचे १/८ + १/८ + १/८ + १/८ असे चार समान भाग करावयाचे. त्यानंतर प्रत्येक सूक्ष्म भूताचा १/२ भाग हा त्याचा स्वत:चा १/८ भाग सोडून, इतर चार सूक्ष्म भूतांच्या प्रत्येकी १/८ भागाशी मिसळून द्यावयाचा; मग एकेक पंचीकृत/स्थूल भूत निर्माण होते. उदा. पंचीकृत / स्थूल आकाश - १ = १/२ आकाश + १/८ वायु + १/८ तेज + १/८ जल + १/८ पृथ्वी. असाच प्रकार पंचीकृत वायू इत्यादी भूतांच्या बाबतीत समजावयाचा. अशाप्रकारे प्रत्येक पंचीकृत म्हणजे स्थूल अशा महाभूतात पांचही सूक्ष्म भूतांचे[१०] अंश येतात.

**दासबोधातील पंचीकरण भिन्न:-** केवलाद्वैत वेदान्तातील वरील पंचीकरण प्रक्रिया रामदास स्वामींनी दासबोधात मांडलेली नाही. त्यांचे मत थोडेसे वेगळे आहे. त्यांच्या मते:- पाच सूक्ष्म भूते मूळमायेतच असतात (दा. ८.३.५९-६०). हीच पाच भूते पुढे स्थूल/जड/महाभूते बनतात (सूक्ष्म भूते जी बोलिली/तीची पुढे जडत्वा आली । दा. ८.४.५५). तथापि प्रत्येक सूक्ष्म भूतात[११] इतर सूक्ष्म भूतेही असतातच व तीच पुढे व्यक्त दशेला येतात. 'येक भूती पंचभूत' (दा.८.४.३८) कसे आहे ते रामदासांनी दा. ८.४.१५-३७ या ओव्यांत दाखवून दिले आहे. याचा अर्थ असा होतो की केवलाद्वैत वेदान्तातील पंचीकरणापेक्षा वेगळे असे काही तरी रामदास स्वामींना पंचीकरण शब्दाने अभिप्रेत आहे. म्हणून समर्थ रामदासांना पंचीकरण शब्दाने काय अपेक्षित आहे, याचा अधिक विचार आता पुढे केला आहे.

**दासबोधातील पंचीकरणाचा अभिप्राय** - दासबोधाच्या काही प्रतीत पंचीकरण हा शब्द 'पंचीकर्ण' असाही दिलेला दिसतो. पण प्रस्तुत लेखात 'पंचीकरण' असाच शब्द घेतला आहे.

दासबोधात[११-अ] पंचीकरण हा शब्द पुढील सहा ठिकाणी येतो :

(१) ऐसे पंचीकरण शास्त्रप्रमेय / ईश्वरतनुचतुष्टय । म्हणौन हे बोलणे होय / जाणीव मूळमाया ॥ दा. १०.१०.१५ (पंचीकरण हे शास्त्राचे प्रमेय आहे. ईश्वराचे चार देह आहेत. मूळ माया जाणीवरूप आहे.)

(२) प्रपंची पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण । महावाक्याचे विवरण । करीता सुटे ॥ दा. ११.३.२९ (प्रपंचात सुवर्ण हवे तर परमार्थात पंचीकरण. महावाक्याच्या विवरणाने जीव बंधनातून सुटतो.)

(३) सकळ परमार्थास मूळ । पंचीकरण महावाक्य केवळ । तेचि करावे प्रांजळ । पुन्हा पुन्हा ॥ दा. ११.४.१० (पंचीकरण व महावाक्य हे परमार्थाला मूलभूत आहेत. पुन्हा पुन्हा त्याचा विचार करावा)

(४) मुळापासून सैरावैरा / अवघा पंचीकरण पसारा । त्यात साक्षत्वाचा दोरा । तोही तत्त्वरूप ॥ दा. १५.३.१ (मुळापासून सगळा पंचीकरण पसारा आहे. त्यात तत्त्वरुप साक्षी अनुस्यूत आहे.)

(५) ब्रह्माडांचे महाकारण । तेथून हे पंचीकरण । महावाक्याचे विवरण । वेगळे असे । दा. ११.५.३० (ब्रह्माडांच्या महाकारणातून पंचीकरण होते. त्यापेक्षा महावाक्याचे विवरण वेगळे आहे.)

(६) इतिश्री पंचीकरण । केलेचि करावे विवरण । लोहाचे जाले सुवर्ण । परिसाचेन योगे ॥ दा. १७.८.३३ (असे हे पंचीकरण आहे. त्याचे विवरण वारंवार करावे. परिसामुळे लोखंडाचे सोने होते.)

उपर्युक्त सहा स्थळांपैकी दा. ११.३.२९ (प्रपंची पाहिजे सुवर्ण, इत्यादी) आणि दा. ११.४.१० (सकळ परमार्थास मूळ, इत्यादी) ही दोन स्थळे पंचीकरण म्हणजे काय हे ठरविण्यात उपयोगी पडणारी नाहीत, हे अगदी उघड आहे. उरलेल्या चार स्थळांवरून मात्र पंचीकरण म्हणजे काय याची कल्पना येते. या चार ओव्यांचाच सविस्तर विचार पुढे केला आहे.

**पहिले स्थळ : दा. १०.१०.१५ :-** या ओवीवरून कळते की पंचीकरण हे शास्त्राचा विषय आहे; त्यात ईश्वराच्या चार देहांचा समुदाय येतो. दासबोधाच्या आधारे याचा खुलासा असा : - निर्गुण वा निश्चळ ब्रह्म हे अंतिम तत्त्व आहे. निश्चळ ब्रह्मात चंचल निर्माण होते. निश्चळ ब्रह्मात भासणाऱ्या या चंचळाला मूळमाया म्हणतात (दा.१०.१०.५-७). निश्चळ ब्रह्मातील हे चंचळ इच्छा, स्फूर्ति किंवा स्मरण या स्वरूपाचे असते (दा. १०.१०.१२). निराकार ब्रह्मात चंचळ म्हणजे (ब्रह्माचे) स्वत:चे स्मरण स्फुरले (दा.१७.२.६). निराकार ब्रह्मात स्फूर्तिरूप अहंकार उठला (दा.४.१०.१); निर्गुण ब्रह्मात 'अहम्' अशी जी स्फूर्ति वा स्मरण येते तीच[१२] मूळमाया होय (दा.८.३.५१).

आता, निराकार ब्रह्मात जो स्फूर्तिरूप अहंकार उठतो, तो अहंकार[१३] वायुस्वरूप आहे (दा. ४.१०.१-२). ब्रह्माच्या निश्चळ रूपातील चंचळ स्थिती म्हणजे मूळमाया ही वायु आहे (दा. १०.९.४). म्हणजेच मूळमाया ही वायुस्वरूप आहे (दा.१०.४.१०; ९.६.८). आता, वायूत जाणीवेचे रूप असते (दा. १०.४.१०); म्हणून वायु व जाणीव या दोहोंच्या मेळाव्याला मूळमाया म्हणावे (दा.१०.९.५) म्हणजे मूळमाया ही जाणीवरूप (दा.१५.७.२; १०.१०.१५; ९.८.२६) अथवा जाणीवमय आहे (दा. २०.२.१९). म्हणून प्रस्तुत दा. १०.१०.१५ या ओवीत रामदास स्वामी सांगतात "म्हणौन हे बोलणे होय । जाणीव मूळमाया ।"

मूळमाया[१३] वायुस्वरूप आहे. हा वायु तीन गुण व पंच भूते यांनी युक्त असतो (दा.१५.७.४). किंबहुना या वायूमध्ये तीन गुण व पाच भूते असतात. (दा.१०.९.१; १०.३.२). म्हणून वायुरूप मूळमायेत प्रथमपासूनच तीन गुण व पंच भूते असतात. माया ही पंच भूते व तीन गुण यांनी बनलेली आहे (दा.९.६.३३).

मुळात म्हणजे मूळ मायेत तीन गुण व पंच भूते यांचे मिश्रण असते; तेथे ते सूक्ष्म व एकरूप असतात (दा. ९.६.१४-१५). मूळमाया ही सूक्ष्म असून (दा.१७.३.१८) ती मिश्रणरूप आहे (दा.२०.५.४-५).

उपर्युक्त सूक्ष्म वायूत सूक्ष्म पंचभूते असतात (दा. ८.४.४०); हा वायु पंच भूतांनी युक्त असतो (दा. ८.४.४१). साहजिकच वायुरूप मूळमायेत सूक्ष्म रूपाने म्हणजे बीजरूपाने पंचभूते असतात (दा.९.६.२) किंबहुना हा 'पंचभूतिक पवन' म्हणजेच मूळमाया आहे (दा.८.४.४१) म्हणजेच मूळमाया ही पंचभूतिक आहे (दा.८.३.५८, ६०; ८.४.७). मूळमाया ही सूक्ष्म अशा पाच भूतांनी बनलेली आहे (दा. १७.२.१२-१३). नंतर (विश्वोत्पत्तीच्या वेळी) मायेतील ही सूक्ष्म पंच भूते व्यक्त दशेला येतात (दा.१२.६.१०) म्हणजे ती सृष्टीरचनेत व्यक्त होतात (दा.८.३.५७) म्हणजेच ती वेगळेपणाने स्पष्ट दृश्य रूपात येतात (दा. ९.६.२७). व्यक्त दशेला आलेली पंचभूते जड होऊन (दा. ८.३.५६) सर्व तत्त्वे (= जगातील पदार्थ) बनतात आणि पिंड - ब्रह्माडांतील सर्व रचना होते (दा. ८.४.४४-४५) म्हणजेच पंच भूतांचा विस्तार होतो (दा.८.४.४) आणि अफाट पसारा होतो (दा. २०.२.२७). पंच भूतांचा विस्तार (दा.१३.६.११) किंवा पसारा सगळीकडे विस्तारतो (दा. १३.३.६). अशाप्रकारे पंच भूतांपासून विश्वाची उभारणी होते (दा. ११.१.११).

वरील प्रकार वेगळ्या शब्दांत सांगायचा झाल्यास, असे म्हणता येते:- सर्व सृष्टीचे सूक्ष्म बीज मूळमायेत आहे (दा. २०.२.२०; २०.३.१७). विश्व म्हणजे मायेचा विकार व विस्तार आहे (दा.११.२.१०). मूळमायाच नाना विकारांचे मूळ आहे (दा. १५.७.१). मूळमायेपासून विश्वाचा विस्तार होतो (दा. १०.९.२-३). पंचभूतिक मायाच सर्वत्र विस्तारली आहे (दा.८.३.६२). विश्वनिर्मिति हा मूळमायेचा खेळ आहे (दा. ९.६.३३). मायेमुळे सृष्टीची रचना होते (दा.७.१.५७-५८). जगाचे अवडंबर हे मायेने उभारलेले दृश्य आहे (दा. ८.१.४३). मूळमाया ही अनंत ब्रह्मांडे निर्माण करते आणि त्यांचा लयही करते (दा. १.३.१५; १.३.६).

नंतर मूळमायेपासून निर्माण झालेल्या सृष्टी-रचनेत पिंड आणि ब्रह्मांड यांची कल्पना केली जाते. तरी 'ब्रह्मांडी तेची पिंडी असे' (दा. ९.४.४४) किंवा पिंडासारखी ब्रह्मांडरचना (दा. ९.५.१) आहे. या पिंडात व ब्रह्मांडात प्रत्येकी चार देह[१४] मानले जातात. ते असे : - 'स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । हे च्यारी पिंडीचे देह जाण' (दा. ९.५.४) आणि 'विराट हिरण्य अव्याकृत आणि मूळप्रकृती हे खूण । ब्रह्मांडीची

(दा. ९.५.४) म्हणजे पिंडात स्थूळ, सूक्ष्म, कारण आणि महाकारण, असे चार देह आहेत, तर ब्रह्मांडात विराट, हिरण्य, अव्याकृत आणि मूळ[१५] प्रकृती असे चार देह असतात[१६]. आता मूळप्रकृती म्हणजेच मूळमाया[१७] आहे. म्हणून मूळमाया हीच ब्रह्मांडातील चौथा महाकारण देह आहे.[१८] (ब्रह्मांडीचे महाकारण । ते मूळमाया जाण । दा. १२.६.२६).

ब्रह्मांडातील स्थूळ देह म्हणजे विराट, सूक्ष्म देह म्हणजे हिरण्य, अव्याकृति हा कारण देह आणि मूळप्रकृती / मूळमाया हा महाकारण देह होय. हेच ईश्वराचे तनु - चतुष्टय होय. हा चार देहांचा भाग शास्त्रात सांगितला आहे म्हणजेच तो शास्त्राचा विषय आहे (हे शास्त्राधारी, जाणावी । दा. ९.५.६). अशाप्रकारे, ईश्वरतनुचतुष्टय (दा.१०.१०.१५) पाहून झाले. या ओवीतील मागचा चरण 'ऐसे पंचीकरण शास्त्रप्रमेय' (दा. १०.१०.१५) आहे. यावरून कळते ते असे की :- शास्त्राने सांगितलेले ब्रह्मांडातील ईश्वराचे तनुचतुष्टय म्हणजे पंचीकरण आहे. थोडक्यात सांगायचे झाल्यास: पंचीकरण म्हणजे ब्रह्मांडातील ईश्वराचे तनु-चतुष्टय होय.

**दुसरे स्थळ : दा. १७.८.३३:-** दासबोधाच्या सतराव्या दशकाच्या आठव्या समासाच्या उपसंहारात 'इतिश्री पंचीकरण । केलेचि करावे विवरण ।' (दा. १७.८.३३) ही ओवी येते. म्हणजे या दा. १७.८. मध्ये जे सांगितले ते पंचीकरण आहे. या १७.८ मध्ये पुढील विषय येतात :

१) सूक्ष्म देह हा अंत:करणपंचक, प्राण-पंचक, ज्ञानेंद्रिय-पंचक, कर्मेंद्रिय-पंचक आणि विषय - पंचक अशा पाच पंचकांनी बनलेला आहे (दा. १७.८.१-१६)

(२) स्थूळ देह हा आकाशगुण- पंचक, वायुगुण- पंचक, तेजगुण - पंचक, जलगुण-पंचक आणि पृथ्वीगुण - पंचक यांनी बनलेला आहे (दा. १७.८.२३-२९)

(३) कारण देह हा तिसरा, व

(४) महाकारण देह चौथा (दा. १७.८.३०)

हे चार देह पिंडातील आहेत हे स्पष्ट आहे. याचा अर्थ असा झाला की पिंडातील (जीव) तनु-चतुष्टय म्हणजे पंचीकरण आहे.

म्हणजे अर्थ असा झाला :- पंचीकरण म्हणजे ब्रह्मांडातील ईश्वर-तनु-चतुष्टय तसेच पंचीकरण म्हणजे पिडातील जीव-तनु-चतुष्टय होय. म्हणजेच पिंडातील चार देह व ब्रह्मांडातील चार देह म्हणजे पंचीकरण होय. वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास : मूळमायेतील पंच भूतांपासून बनलेली सर्व स्थूल - सूक्ष्म सृष्टी किंवा

पिंडब्रह्मांड रचना म्हणजे रामदासस्वामींचे पंचीकरण आहे.

पंचीकरणाचा हाच अर्थ तपशीलाशिवाय उरलेल्या दोन स्थळीच्या ओव्यांत-जेथे पंचीकरण शब्द येतो - अभिप्रेत आहे.

**तिसरे स्थळ : दा. १५.५.३०:-** ही ओवी अशी आहे: 'ब्रह्मांडाचे महाकारण । तेथून हे पंचीकरण । महावाक्याचे विवरण । वेगळे असे ॥ (दा.१५.५.३०)

ब्रह्मांडाचा महाकारण देह म्हणजे[१९] मूळमाया हे आपण वर पाहिले आहे. मूळमायेतील पंचभूतांपासून पंचीकरण सुरू होते म्हणजे पिंड ब्रह्मांडाची रचना होते हेही आपण वर पाहिले आहे.

महावाक्य हे जीव-ब्रह्माच्या ऐक्याशी निगडित आहे. त्याचा पिंडब्रह्मांड रचनेशी संबंध नाही, हेही आपण वर पाहिले आहे.

**चौथे स्थळ : दा. १५.३.१ :-** मूळमायेतील पाच भूते व्यक्त स्वरूपात येऊन संपूर्ण पिंड ब्रह्मांड रचना होते हे आपण वर पाहिले आहे. तेच "मूळापासून सैरावैरा । अवघा पंचीकरण पसारा । त्यात साक्षात्काराचा दोरा । तोही तत्त्वरूप ॥ (दा.१५.३.१), या ओवीच्या पहिल्या दोन चरणात सांगितलेले आहे आणि या पिंड ब्रह्मांडात तत्त्वरूप साक्षित्व अनुस्यूत आहे असे या ओवीच्या ३-४ चरणात सांगितले आहे. या उत्तरोक्ताचा खुलासा असा. पिंड ब्रह्मांडात तत्त्वरूप साक्षित्व अनुस्यूत आहे, याचे दोन अर्थ होऊ शकतात : १) तत्त्वरूप असणारी जाणीवमय माया पिंड - ब्रह्मांड रचनेत अनुस्यूत आहे. २) ब्रह्म हेच सर्वत्र सर्वांतरी तत्त्वरूपाने साक्षी आहे. या दोन्हीचा दासबोधाच्या आधारे असा खुलासा करता येतो :

१) रामदासस्वामींच्या मते, ब्रह्मांड हे[२०] तत्त्वांचा समुदाय आहे. 'पुढे तत्त्व विवंचना । पिंड ब्रह्मांड तत्त्व रचना' (दा. ८.४.४५). तत्त्वे ही मूळ मायेत[२१] असतातच (तत्त्वे मुळीच आहेत । दा. ८.३.५५). पिंडातील चार व ब्रह्मांडातील चार असे आठ देह अधिक प्रकृति व पुरुष मिळून होणारे दहा देह हेच तत्त्वांचे लक्षण आहे.[२२] मूळमाया हा ब्रह्मांडातील चौथा देह आहे. या मूळमायेत[२३] जाणीव आहे अथवा मूळमाया जाणीवरूप आहे[२४], हे वर पाहिले आहे. त्यामुळे ब्रह्मांडात जाणीवरूप मूळमाया आहे. या मूळमायेला अनेक नावे आहेत (दा.१०.१०.७). त्यातील काही पुरुषनामे (म्हणजे पुलिंगी नामे) आहेत (दा. १०.१०.२२), काही स्त्री-नामे आहेत (दा.१०.१०.२२), तर काही नपुंसक[२५] लिंगी नामे (१०.१०.२९) आहेत. मूळमायेची काही पुरुषनामे अशी:- 'मूळमाया तोची मूळपुरुष । (दा. ८.३.२०; ८.३.२३),

तसेच:- मूळमाया तोची मूळपुरुष । तोची सर्वांचा ईश । अनंत नामी जगदीश । तयासीच बोलिजे ।। (दा. ८.३.२०); आणखी 'परमात्मा परमेश्वरू । परेश ज्ञानधन ईश्वरू । जगदीश जगदात्मा जगदेश्वरू । पुरुषनामे ।।' (दा.१०.१०.१६). या पुरुषनामांत अंतरात्मा असे एक[२६] नांव मूळ मायेला आहे. 'आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । द्रष्टा साक्षी सर्वात्मा ।। (दा. १०.१०.१८). या वरील सर्व विवेचनाचा अर्थ असा की मायाच सर्वत्र तत्त्वरूप अंतरात्मा साक्षी आहे.

२) आणखी असे : - ब्रह्म जरी नामरूपातीत आहे (दा. ८.२.४५), तरी त्याला अनंत नावे दिली जातात (दा. ८.२.५७; ७; ३; ४१). हे ब्रह्म सर्व ब्रह्मांडाला व्यापून आहे ( ब्रह्म ब्रह्मांडी कालवले । पदार्थांसी व्यापून ठेले । सर्वांमध्ये विस्तारले । अंशमात्रे (दा. ७.४.१६); शाश्वत ब्रह्म हे सर्व ठिकाणी सदोदित व्याप्त आहे (ऐसी माया अशाश्वत । ब्रह्म जाणीव शाश्वत । सर्वांठायी सदोदित । भरले असे ।। (दा. ७.४.४१).

आता घडते ते असे : मायेमुळे ब्रह्म हे साक्षी आहे. असे म्हटले जाते (साक्षत्व चैतन्यत्व सत्ता । हे गुण ब्रह्माचिया माथा । आरोपले जाण वृथा । मायागुणे ।। (दा.७.५.८३). म्हणजे जोपर्यंत माया खरी मानली जाते तोपर्यंत ब्रह्म हे साक्षी ठरते (जंव खरेपण मायेसी । तंवची साक्षत्व ब्रह्मासी ।। दा. ७.५.१०). याचा अर्थ असा होतो की ब्रह्माडांत तत्त्वरुपाने ब्रह्म हे साक्षी आहे.

येथपर्यंत पंचीकरण म्हणजे काय हे पाहून झाले. त्याचवेळी जाता जाता आनुषंगिकपणे महावाक्याचे विवरण आणि तत्त्वरुप साक्षित्व यांचाही विचार झाला. वरील पंचीकरणाच्या विवेचनावरुन हे स्पष्ट होते की शंकरार्यांच्या केवलाद्वैत तत्त्वज्ञानात ज्या अर्थाने पंचीकरण शब्द वापरला जातो त्या अर्थाने रामदासस्वामी दासबोधात पंचीकरण शब्द वापरत नाहीत. तर पंचीकरण शब्दाने त्यांना मूळ मायेतील पंच भूतांपासून बनलेली पिंड ब्रह्मांड रचना हा अर्थ अभिप्रेत आहे.

वर पाहिले की पंचीकरण व महावाक्यविवरण हे परमार्थाला मूलभूत आहेत असे रामदासस्वामी सांगतात. परंतु त्या दोहोपैकी पंचीकरण ज्ञान हे अधिक महत्त्वाचे आहे असा त्यांचा सूर दिसतो. म्हणूनच ते म्हणतात:- "सकळ सृष्टीचे बीज । मूळमायेत असे सहज । अवघे समजता सज्ज । परमार्थ होतो" (दा. २०.४.१७).

**तळटीपा**

१) श्रीरामदास्वामींबद्दल प्रा.बेलसरे म्हणतात, "श्रीसमर्थाइतका विवेकाचा पुरस्कार भारतातील काय पण भारताबाहेरील तत्त्वचिंतकांत क्वचित्च दृष्टीस पडतो" (प्रा. के. वि. बेलसरे, दासबोध, सज्जनगड,शके १८९७, व्यक्ती आणि तत्त्वज्ञान पृ.१)

२) पहा : तत्रैव निवेदन, पृष्ठ १

३) तसेच : प्रपंच 'करावा नेमका । पाहावा परमार्थ विवेका । (दा.११.३.२)

४) प्रपंची पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण । महावाक्याचे निरुपण । करिता सुटे।। दा.११.३.३९

५) सकळ परमार्थास मूळ । पंचीकरण महावाक्य केवळ । तेचि करावे प्रांजळ । पुन्हा पुन्हा ।। दा. ११.४.१०.

६) ब्रह्मांडाचे महाकारण । तेथून हे पंचीकरण । महावाक्याचे विवरण । वेगळे असे ।। दा.१५.५.३०

७) प्रस्तुत ग्रंथातील माया हा लेख पहा.

८) म्हणूनच रामदासस्वामी अद्वैतावरील ग्रंथांची स्तुति करतात, ती अशी : ग्रंथ नाही अद्वैतापरता (दा. ७.९.२८). परमार्थ करणाऱ्याने अद्वैत ग्रंथाचे श्रवण करावे (अद्वैत ग्रंथ परमार्थी । श्रवण करावे ।। दा.७.९.५). ज्याला स्वत:चे हित साधावयाचे असेल, त्याने नेहमी अद्वैत ग्रंथांचा विचार करावयास हवा (जयासी स्वहित करणे । तेणे सदा विवरणे । अद्वैत ग्रंथ ।। दा. ७.९.२६)

९) या पंचीकरणाची सविस्तर चर्चा शंकराचार्यांच्या 'केवलाद्वैतातील पंचीकरण' या माझ्या लेखात आहे.

१०) सदानंदकृत वेदान्तसार हा ग्रंथ पहावा.

११) येक येक भूतापोटी । पंचभूतांची राहाटी ।। (दा. ८.३.६१); आणीक येक येक भूती । पंच भूते असती । (दा. ८.४.६)

११अ) या स्थळी या ओव्यांचा भावार्थरूप अर्थ दिला आहे. त्याचा सविस्तर स्पष्टीकरणात्मक अर्थ पुढे येतो.

१२) संक्षेपाने:- ब्रह्मापासून मूळमाया झाली (दा. ९.६.२६; १०.४.९). नित्यमुक्त-क्रियारहित अशा ब्रह्मात सूक्ष्म अशी मूळमाया झाली (दा.८.२.३). निश्चळ ब्रह्मात चंचळ माया सूक्ष्म रूपात येते (दा.१५.७.१). निराभास अशा ब्रह्मात मूळमायेचा जन्म झाला (दा. १०.३.१)

१३) निश्चळ ब्रह्मातील चांचल्य अथवा चंचळ संकल्प म्हणजे मूळमाया आहे (दा.१३.३.३-४; १५.७.२). चांचल्य हा वायूचा गुणधर्म आहे; त्या संकल्पात असणारी चंचलपण आणण्याची शक्ती म्हणजे वायु आहे (दा.१५.७.४)

१४) हे चार देह पिंडामध्ये जीवाला आणि ब्रह्मांडामध्ये चार देह ईश्वराला मानले जातात.

१५) अहंपणे जाणीव जाली । तेचि मूळप्रकृती बोलिली । महाकारण काया रचिली । ब्रह्मांडाची ।। (दा.१०.१०.१३)

१६) च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडी । ऐसी अष्टदेहांची प्रौढी ।। (दा.८.७.४१)

१७) मूळमाया मूळप्रकृती । मूळपुरुष ऐसे म्हणती । शिवशक्ती नामे किती । नानाप्रकारे ।। (दा.१०.१०.७)

१८) पिंडातून देह मोजण्यास सुरवात केल्यास ब्रह्मांडातील महाकारण देह हा आठवा होतो. म्हणून रामदासस्वामी कधी मूळमायेला आठवा देह असेही म्हणतात. (आठवा देह मूळ्माया ।। दा. १३.२.१९)

१९) महामाया ( = महाकारण) मूळप्रकृती । कारण ते अव्याकृती । सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती । विराट ते स्थूळ ।। दा. १०.१०.१४). पिंडातील चत्वार देहांना स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण म्हटले जाते.

२०) स्थूल व सूक्ष्म पदार्थ म्हणजेच तत्त्व असा अर्थ रामदासस्वामींना अभिप्रेत आहे. ब्रह्माच्या बाबतीत ते प्राय: वस्तू हा शब्द वापरतात.

२१) मूळमायेचे चळण । तेचि वायोचे लक्षण । सूक्ष्म तत्त्वे तेची जाण । जडत्वा पावली । ऐसी पंच महाभूते । पूर्वी होती अव्यक्ते । पुढे जाली व्यक्ते । सृष्टीरचनेसी ।। (दा.८.३.५६-५७). गुणांपासूनी भूते । पावली स्पष्ट दशेते । जडत्वा येऊन समस्ते । तत्त्वे जाली । (दा. ८.४.४४).

२२) स्थूळ सूक्ष्म कारण । महाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळ प्रकृति जाण । ऐसे अष्टदेह ।। च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडी । ऐसी अष्टदेहांची प्रौढी । प्रकृति पुरुषांची वाढी । दश देह बोलिजे ।। ऐसे तत्त्वांचे लक्षण ।। दा. ८.७.४०-४२). पाहाता देहाचा विचार। अवघा तत्त्वांचा विस्तार (दा.६.२.३); तत्त्वांचे गाठोडे शरीर (दा.६.२.३३).

२३) तैसी मूळप्रकृती ब्रह्मांडाची । देह महाकारण साचे । म्हणौन तेथे जाणीवेचे । अधिष्ठान आले (दा. ९.६.५); जाणीव मूळमाया (दा.१०.१०.१५).

२४) म्हणून सर्व भूतांतही जाणीव आहे, असे रामदासस्वामी सांगतात:- म्हणौनि जाणीव नेणीव - मिश्रीत । अवघे चालिले पंच भूत । म्हणौनिया भूतांत । जाणीव असे ।। कोठे दिसे कोठे न दिसे । परी ते भूती व्यापून असे । तीक्ष्ण बुद्धी करिता भासे । स्थूळ सूक्ष्म ।। पंचभूते आकारली । भूती भूते कालवली । तरी पाहाता भासली । येक स्थूल येक सूक्ष्म ।। निरोधवायो न भासे । तैसी जाणीव न दिसे । न दिसे परी ते असे । भूतरूपे ।। (दा. ९.६.२०-२३). जाणीवरूप मूळ्माया । जाणीव जाते आपुल्या ठाया । गुप्त प्रकट होऊनि । विश्वी वर्ते ।। (दा. ९.८.२६).

२५) 'अंत:करण' हे मूळमायेचे नपुंसकलिंगी नाम आहे (दा.१०.१०.३०) आणि हे अंत:करण म्हणजे जाणीव (दा.१०.१.१२) आहे किंवा जाणीव म्हणजे अंत:करण (दा.१०.१.२६) आहे आणि 'जाणीवरूपे अंत:करण । सकळांचे येक हे प्रमाण' (दा.१०.१.१५) आहे.

२६) तो सर्वान्तरात्मा बोलिजे (दा. १०.१०.२०); चंद्रसूर्य तारामंडळे । भूमंडळे मेघमंडळे । येकवीस स्वर्ग सप्त पाताळे । अंतरात्माच वर्तवी ।। (दा. १०.१०.२१).

●●●

# ४. जीवात्म्याचे तनु-चतुष्टय

लोकसंग्रहासाठी श्रीसमर्थ रामदासस्वामींनी आपला दासबोध हा ग्रंथ रचला. त्यामध्ये त्यांनी अनेक विषयांचे विवरण केले आहे. परमार्थ तसेच प्रपंच या दोहोंविषयीचे विवेचनही त्यात दिसून येते. पण तसे करताना त्यांनी असे सांगितले की माणसाने नुसता प्रपंच करू नये अथवा नुसता परमार्थ करू नये. त्यांच्या मतानुसार मनुष्याने प्रपंच करतानाच परमार्थही करावयास हवा. म्हणून ते म्हणतात.

"प्रपंची जो सावधान । तो परमार्थ करील जाण ।

प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ (१२.१.१)

म्हणून त्यांनी आदेश दिला आहे की, "म्हणोनि सावधपणे । प्रपंच परमार्थ चालवणे " (१२.१.१०) हे मानवाचे या जगातील कर्तव्य आहे.

**देहाची उपयुक्तता :** आता प्रपंच काय किंवा परमार्थ काय, काहीही करताना देह (तनु) आवश्यकच आहे. देहाशिवाय माणसाला काहीच करता येत नाही. प्रपंचातील तसेच परमार्थातील इष्ट गोष्टी मिळविण्यास देह हा उपयुक्तच आहे. आणि हा जो मानवी देह आहे. तो माणसाला काही सुखासुखी प्राप्त झालेला नाही. या जगातील चौऱ्यांशी लक्ष योनींत जन्म घेता घेता नर-तनु प्राप्त झाली आहे (बहुता जन्मांचा शेवट । नरदेह सांपडे अवचट ॥ ११.३.१). म्हणजेच या संसारात नरदेह हा फार दुर्लभ आहे (नरदेह संसारी । परम दुर्लभ असे ॥ ८.७.२०). नाना सुकृतांचे फळ या स्वरूपात नर-शरीर लाभते (नाना सुकृतांचे फळ । तो हा नरदेह केवळ । २.४.१). पाप-पुण्य जेव्हा समान होते, तेव्हाच नर-तनूची प्राप्ती होते (पाप पुण्य समता घडे । तसेच नरदेह जोडे (८.७.२१)

**नरदेहाचे सार्थक :** असा दुर्लभ नरदेह[१] मिळाल्यावर तो आपण सफळ केला पाहिजे (जन्मा आलियाचे फळ । कांही करावे सफळ ॥ (२.४.१२). नरदेह प्राप्त झाला असता, त्याला उचित असे आत्महित साधून घ्यावयास हवे (नरदेहाचे उचित । काही करावे आत्महित ॥ २.४.१३) आणि आत्महित करावयाचे म्हणजे परमार्थ करावयाचा. देहाचा उपयोग जर परमार्थासाठी केला तरच त्या शरीराचे सार्थक होणार आहे (१.१०.६१); नाहीतर हा नरदेह फुकट जाणार आहे.

**परमार्थाचे साध्य :** मग प्रश्न असा येतो; परमार्थ करावयाचा म्हणजे नक्की काय करावयाचे ? याला रामदासस्वामींचे उत्तर असे आहे :- परमार्थ करावयाचा म्हणजे सायुज्यता मुक्ति[२] प्राप्त करून घ्यावयाची. ही सायुज्यता मुक्ति ज्ञानाने प्राप्त होते.

म्हणून ज्या ज्ञानाने सायुज्यता मुक्ति मिळविता येते, ते ज्ञान प्राप्त करून घेणे म्हणजे परमार्थ करणे होय. या सायुज्यता मोक्षासाठी आत्म्याचे/ब्रह्माचे ज्ञान व्हावयास हवे. हे आत्म्याचे/ब्रह्याचे ज्ञान म्हणजे : आपण म्हणजे जीव हा निर्गुण आत्मा/ब्रह्म आहे हे ज्ञान होय (ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान/पाहावे आपणांशी आपण । या नाव ज्ञान ॥ ५.६.१). वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास : शुद्ध आत्मस्वरूप हेच आपले म्हणजे आपणा जीवांचे सत्य स्वरूप आहे, हे ज्ञान होय. (शुद्ध स्वरूपचि आपण । या नाव शुद्धस्वरूप ज्ञान ॥ ५.६.१). संक्षेपाने, आत्मज्ञान म्हणजे आपणा जीवांचे खऱ्या स्वरूपाचे ज्ञान हे सायुज्य मुक्तिसाठी आवश्यक आहे.

**आत्मज्ञानाला अडसर :** तथापि हे आत्मज्ञान आपणास नेहमीच्या या जगातील ज्ञानाच्या व्यवहारात होत नाही. याचे कारण माणूस खरा आत्मा जाणून न घेता आपल्या देहालाच आत्मा मानीत असतो. उदा. : माणूस म्हणतो 'मी उंच आहे'. येथे आपण देहालाच मी म्हणजे आत्मा समजीत असतो. अशा प्रकारे शरीराला/देहाला आत्मा मानणे ही देहबुद्धी आहे (तेचि काया मी आपण । हे देह बुद्धीचे लक्षण ॥ ६.८.४१) आणि देह म्हणजे आत्मा म्हणजे आपण - मी - हे जे मीपण (अहंकार) आहे,त्यामुळे आत्मा किंवा ब्रह्म ही वस्तू आपणांस कळून येत नाही (ब्रह्म न पविजे । मीपणें ॥ (६.८.४५); मीपणें वस्तू ना कळे ॥ ७.७.४५; देव राहिला परता अहं गुणे ॥ ८.१.१४)

या देहबुद्धीने आपले अनहित होते. माणसाचे हित हे देहाच्या पलीकडे आहे (हित आहे देहातीत । म्हणोनि निरोपित संत । देहबुद्धीने अनहित। होंचि लागे ॥ ७.२.३६). याच देहबुद्धीने जीवब्रह्माची जी ऐक्यता आहे, तिला बाध येतो. म्हणून ही देहबुद्धी दूर करणे आवश्यक आहे. ही देहबुद्धी लयाला गेली तर परमार्थ साधतो; देहबुद्धी म्हणजेच देहाभिमान संपला की ब्रह्माची प्राप्ती होते. (म्हणोनि देहबुद्धी हे झडे । तरीच परमार्थ घडे । देहबुद्धीने बिघडे । ऐक्यता ब्रह्मांची ॥ ७.२.३९; देहाभिमानाचे अंती । सहजचि वस्तुप्राप्ति ॥ ८.६.४८). जो मीपणांतून म्हणजे देहाभिमानातून सुटतो, तोच मुक्त होतो (मीपणापासून सुटला । तोचि येक मुक्त जाला ॥ ७.६.५४). वेगळ्या शब्दांत सांगायचे झाल्यास : माणूस देहबुद्धीमुळे संसाराच्या बंधनात अडकलेला आहे. म्हणून ही देहबुद्धी विवेकाने दूर करावयास हवी; म्हणजे संसार बंधनातून सुटका होईल. ही देहबुद्धी नष्ट झाल्यावर म्हणजेच देहातीत झाल्यावर मोक्षपद मिळणार आहे (देहबुद्धीने बांधला । तो विवेकें मोकळा केला । देहातीत होता पावला । मोक्षपद ॥ ६.२.३६). मोक्षासाठी, ब्रह्मैक्य साधण्यासाठी देहातीत व्हावे लागते याचे

कारण असे की आत्मा हा चारही[३] देहापेक्षा वेगळा आहे. देह नाशवंत आहेत. या उलट आत्मा हा जन्म-मृत्युरहित आहे; तोच जीवाचे खरे स्वरूप आहे. (असो चहूं देहावेगळा । जन्मकर्मासी निराळा । सकळ आबाळ गोवळा । सबाह्य तू ॥ ५.६.५६)

**देह कसा आहे ?** ज्या देहांपेक्षा आत्मा संपूर्णपणे वेगळा आहे. तो देह आहे तरी कसा ? या प्रश्नाचे उत्तर असे आहे :- ज्या देहावर आपण मीपण/अहंकार/अभिमान बाळगतो आणि ज्यावरील अभिमानामुळे आपणास आत्मज्ञान होत नाही, तो देह म्हणजे अनेक तत्त्वांचे[४] गाठोडे आहे (तत्त्वांचे गाठोडे शरीर (६.२.३३). ज्या तत्त्वांनी देह[५] बनला आहे, त्या तत्त्वांच्या उपाधीपेक्षा साक्षी आत्मा वेगळा आहे (नाना तत्त्वांचे उपाधी -। वेगळा आत्मा ॥ ८.७.३९, आत्मा साक्षी विलक्षण ॥ ८.७.४२). म्हणून या तत्त्वांचा विवेक करून, जर तत्त्वझाडा[५] केला, तर निखळ आत्मा उरतो आणि मीपण नाहीसे होते. (तत्त्वांचे गाठोडे शरीर । याचा पाहातां विचार । येक आत्मा निरंतर । आपण नाही ॥६.२.३३; पाहातां देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार । तत्त्वें तत्त्व झाडिता सार । आत्माच उरे ॥ ६.२.२०). विवेकाने तत्त्वांचा निरास केला असता, आपल्याला आत्मप्राप्ति होते (तत्त्वनिरसने आपणांस । आपण लाभे ॥ ६.३.१९)

विवेकाने असा तत्त्वझाडा होण्यास, देह व त्याची तत्त्वे यांची माहिती व्हावयास हवी. म्हणून रामदासस्वामींनी दासबोधात देह व त्यांची तत्त्वे यांचे विवरण केले आहे. ते आता पुढे दिले आहे.

**तनु-चतुष्टय = चार देहांचा समूह** - व्यवहारात सर्वसाधारणपणे माणसाला आपला व इतरांचा स्थूल देह दिसतो व त्याची थोडीफार माहिती असते. पण या स्थूलदेहाचे जोडीने आणखी तीन देह आहेत. ते व्यवहारात बहुधा माहीत नसते. अध्यात्मात मानवाला प्राय: चार देह[६] आहेत, असे म्हटले जाते.

| कोष्टक क्र. - १ **स्थूल देह** | | | | |
|---|---|---|---|---|
| आकाश | वायु | तेज | आप/जल | पृथ्वी |
| काम | चळण | क्षुधा | शुक्र | अस्थि |
| क्रोध | वळण | तृषा | शोणित | मांस |
| शोक | प्रसारण | आलस्य | लाळ | त्वचा |
| मोह | निरोध | निद्रा | मूत्र | नाडी |
| भय | आकुंचन | मैथुन | स्वेद | रोम |

कोष्टक क्र. २

**सूक्ष्म[१३] देह**

| अंत:करण पंचक | प्राण पंचक | ज्ञानेंद्रिय पंचक | कर्मेंद्रिय पंचक | विषय पंचक |
|---|---|---|---|---|
| अंत:करण | व्यान | श्रोत्र | वाचा | शब्द |
| मन | समान | त्वचा | हात | स्पर्श |
| बुध्दी | उदान | चक्षू | पाय | रूप |
| चित्त | अपान | जिव्हा | शिश्न | रस |
| अहंकार | प्राण | नासिका | गुद | गंध |

कोष्टक क्र. ३

सूक्ष्म देहातील पाच पंचकांच्या प्रत्येक घटकाशी असणारा एकेका भूताचा संबंध

| पाच पंचकातील घटक | आकाश | वायू | तेज | आप | पृथ्वी |
|---|---|---|---|---|---|
| अंत:करण - पंचक | अंत:करण | मन | बुद्धी | चित्त | अहंकार |
| प्राण - पंचक | व्यान | समान | उदान | अपान | प्राण |
| ज्ञानेंद्रिय-पंचक | श्रवण | त्वचा | नयन | जिव्हा | घ्राण |
| कर्मेंद्रिय-पंचक | वाचा | हात | चरण | शिश्न | गुद |
| विषय पंचक | अहंकार | शब्द | स्पर्श | रस | गंध |

हे चार देह असे : (१) स्थूल (२) सूक्ष्म (३) कारण आणि (४) महाकारण. हे चार देह[७] पिंडात आहेत. (स्थूल, सूक्ष्म, कारण महाकारण। हे च्यारी पिंडीचे देह जाण ॥९.५.४). यातील स्थूल व सूक्ष्म देहातील तत्त्वे आणि कारण व महाकारण या देहांचे स्वरूप हा भाग रामदासस्वामींनी पुढीलप्रमाणे सांगितला आहे.

**(१) पहिला स्थूल देह :** आकाश, वायू, तेज, जल आणि पृथ्वी या पंच महाभूतांच्या मिश्रणाने स्थूल देह बनलेला आहे. तो चर्मचक्षूंना दिसणारा आहे. या पंचमहाभूतांचे प्रत्येकी पाच गुण आहेत. ते गुणही साहजिकच स्थूल देहात अनुभवण्यास मिळतात. काम, क्रोध, शोक, मोह आणि भय हे आकाशाचे पाच गुण आहेत. चळण, वळण,

प्रसारण, निरोध व आकुंचन हे वायूचे पाच गुण आहेत. क्षुधा, तृषा, आलस्य, निद्रा आणि मैथुन हे तेजाचे पाच गुण आहेत. शुक्र, रेत, शोणित/रक्त, लाळ, मूत्र आणि स्वेद हे आपाचे (जलाचे) पाच गुण आहेत. आणि शेवटी अस्थि, मांस, त्वचा, नाडी व रोम (= केस) हे पृथ्वीचे पाच धर्म आहेत (दास १७.८.२३-२८; १७.९.१२-१६). आता, प्रत्येक पाच भूतांचे पाच गुण किंवा धर्म हे प्रत्येकाचे असल्याने, एकंदर (५ x ५=) २५ गुण किंवा धर्म या स्थूलदेहात दिसून येतात. (पृथ्वी, आप, तेज, वायो आकाश । हे पांचाचे पंचविस । ऐसे मिळोन स्थूलदेहांस । बोलिजेते ॥१७.८.२९; असो ऐसे हे स्थूलशरीर । पंचवीस तत्त्वांचा । विस्तार ॥ १७.९.१७)

**(२) दूसरा सूक्ष्म देह :** सूक्ष्म[८] शरीर हे पाच पंचकांनी[९] बनलेले आहे. ही पाच पंचके अशी आहेत. : अंत:करण, मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार हे पाच मिळून अंत:करण[१०] पंचक बनते (१७.८.४-१०). व्यान, समास, उदान, अपान आणि प्राण मिळून प्राण पंचक होते. श्रोत्र, त्वचा, डोळा, जिव्हा व नाक हे मिळून ज्ञानेंद्रिय-पंचक होते. वाचा, हात, पाय, शिश्न व गुद हे मिळून कर्मेंद्रिय-पंचक बनते आणि शब्द, स्पर्श, रुप, रस व गंध या विषयांपासून विषय - पंचक तयार होते (१७.८.१२-१४). अशाप्रकारे [११] अंत:करण-पंचक, प्राण-पंचक, ज्ञानेंद्रिय-पंचक, कर्मेंद्रिय-पंचक आणि विषय-पंचक या पाच पंचकांनी मिळून एकूण २५ घटकांनी सूक्ष्म देह सिद्ध होतो (अंत:करण प्राण पंचक । ज्ञानेंद्रिये कर्मेंद्रिये पंचक । पाचवे विषय-पंचक । ऐसीं ही पांच पंचके ॥ ऐसे हे पंचविस गुण । मिळोन सूक्ष्म देह जाण ॥ (१७.८.१५-१६)

या पाच पंचकांचे किंवा पंचविस गुणांचे मिश्रण (कर्दम) सूक्ष्म शरीरात असते (१७.८.१६). त्यामुळे प्रत्येक पंचकातला एकेक घटक हा एकेका भूतांशी संबंधित होतो. म्हणजे असे : अंत:करण, व्यान, श्रवण, वाचा आणि शब्द हे आकाशाशी निगडित होतात. मन, समान, त्वचा, हात आणि[१२] स्पर्शरूप हे वायूशी संबंधित आहेत. बुद्धि, उदान, नयन, चरण आणि रूपाचे दर्शन यांचा संबंध तेजाशी आहे. चित्त, अपान, जिव्हा, शिश्न आणि रस हे आप म्हणजे जल या भूताशी संबंधित आहेत. आणि शेवटी अहंकार, प्राण, घ्राण, गुद व गंध हे पृथ्वीशी निगडित आहेत (१८.८.१७-२१). तेव्हा नीट विचार केला म्हणजे सूक्ष्म देह वरील प्रकारचा आहे, हे कळून येते. (ऐसा हा सूक्ष्म देह । पाहातां होईजे निसंदेह । येथ मन घालूनि पाहे । त्यासीच हे उमजे ॥ १७.८.२२)

**कोष्टके :** वर जे स्थूल व सूक्ष्म देहाचे घटक इत्यादी सांगितले, ते कोष्टकात मांडावेत, असे रामदासस्वामी सांगतात. हेतू हा की एका दृष्टिक्षेपात हा सगळा भाग चट्‌दिशी लक्षात येऊ शकेल (कोठा करावा ॥१७.८.१८) ही कोष्टके पान ७२-७३ वर पाहावीत.

**(३) तिसरा कारण देह :** स्थूल देह हा सर्व दार्शनिकांना मान्य आहे. काही तत्त्वज्ञान्यांनी सूक्ष्म देह स्वीकारला. त्यात नंतर कारण देह व महाकारण देह या दोन देहाची भर घातली गेली. त्यामध्ये कारण[१४] देह हा तिसरा आहे. अज्ञान हाच कारण देह आहे (तिसरा देह कारण अज्ञान । १७.८.३०)

**(४) चौथा महाकारण देह :** वर उल्लेखिलेला तिसरा कारण देह अज्ञानरूप आहे. तर चौथा देह हा ज्ञानरूप आहे. म्हणून रामदासस्वामी सांगतात, की ज्ञान म्हणजेच चौथा महाकारण[१५] देह आहे (चौथा देह महाकारण ज्ञान । १७.८.३०)

**चार देहांची बत्तीस तत्त्वे :** वर पाहिल्याप्रमाणे स्थूल देहाची २५ तत्त्वे आणि सूक्ष्म देहाची २५ तत्त्वे होतात. आता हे चारही देह जर एकत्रितपणे लक्षात घेतले, तर आणखी ३२ तत्त्वे होतात. ही बत्तीस[१५-अ] तत्त्वे कशी व कोणती हे आता पुढे सांगितले आहे.

या चार देहांमुळे माणसाला चार अवस्थांतून जावे लागते. त्या चारही अवस्थेत कार्य करणारे चैतन्य (= आत्मा) असतो. या चार आत्म्यांची स्थूल देहात विशिष्ट स्थाने सांगितली जातात. या चार देहात काही शक्ती कार्यप्रवण असतात आणि या चार देहाअंती माणसाला काही भोग प्राप्त होऊ शकतात. हे सर्व लक्षात घेऊन, रामदासस्वामी सांगतात : स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण[१६] हे देह अनुक्रमे जागृति, स्वप्न, सुषुप्ति व तुर्या या अवस्थांत[१७] असतात. या चारही अवस्थेत जे चैतन्य कार्यप्रवण असते, त्याला आत्मा म्हणून भिन्न नावे दिलेली आहेत, ती अशी : या चार अवस्थांत कार्य करणारे चैतन्य म्हणजेच चार अवस्थांचे अभिमान बाळगणारे असे चार आत्मे असतात. हे म्हणजे विश्व, तैजस, प्राज्ञ आणि प्रत्यगात्मा हे होत. या चार आत्म्यांची नेत्र, कंठ हृदय आणि मूर्धा (डोके) अशी चार स्थाने आहेत. या चार देहाद्वारा चार अवस्थांत माणसाला सुख-दु:खाचे जे भोग मिळतात, ते आहेत स्थूलभोग, प्रविविक्त भोग, आनंद भोग आणि आनंदावभास भोग. (१७.९.१-३)

येथेच या चार भोगांचे थोडे अधिक स्पष्टीकरण करावयास हवे. जागृति अवस्थेत इंद्रियांमार्फत विषयांशी संयोग झाला असता, सुख-दु:खाचा जो अनुभव येतो, तो स्थूलभोग. स्वप्न अवस्थेत प्रविविक्त भोग असतो. प्रविविक्त म्हणजे शब्दश: वेगळा

केलेला, म्हणजे इतर भोगांपेक्षा वेगळा असणारा. स्वप्न हे जीव-कृत मानले जाते. त्यातील भोग हा त्या जीवाने निवडलेला असतो असे म्हणता येते. किंवा प्रविविक्त म्हणजे शब्दश : वेगळा केलेला, म्हणजे इतर भोगांपेक्षा वेगळा असणारा. स्वप्न हे जीव-कृत मानले जाते. त्यातील भोग हा भोगत्या जीवाने निवडलेला असतो असे म्हणता येते. किंवा प्रविविक्त भोग म्हणजे सूक्ष्म शरीरात अंत:करणाला येणारा सुख-दु:खाचा अनुभव. या भोगाचे वेळी स्थूल देह व इंद्रिये निष्क्रिय असतात. सुषुप्ती अवस्थेत देह व अंत:करण कार्यप्रवण नसतात. तथापि त्या अवस्थेत आनंद असतो. आणि तो 'मी सुखाने/आनंदात झोपलो होतो.' या स्वरूपात जागे झाल्यावर व्यक्त केला जातो. अशा प्रकारे सुषुप्ती अवस्थेत आनंदाचा भोग असतो.

आत्तापर्यंत सांगितलेले हे तीनही प्रकारचे भोग माणूस आपल्या दैनंदिन व्यावहारिक जीवनात अनुभवत असतोच. तथापि चौथ्या तुर्या अवस्थेतील भोग हा परमार्थात विशिष्ट साधना झालेल्या पुरुषाच्या अनुभवाला येणारा असतो. निद्रेच्या पलीकडील तुर्या ही अवस्था आहे. तेथेही आनंद असतो. तेथे ब्रह्माचे ज्ञान असल्याने आनंद असतो. परंतु या अवस्थेत मायेचेही ज्ञान असल्याने हा शुद्ध ब्रह्मानंद नसतो; म्हणून त्याला रामदासस्वामींनी आनंदावभास असे म्हटले आहे.

या चार देहातील भोग सांगून झाल्यावर, या चार देहांच्या शक्ती लक्षात घेण्यास हरकत नाही. स्थूलदेहाची क्रियाशक्ती, सूक्ष्म देहाची द्रव्यशक्ती, कारण देहाची इच्छाशक्ती आणि महाकारण देहाची ज्ञानशक्ती अशा या चार शक्ती आहेत (१७.९.६). यातील क्रियाशक्ती म्हणजे क्रिया किंवा कर्म करण्याची शक्ती होय. द्रव्यशक्ती शब्दाने[१८] रामदासस्वामींना काय सुचवावयाचे आहे, हे कळत नाही. इच्छाशक्तीचा अर्थ असा असावा : कारणदेहाची इच्छाशक्ती. कारणदेह म्हणजे अज्ञान. अज्ञानाने म्हणजे सत्याच्या अज्ञानाने इच्छा वाढत जातात. म्हणून कारणदेहाची इच्छाशक्ती. महाकारण देहाची ज्ञानशक्ती. महाकारण देह हा ज्ञानरूप असल्याने त्याची ज्ञानशक्ती आहे.

यानंतर रामदासस्वामी देहांचा व गुणांचा संबंध सांगतात. तो लक्षात येण्यास रामदासस्वामींनी सांगितलेली[१९] विश्वोत्पत्तीची प्रक्रिया थोडक्यात लक्षात घ्यावयास हवी. ती अशी :- मुळात निश्चल, निर्गुण, ब्रह्म ही एकमेव वस्तू आहे. निश्चल ब्रह्मात उत्पन्न होणाऱ्या चंचलाला मूळमाया म्हणतात. या मूळमायेत प्रथमपासूनच सत्त्व, रज, तम हे तीन गुण व पाच सूक्ष्म भूते असतात (९.६.१४-१५; १०.२.१२-१३).

मूळमाया हीच पुढे गुणक्षोभिणी माया वा गुणमाया होते. पुढे पंच सूक्ष्म भूते ही सृष्टीरचनेत व्यक्त दशेला येऊन, त्यापासून पिंड-ब्रह्मांडातील सर्व वस्तू उत्पन्न होतात (९.६.७; ८.३.५६; ८.४.४४-४५). सृष्टीरचनेत पिंड व ब्रह्मांड यांची कल्पना केली जाते. त्यातील प्रत्येक पदार्थात तीन गुण येतातच. पिंडामध्ये स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण देह आहेत. साहजिकच त्यांचा गुणाशी संबंध येतोच. देह व गुण यांचा संबंध रामदासस्वामी असा सांगतात : स्थूलदेहाचा तमोगुण आहे, सूक्ष्म देहाचा रजोगुण आहे, कारण देहाचा सत्त्वगुण आहे आणि महाकारण देहाचा शुद्ध सत्त्वगुण आहे (१७.९.५). सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण आपल्या परिचयाचे आहेत. तसा शुद्धसत्त्वगुण परिचित नाही. शुद्ध सत्त्वगुणाची रामदासस्वामींची संकल्पना अशी आहे :- सर्व 'तत्त्वांमध्ये[२०] जे मुख्य तत्त्व आहे, त्याला शुद्ध सत्त्व म्हणतात. त्यालाच अर्धमात्रा, महत्तत्त्व मूळमाया म्हणतात (तत्त्वांमध्ये मुख्य तत्त्व । ते जाणावे शुद्ध सत्त्व। अर्धमात्रा महत्तत्त्व । मूळमाया ।। १२.५.११) वर उल्लेखिल्याप्रमाणे मुळमायेत सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण सूक्ष्म रूपाने असतात. (१५.७.९) आणि जेथे सत्त्व, रज व तम हे तीन गुण गूढ वा सूक्ष्मरूपाने असतात, त्यालाच महत्तत्त्व किंवा शुद्ध सत्त्व म्हणतात (तयासीच म्हणिजे महतत्त्व । जेथे त्रिगुणाचे गूढत्व । अर्धमात्रा शुद्ध सत्त्व । गुणक्षोभिणी ।।२०.९.२७). याचा अर्थ इतकाच की, मूळमायेलाच शुद्ध सत्त्व अथवा शुद्ध सत्त्वगुण म्हणतात. येथेच जाता जाता आणखी एक गोष्ट लक्षात घ्यावी. मूळमाया हाच ब्रह्मांडातील महाकारण देह आहे (तैसी मूळप्रकृती ब्रह्मांडीचे । देह महाकारण साचें ।। ९.६.५; आठवा देह मूळमाया ।। ११.४.११; ब्रह्मांडीचे महाकारण । ते मूळमाया जाण ।। १२.६.२६) साहजिकच महाकारण देहाचा गुण शुद्धसत्त्वगुण ठरतो.

ॐकार अक्षर हे आपणास परिचित आहे. त्याच्या अ, उ, म आणि अर्धमात्रा अशा चार मात्रा आहेत. त्यांचा विविध पदार्थांशी संबंध पूर्वीच्या वाङ्मयात[२१] दाखविलेला आढळतो. प्रस्तुत स्थळी रामदासस्वामींनी चार देहांचा संबंध चार मात्रांशी सांगितला आहे. तो असा : स्थूल देहाची अकार ही मात्रा आहे. सूक्ष्म देहाची उकार ही मात्रा आहे. कारणदेहाची मात्रा मकार आहे तर [२२] महाकारण देहाची मात्रा अर्धमात्रा आहे (१७.९.४).

अशाप्रकारे चार देह, चार अवस्था, चार अभिमानी आत्मे, चार आत्म्यांची स्थाने, चार योग, चार शक्ती, चार गुण व चार मात्रा या सर्वांची बेरीज केली तर ती बत्तीस तत्त्वे होतात. म्हणून चार देहाची एकूण ३२ तत्त्वे होतात, असे रामदासस्वामींनी म्हटले आहे.

**चार देहांची ८२ तत्त्वे -** मागे पाहिल्याप्रमाणे स्थूल देहाची २५ तत्त्वे आहेत. तशीच सूक्ष्म देहाचीही २५ तत्त्वे आहेत आणि निराळ्या दृष्टिकोनातून सांगितलेली चार देहांची एकूण ३२ तत्त्वे आहेत. या सर्वच तत्त्वांची बेरीज केली तर ती ८२ होते. म्हणून रामदासस्वामींचे मते चार देहांची एकूण तत्त्वे ब्याऐंशी (८२) आहेत. (ऐसी ही बत्तीस तत्त्वे । दोहींची पन्नास तत्त्वें । अवघी मिळोन ब्यांसी तत्त्वे । अज्ञान आणि ज्ञान ॥ १७.९.७)

(वरीलप्रमाणे ८२ तत्त्वे सांगून झाल्यावर सटीप दासबोधात प्रा. बेलसरे (दासबोध पृ. ९२३) म्हणतात. "शिवाय ज्ञान आणि अज्ञान ही दोन्ही आणखी घालावयाची. अशी एकंदर चौऱ्यांशी तत्त्वे होतात." (दासबोध पृ. ९२३). परंतु त्यांचे हे म्हणणे संपूर्णपणे चूक आहे. याची कारणे दोन : (१) ज्ञान आणि अज्ञान ही दोन स्वतंत्र तत्त्वे नाहीत. याचे कारण असे : कारणदेह म्हणजेच अज्ञान आहे आणि महाकारण देह म्हणजेच ज्ञान आहे (१७.८.३०). साहजिकच कारण देह व महाकारण देह ही तत्त्वे सांगितली की अज्ञान व ज्ञान ही तत्त्वे वेगळी राहत नाहीत. (२) खुद्द रामदासस्वामीं ८२ तत्त्वे असेच म्हणतात. ते चौऱ्यांशी तत्त्वे सांगतच नाहीत.)

**चार देहांच्या तत्त्वांचा झाडा -** चार देहांची ही ८२ तत्त्वे मायिक म्हणजे मायाजन्य आहेत. त्या तत्त्वांपेक्षा आपण म्हणजे जीव वेगळे आहोत. कारण आपण निर्गुण आत्मा आहोत. या तत्त्वांपेक्षा संपूर्ण वेगळा असणारा साक्षी आत्मा आपण आहोत हे जाणून विवेकाने या तत्त्वांचा निरास करावयास हवा. (ऐसी ही तत्त्वें जाणावी । जाणोन मायिक वोळखावी । आपण साक्षी निरसावी । येणे रीती ॥ १७.९.८) या तत्त्वांचे निरसन म्हणजे[२३] तत्त्वझाडा झाला की आपणास आपली म्हणजे आत्म्याची प्राप्ती होते. (तत्त्व निरसने आपणास । आपण लाभे ॥ ६.३.१९) आणि देहावरील अहंतेचा नाश होऊन निर्गुण ब्रह्माशी ऐक्यता होते. (तत्त्वझाडा निःशेष होता । तेथें निमाली देह अहंता । निर्गुण ब्रह्मी ऐक्यता । विवेके जाली ॥ ६.३.२१). तत्त्वांचे निरसन झाले की देह म्हणजे मी असे असणारे मीपण उरत नाही; तर आपण म्हणजे निर्गुण आत्मा हे कळून येते (जालियां तत्त्वांचे निरसन । निर्गुण आत्मा तोचि आपण । का दाखवावे मीपण । तत्त्व निरसना उपरी ॥ ६.३.३०). तत्त्वांच्या निरसनामुळे मीपणाचा निरास होतो; मीपणाचा निरास झाला की [२४] निर्गुण ब्रह्म उरते आणि ते ब्रह्म आपणच आहोत असा प्रत्यय येतो (तत्त्वांमध्ये मीपण गेले । तरी निर्गुण सहजचि उरले । सोहंभावे प्रत्यया आलें । आत्मनिवेदन ॥ ६.३.३१)

**चार देहांच्या निरसनाने आत्मसाक्षात्कार :** चार देहांच्या ८२ तत्त्वांचे निरसन झाले की चार देहांचे निरसन होते. चार देहाचे निरसन म्हणजे चारही देहांपेक्षा आपण जीव वेगळे आहोत, आपण जीव निर्गुण ब्रह्म । आत्मा आहोत, हे विवेकाने जाणून घ्यावयाचे. विवेकाने देहांचा विचार केला की तत्त्वांचे निरसन होऊ लागून, आपण म्हणजे देह नव्हे हे प्रत्ययाला येते (विवेकें देहाकडे पाहिले । तो तत्त्वें तत्त्व वोसरले । आपण काही नाही आलें । प्रत्ययासी ॥ ६.३.२२). चार देहांचे निरसन झाले की जे विज्ञान उरले तेच परब्रह्म आहे (हे च्यारी देह निरसिता विज्ञान । परब्रह्म ते ॥ १७.८.३०). आपण चार देहापेक्षा वेगळे आहोत, हे विवेकाने कळले की त्या देहांच्या तत्त्वांबरोबरच देहांवरील मीपण लयाला जाते आणि जीव आणि ब्रह्म हे एकरूप होऊन जातात (विचारे चौंदेहांवेगळे केले । मीपण तत्त्वांसरिसे गेले । अनन्य आत्मनिवेदन जाले । परब्रह्मी ॥ (१७.८.३१)

अशा प्रकारे विवेकाने देहाचे निरसन करून, ब्रह्माशी ऐक्यता साधली की जन्म-मृत्यूचे रहाट-गाडगे चुकते आणि सायुज्यमुक्ती मिळते म्हणजेच नरदेहात साधावयाचे एक सत्कृत्य[२५] साध्य होऊन, मानवदेहाचे सार्थक होते. सायुज्यता मुक्ति प्राप्त होऊन माणूस कृतकृत्य होतो.

---

**तळटीपा -**

१. प्रपंच परमार्थातील देहाची उपयुक्तता सविस्तरपणे दासबोध १.१० आणि १८.४ येथे सापडते.

२. सायुज्यमुक्ती म्हणजे जीवाने ब्रह्मरूप होऊन जाणे. निर्गुण ब्रह्म हे जे आपले सत्य स्वरूप आहे ते मिळविणे म्हणजे सायुज्यमुक्ति (निर्गुण अनन्य असता । तेणे होये सायुज्यता । सायुज्यता म्हणिजे स्वरूपता ॥ ४.१०.३०)

३. या चार देहांची माहितीच प्रस्तुत लेखात आलेली आहे.

४. तत्त्वें तत्त्व मेळविले । त्यासी देह हे नाव ठेविले ॥६.३.२०;
पाहातां देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार ॥ ६.२.३०

५. तत्त्व हा शब्द रामदासस्वामी विशिष्ट अर्थाने वापरतात. त्या अर्थांसाठी पहा : या ग्रंथातील तत्त्वझाडा हा लेख.

६. ज्ञानेश्वरमहाराजांनी आणखी एक पाचवा देह सांगितला आहे. पाचही देहांच्या अन्य तपशीलासाठी पहा : के. वा. आपटे, परमार्थातील पाच देह, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक (१९९३), १९९४, नागपूर.

७. परमार्थांत पिंडी ते ब्रह्मांडी असा न्याय आहे. (पिंडासारखी ब्रह्मांडरचना । ९.५.१; जे पिंडी तेचि ब्रह्मांडी ।। ९.५.२). म्हणून पिंडातल्याप्रमाणे ब्रह्मांडातलेही चार देह सांगितले जातात. ते असे : विराट हिरण्य अव्याकृत मूळप्रकृती । हे खूण ब्रह्मांडाची ।। (९.५.४). पिंड-ब्रह्मांडातले सर्व देह एकत्रितपणे रामदासस्वामींनी पुढीलप्रमाणे दिले आहेत : स्थूल सूक्ष्म कारण । महाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळप्रकृती जाण । ऐसे अष्टदेह ।। च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडी । ऐसी अष्टदेहांची प्रौढी । प्रकृति पुरुषाची वाढी । दश देह बोलिजे ।। ८.७.४०-४१

८. सूक्ष्म शरीरालाच काही जण लिंग शरीर किंवा वासना देह म्हणतात. याचे घटक कोणते याबद्दल इतर दर्शनात मतभेद आहेत. हे सूक्ष्म शरीर २५ घटकांनी बनते, असे रामदासस्वामी सांगतात.

९. पंचक म्हणजे पाच वस्तूंचा समूह

१०. अंत:करण - पंचकाच्या अधिक विवेचनासाठी पहा : या ग्रंथातील अंत:करण-पंचक

११. अंत:करण पंचक हा आकाशाचा गुण, प्राणपंचक हा वायूचा गुण, ज्ञानेंद्रिय-पंचक हा तेजाचा गुण, कर्मेंद्रिय-पंचक हा आपाचा-जलाचा-गुणधर्म आणि विषय पंचक हा पृथ्वीचा गुण असे सांगून (१७.८.१८-२२) रामदासस्वामींनी या पाच पंचकांचा संबंध पंचभूतांशी जोडला आहे.

१२. वर म्हटल्याप्रमाणे पाच पंचकांतील प्रत्येक घटकांशी असणारा एकेका भूतांचा संबंध सांगितलेला आहे. त्यामुळे 'स्पर्शरूप हा पवनी' (१७.८.१८) मध्ये प्रा. बेलसरे (दासबोध, दहावी आवृत्ती, सातारा, १९९६, पृष्ठ ९१९) यांनी केल्याप्रमाणे स्पर्श आणि रूप हें वेगळे घेता येणार नाहीत. तर स्पर्श हा एकच गुण वायूशी संबंधित असा घ्यावयास हवा. तरच रामदासस्वामींना अभिप्रेत असल्याप्रमाणे, पाच पंचकातील एकेका घटकाशी असणारा भूताचा संबंध सुसंगत ठरतो. त्यामुळे 'स्पर्श-रूप' असा एकच सामासिक शब्द घ्यावा लागतो. मग अर्थ होतो : स्पर्शरूप या गुणाचा संबंध वायूकडे आहे.

१३. वरील कोष्टक वेगळ्या पध्दतीने प्रा. बेलसरे यांनी आपल्या दासबोध, पृष्ठ ९२१ वर दिले आहे. तेथे त्यांनी 'कोष्टक दुसरे : स्थूल देहाची पंचवीस तत्वे' असे म्हटले आहे. पण ते बरोबर दिसत नाही. कारण अंत:करणपंचक, इत्यादी पाच तत्त्व पंचके ही सूक्ष्म देहाचे घटक आहेत.

१४. या कारण देहाची अधिक माहिती रामदासस्वामींनी दिलेली नाही.

१५. महाकारण देहाची अवस्था तुर्या आहे, असे रामदासस्वामी पुढे सांगतात; ही अवस्था ज्ञानरूप आहे. या अवस्थेत माया व ब्रह्म या दोहोंचेही ज्ञान असते. (जाणे ब्रह्म जाणे माया । आणि अनुभवाच्या ठाया । ते येक जाणावी तुर्या ।

सर्वसाक्षिणी ।। ७.४.४९). येथे ब्रह्माचे शुद्ध अनुभवजन्य ब्रह्मज्ञान नसल्याने हे शुद्ध आत्मज्ञान नव्हे असे रामदासस्वामी बजावतात (म्हणोनि शुद्ध ज्ञान तुर्येच। मानुचि नये । ५.६.९)

१५-अ. ८.७.३३ या आधारे ही बत्तीस तत्त्वे सांगितलेली आहेत.

१६. या चार देहांच्या संदर्भात रामदासस्वामी ज्या चार गोष्टी सांगतात, त्या गोष्टी यथासंख्य न्यायाने सांगितल्या आहेत. त्यामुळे स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण हा क्रम लक्षात घेऊन त्याच क्रमाने त्याच्याशी पुढील चार गोष्टी जोडावयाच्या आहेत.

१७. जागृति अवस्थेत शरीर, इंद्रिये व अंत:करण हे सर्व कार्यप्रवण असतात. स्वप्न अवस्थेत अंत:करण कार्यप्रवण असते. सुषुप्ति अवस्थेत केवळ अज्ञान असते. तुर्या अवस्थेत माया व ब्रह्म या दोहांचेही ज्ञान असते.

१८. 'द्रव्यंशक्ती म्हणजे दृश्य पदार्थांमधील सुप्त शक्ती होय.' असा अर्थ प्रा. बेलसरे (दासबोध, पृ. ९२३) देतात. पण तो बरोबर वाटत नाही. कारण ही शक्ती स्वप्न अवस्थेची आहे. तेथे कोणतेही बाह्य दृश्य पदार्थ नसतात.

१९. दासबोधातील माया व विश्वोत्पत्तीची प्रक्रिया यांच्या सविस्तर विवेचनासाठी पहा :- या ग्रंथातील माया हा लेख.

२०. रामदासस्वामींच्या मते, तत्त्व शब्दाने निर्गुण ब्रह्म ही वस्तू सोडून अन्य सर्व पदार्थ तत्त्व शब्दाने सूचित होत होतात. पहा : तत्त्वझाडा हा या ग्रंथातील लेख.

२१. उदा. मांडूक्य या उपनिषदात अ, उ आणि म या तीन मात्रांचा संबंध जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्था इत्यादीशी दाखविला आहे.

२२. आणखी पहा : १२.६.११

२३. पहा : तत्त्वझाडा हा या ग्रंथातील लेख

२४. तत्वांती उरले तत्त्वतां । निर्गुण ब्रह्म ।।६.३.२३

२५. विवेकें चुकला जन्ममृत्यु । नरदेहीं साधिले महत्कृत्य ।। १७.८.३२ ।।



# ५. अंतःकरण-पंचक

आपल्या महाराष्ट्रात श्रीसमर्थ रामदासस्वामी हे एक महान संत होऊन गेले. इतर संतांपेक्षा त्यांचे कार्य आणि लेखन हे बरेचसे वेगळ्या स्वरूपाचे आहे. त्यांचा दासबोध हा ग्रंथ तर अनेक दृष्टींनी अपूर्व आहे. तो एकाद्या पूर्वीच्या ग्रंथावरची टीका किंवा भाष्य अथवा भावार्थ या स्वरूपाचा नाही. प्रपंच आणि परमार्थ हे दोन्हीही कसे करावेत हे सांगणारा दासबोध आहे. रामदासस्वामींचे मत असे आहे की माणसाने केवळ प्रपंच करू नये किंवा केवळ परमार्थाच्याही मागे लागू नये,[१] तर मनुष्याने प्रपंच करीत असतानाच परमार्थही करावयास हवा. म्हणून प्रापंचिक पुरुषाने संसारात कसे वागावे याचाही बोध रामदासस्वामींनी केला आणि परमार्थही कसा करावा याचे सविस्तर मार्गदर्शनही त्यांनी दासबोधात केले आहे. परमार्थ करू इच्छिणाऱ्या माणसाला उपयोगी पडणाऱ्या आत्मा / ब्रह्म, माया, विश्वोत्पत्ति, आत्मानात्मविवेक, चार देह, इत्यादि विषयांचा ऊहापोह त्यांनी दासबोधात केला आहे. या ऊहापोहातच त्यांनी इतर संतांनी न सांगितलेले सूक्ष्म देहातील अंतःकरण-पंचक सांगितलेले आहे. या अंतःकरण-पंचकाचा अधिक विचार प्रस्तुत संक्षिप्त लेखात केला आहे.

**शरीराचा शोध :-** परमार्थ करू इच्छिणाऱ्याला प्रथम नित्यानित्य-वस्तु-विवेक अथवा आत्मानात्म-विवेक करावा लागतो. नित्य एक आत्मा आहे आणि देह हा अनित्य आहे हे जाणणे म्हणजे आत्मानात्म-विवेक किंवा नित्यानित्य वस्तुविवेक करणे होय (देह अनित्य आत्मा नित्य । हाचि विवेक नित्यानित्य ॥ दास. १३-१-२३). आत्मा/ब्रह्म अंतिम सत्तत्त्व आहे. तो नित्य आहे म्हणजे वर्तमान इत्यादि तीनही काळांत अस्तित्वात असणारा आहे; तो अविकारी, अविनाशी, कूटस्थ नित्य आहे. या उलट देह तसा नाही :- देह अनित्य आहे; तो आज आहे उद्या नाही. आत्मा हा सच्चिदानंद आहे. आत्मा सोडून उरलेले सर्व जे जे आहे असे वाटते किंवा भासते ते अनात्मा आहे. हे जाणून घेणे म्हणजे आत्मानात्मविवेक होय. आत्मानात्मविवेक करण्याची आवश्यकता पुढील कारणाने निर्माण होते:- आपण (जीव) खरे तर आत्मा आहोत; शुद्ध आत्मस्वरूप हेच आपले सत्य स्वरूप आहे (शुद्ध स्वरूपाचे आपण / या नाव शुद्ध स्वरूप ज्ञान ॥ दास. ५-६-१०). साहजिकच आपण म्हणजे देह नव्हे. तथापि व्यवहारात मात्र आपण शरीरालाच आत्मा मानीत असतो.

ती चुकीची समजूत दूर व्हावी यासाठी शरीरापेक्षा आत्मा वेगळा आहे हे ज्ञान होणे अत्यावश्यक आहे.

**देह किती ?** - देहापेक्षा आत्मा भिन्न आहे हे जाणून घ्यायचे झाल्यास, देह आहेत तरी किती याचाही[२] शोध घ्यावा लागतो. व्यक्तींच्या संदर्भात, पिंडामध्ये[३] चार देह आहेत असे दासबोधात सांगितलेले आहे. हे चार देह असे : स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण (स्थूल सूक्ष्म कारण महाकारण । ऐसे हे चत्वार देह जाण ।। दास.१७-९-१) या चार देहांची थोडक्यात माहिती अशी : या भूतलावर मरेपर्यंत वावरणारा प्राण्यांचा स्थूल देह हा प्रत्यक्ष दिसणारा आहे. तो कुणालाच नाकारता येत नाही. तो आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी या पंचमहाभूतांच्या मिश्रणाने बनलेला आहे. जे तत्त्वज्ञानी लोक आत्मा नित्य मानतात आणि तो परलोकी जातो असेही मानतात, ते एक सूक्ष्म देह मानतात. या स्थूल व सूक्ष्म देहांच्या जोडीने कारण आणि महाकारण असे आणखी दोन देह मानले जातात. कारण देह हा अज्ञानरूप आहे तर महाकारण देह हा ज्ञानरूप आहे (तिसरा देह कारण अज्ञान । चौथा देह महाकारण ज्ञान ।। दास. १७-८-३०). या चार देहांपैकी सूक्ष्म देहाशी निगडित असे अंत:करण-पंचक आहे.

**सूक्ष्म देहाचे घटक** - सूक्ष्म देहालाच कधी कधी वासना-शरीर किंवा लिंग शरीर असे म्हटले जाते. या सूक्ष्म देहाचे घटक कोणते याविषयी तत्त्वज्ञ माणसांत मतभेद आहे. केवलाद्वैत वेदान्त तत्त्वज्ञानानुसार, पाच प्राण,[४] पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, मन आणि बुद्धि अशा सतरा घटकांनी सूक्ष्म शरीर बनलेले आहे. सांख्य-दर्शनानुसार, पाच तन्मात्रे,[५] पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, मन, बुद्धि आणि अहंकार या अठरा घटकांनी सूक्ष्म देह बनला आहे. तर रामदासस्वामींच्या मते, सूक्ष्म देहाचे पंचवीस घटक आहेत. हे पंचवीस घटक असे : - पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये, पाच-प्राण, पाच-विषय,[६] आणि अंत:करण-पंचक[७] (अंत:करण प्राण पंचक । ऐसी ही पाच पंचके ।। ऐसे हे पंचविस गुण । मिळोन सूक्ष्म देह जाण ।। दास. १७.८.१५-१६)

**अंतःकरण-पंचक** - वर पाहिल्याप्रमाणे, अंत:करण-पंचक हा सूक्ष्म देहाचा घटक आहे. अंतकरण-पंचक हा शब्द म्हणजे तीन संस्कृत शब्द एकत्र येऊन बनलेला एक समास आहे. त्यामध्ये अंत: (अंतर्),[८] करण आणि पंचक अशी तीन घटक पदे आहेत. अंतर् हा शब्द अव्यय तसेच विशेषणही आहे. त्याचा अर्थ आहे आत किंवा आतील. करण या शब्दाला संस्कृतमध्ये अनेक अर्थ आहेत; परंतु येथे इंद्रिय हा अर्थ अपेक्षित आहे. पंचक म्हणजे (कोणत्याही) पाचांचा-पाच गोष्टींचा-समूह असा अर्थ

आहे. म्हणून अंत:करण-पंचक म्हणजे 'आतील पाच इंद्रियांचा समूह' असा अर्थ होतो. येथे 'आतील' शब्दाने काय सूचित होते हेही लक्षात घ्यावयास हवे. डोळा, कान इत्यादि पाच ज्ञानेंद्रिये ही बाहेरील शब्द, स्पर्श, इत्यादि पाच विषयांच्या संनिकर्षात येतात आणि ज्ञानाची सामग्री अंत:करणाला पुरवितात. अंत:करण हे कर्मेंद्रियांनाही प्रेरणा देते. कर्मेंद्रिये ही सुद्धा बाह्य विषयांशी संबंधित होतात. या ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांच्याप्रमाणे अंत:करण मात्र बाह्य विषयांशी साक्षात्पणे संबंधित होत नाही. ते सूक्ष्म शरीरात राहून आपले कार्य करते. म्हणूनच त्याला अंत:करण म्हणतात.

पाच ज्ञानेंद्रियाद्वारा आलेल्या संवेदनांचे चिंतन, पृथक्करण, संयोगीकरण, निर्धारण इत्यादि करण्याचे काम अंतर् इंद्रिय अथवा अंत:करण करते. त्यामुळे त्या त्या कार्याला धरून अंत:करणाचे कधी दोन, कधी तीन तर कधी चार भाग मानले जातात. मन, चित्त, बुद्धी आणि अहंकार असे हे चार भाग आहेत. या चारांमध्ये 'अंत:करण' या भागाची स्वतंत्रपणे भर घालून रामदासस्वामींनी अंत:करण-पंचक सांगितले आहे.

**अंत:करण-पंचकाची अधिक माहिती** - या अंत:करण पंचकाची अधिक माहिती रामदासस्वामींनी दासबोधात पुढीलप्रमाणे दिलेली आहे:- अंत:करण हे नाभीच्या ठिकाणी परा[१] वाचेचे स्थानी असते (नाभीस्थानी परा वाचा । तोची ठाव अंत:करणाचा ॥ दास.१७.८.३). आठवण असताना उगीचच जे निर्विकल्प स्फुरण होते, त्याला अंत:करण म्हणतात (निर्विकल्प जें स्फुरण । उगेच असता आठवण । तें जाणावें अंत:करण । जाणती कळा ॥ दास. १७.८.४). याचा अर्थ असा दिसतो की ज्ञानेंद्रियद्वारा बाह्य संवेदना येत नसताना, ज्याला स्मृतिरूप ज्ञान होते, ते अंत:करण होय. अंत:करणात आठवण आल्यावर पुढे "आहे नाही" असे वाटते, "करावे न करावे" असे वाटते; हे ज्याला वाटते ते मन (अंत:करण आठवलें । पुढें होय नव्हेसें गमलें । करूं न करूं ऐसें वाटलें । तेंचि मन ॥ दास. १७.८.५). म्हणजे संकल्प आणि विकल्प करणे हे मनाचे स्वरूप आहे. (संकल्प विकल्प तेंचि मन ॥ दास.१७.८.६). याचा भावार्थ असा : - अंत:करणात स्मृति जागृत झाली असताना किंवा इंद्रियाच्या मार्फत संवेदना आली असताना, 'हे असे आहे, हे असे नाही', हे करावे, हे करू नये', अशी जी दोलायमान वृत्ति तिला मन म्हणतात. या वृत्तीत निश्चितपणा नसतो; "हे" की "ते" असा संदेह असतो; म्हणून मन संकल्प विकल्प

करते असे म्हणतात. यासाठीच 'संकल्प-विकल्पात्मकं मनः' अशी मनाची व्याख्या संस्कृतमध्ये दिली जाते. संक्षेपाने सांगायाचे झाल्यास, निश्चितपणाच्या अभावी, संशयात असणारी द्विधा वृत्ती म्हणजे मन.

मनाची दोलायमान स्थिती दूर होऊन जर तेथे एखादा निश्चय झाला, तर ती संशयग्रस्त द्विधा स्थिती संपते. उदा. "अमुक गोष्ट अशी अशीच आहे", "ते तसेच आहे", 'हे करायचे आहे आणि ते करायचे नाही', अशाप्रकारचा निश्चय होतो. हे निश्चय करण्याचे कार्य करणाऱ्या वृत्तीला बुद्धी असे म्हणतात. (पुढे निश्चयो तो जाण । रूप बुद्धीचे ॥ दास. १७.८.६) म्हणजे "एखादी गोष्ट मी करीन, दुसरी करणार नाही", अशाप्रकारचा निश्चय करणारी बुद्धी असते (करीनचि अथवा न करीं । ऐसा निश्चयोचि करी । तेचि बुद्धि हे अंतरी । विवेकें जाणावी ॥ दास. १७.८.७). थोडक्यात, निश्चय करते ती बुद्धी, म्हणून "निश्चयात्मिका बुद्धिः" अशी बुद्धीची व्याख्या संस्कृतमध्ये दिली जाते. निश्चय म्हणजेच अध्यवसाय. म्हणून "अध्यवसायात्मिका बुद्धिः" असेही म्हटले जाते.

निश्चयानंतर ज्या गोष्टीचा निश्चय झाला आहे, त्या गोष्टीचे चिंतन सुरू होते. हे चिंतन करण्याचे कार्य जे करते, ते चित्त होय. (जो वस्तूचा निश्चयो केला । पुढे तेचि चिंतू लागला । ते चित्त बोलिल्या बोला । यथार्थ मानावें ॥ दास. १७.८.८). म्हणजे निश्चित झालेल्या गोष्टीवर चिंतन करणारे चित्त होय. म्हणून चिंतन करते ते चित्त (चिंतयति इति चित्तम्।), असे म्हटले जाते.

त्यानंतर ज्या कार्याचा निश्चय झाला आहे व ज्या कार्यावर चिंतन झाले आहे, त्या कार्यावर अभिमान धारण करणारी वृत्ति निर्माण होते; तिलाच अहंकार म्हणतात. "अमुक अमुक कार्य माझे आहे, ते मला करायवयास हवे" असा अभिमान बाळगणारे अंतरिंद्रिय म्हणजे अहंकार होय (पुढे कार्याचा अभिमान धरणें । हे कार्य तो अगत्य करणें । ऐसा कार्यास प्रवर्तणें । तोचि अहंकारु ॥ दास. १७.८.९). मी मला, माझे या शब्दांनी अहंकार व्यक्त होतो. "मी श्रीमंत आहे, मी बलवान आहे; मला द्रव्य पाहिजे आहे, मला सुंदर स्त्री पत्नी म्हणून हवी; माझी मोठी इस्टेट आहे, माझी मुलेबाळे आहेत;" इत्यादि स्वरूपात अहंकार व्यक्त होत असतो.

वरील सर्व विवेचनाचा संक्षिप्त गोषवारा असा देता येईल : - आतील करण म्हणजे आतील इंद्रिय हे वृत्तिरूप असते. या वृत्ति वर वर्णिल्याप्रमाणे पाच असू शकतात. म्हणजे त्या त्या कार्याच्या विभागाप्रमाणे एकच वृत्ति पाच प्रकारांनी प्रगट

होते. त्या पाच प्रकारांनाच अंत:करण-पंचक असे म्हटले जाते. (ऐंसे अंत:करण-पंचक । पंचवृत्ती मिळोन येक । कार्यभागें प्रकार पंचक । वेगळाले ॥ दास.१७.८.१०). शरीरात खेळणारा एकच वायु शरीरातील निरनिराळ्या भागात वेगवेगळी कार्ये करीत असल्याने, ज्याप्रमाणे तो पाच प्राण (प्राण-पंचक) म्हणून ओळखला[१०] जातो, त्याप्रमाणे एकच अंत:करण पाच प्रकारांनी ओळखले जाते, तेच अंत:करण पंचक होय.

**अंतःकरण-पंचक का मानले ?** - पारंपारिक पद्धतीप्रमाणे, अंत:करण हे एक, दोन तीन किंवा चार असे न मानता, रामदासस्वामी अंत:करण-पंचक का मानतात? असा एक प्रश्न येथे निर्माण होतो. त्या प्रश्नाचे उत्तर रामदासस्वामींनी दिलेले नाही. परंतु ते उत्तर आपण शोधू शकतो. ते उत्तर असे : परंपरागत वाङ्मयात, सूक्ष्म देहाच्या घटकांमध्ये, पाच ज्ञानेंद्रिये (= ज्ञानेंद्रिय-पंचक), पाच कर्मेंद्रिये (= कर्मेंद्रिय-पंचक) आणि पाच प्राण (= प्राण-पंचक) हे घटक होतेच. त्यामध्ये पाच विषयांची भर (विषय-पंचक) रामदासस्वामींनी घातली. अशाप्रकारे सूक्ष्म शरीरात ज्ञानेंद्रिय-पंचक, कर्मेंद्रिय-पंचक, प्राण-पंचक आणि विषय-पंचक अशी एकूण चार पंचके झाली. मन, बुद्धि व अहंकार हे घटक सूक्ष्म शरीराच्या पूर्वीच्या वर्णनात होतेच; त्यामध्ये 'चित्त' घातले की अंत:करण-चतुष्टय होत होतेच. त्या अंत:करण-चतुष्टयात रामदासस्वामींनी नुसते "अंत:करण" असा एक घटक घालून अंत:करण-पंचक केले. सूक्ष्म देहाच्या वर उल्लेखिलेल्या ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, इत्यादींच्या "पंचका" शी संगति किंवा प्रमाणबद्धता (Symmetry) साधण्यास म्हणजे त्यांच्या संख्येशी अंत:करणाची संख्या जुळती / समान करुन घेण्यास रामदासस्वामींनी अंत:करण-पंचक मानले. असे केल्यामुळे पाच पदार्थांच्या पाच पंचकांनी होणाऱ्या (५×५=) पंचवीस घटकांनी सूक्ष्म देह बनतो, असे रामदासस्वामींना म्हणता आले. (वर उद्धृत केलेले दास. १७.८.१५-१६ पहा).

अशाप्रकारे सूक्ष्म शरीराच्या चार पंचक घटकांना सुसंगत होईल, असे अंत:करण-पंचक रामदासस्वामींनी मानले हे कळून येते.

**तळटीपा**

१) रामदासस्वामी सांगतात : - आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ-विवेका ॥ दास. १२.१.१; प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥ दास. १२.१.२; प्रपंच सांडून परमार्थ

केला । तरी अन्न मिळेना खायाला । मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ दास. १२.१.३; प्रपंची जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ दास. १२.१.९; म्हणौन सावधानपणें । प्रपंच परमार्थ चालवणें । दास. १२.१.१०, हे आवश्यक आहे.

२) पारमार्थिक वाङ्मयात पाच देहांचे उल्लेख येतात. त्यांची सविस्तर चर्चा पुढील लेखात आहे :- डॉ. के.वा.आपटे, परमार्थातील पाच देह, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक (१९९३), नागपूर, १९९४.

३) पिंडात चार देह, ब्रह्मांडात चार देह आणि प्रकृति व पुरुष मिळून दहा देह होतात असेही रामदासस्वामी सांगतात (दास.८.७.४)

४) प्राण, अपान,व्यान, उदान व समान या नावाचे पाच प्राण आहेत.

५) तन्मात्र म्हणजे सूक्ष्म तत्त्व. शब्द-तन्मात्र, स्पर्श-तन्मात्र, रूप-तन्मात्र, रस-तन्मात्र आणि गंध-तन्मात्र अशी पाच तन्मात्रे आहेत. पाच ज्ञानेंद्रिये अशी : - डोळा, कान, नाक, जीभ व त्वचा. पाच कर्मेंद्रिये पुढीलप्रमाणे :- हात, पाय, वाचा, गुद आणि उपस्थ.

६) शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध असे पाच विषय आहेत.

७) पंचक म्हणजे पाचांचा समूह.

८) संस्कृत भाषेत काही विशिष्ट परिस्थितीत अन्तर् मधील अन्त्य र् चा विसर्ग होऊन अंत: असे होते.

९) परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाचा मानल्या जातात.

१०) जैसे पाचही प्राण । कार्यभागें वेगळाले जाण । नाही तरी वायोंचे लक्षण । येकचि असें ॥ दास. १७.८.११



# ६. दहा देह

संसार किंवा संसरण म्हणजे प्रत्येक देहधारी प्राण्याच्या मागे लागलेले जन्ममरणाचे चक्र होय. या संसारात भ्रमण करणारा माणूस कळत न कळत प्रपंचात गुरफटून गेलेला असतो. परंतु मनुष्याने केवळ प्रपंचात रमून न जाता, परमार्थाकडे लक्ष द्यावे, असे समर्थ रामदासस्वामी आपल्या दासबोध या ग्रंथात सांगतात.

**परमार्थाची आवश्यकता** - यावर कुणी म्हणेल : " प्रपंच करताना परमार्थ करण्याची गरज आहे तरी कुठे ? परमार्थ न केल्याने प्रपंचात कुणाचे काही अडत नाही. मग प्रपंचातील व्यवहाराला अनावश्यक असणाऱ्या परमार्थाचा आचार आणि विचार हवा तरी कशाला ?" अशाप्रकारच्या प्रश्नांचे जणु उत्तर म्हणून रामदासस्वामींनी परमार्थ केल्याने होणारे काही फायदे सांगितले आहेत. त्यातील काही असे आहेत - (१) परमार्थ हा संसारातून तारणारा आहे. आणि परमार्थ केल्याने मानवी जीवनाचे सार्थक होते (परमार्थ जन्माचें सार्थक । परमार्थ संसारी तारक ॥ दास. १.९.२१) (२) प्रपंच करताना मानवाला आधिदैविक, आधिभौतिक[१] आणि आध्यात्मिक अशी तीन प्रकारची दु:खे भोगावी लागतात; त्यातून कुणाचीही सुटका नाही. या त्रिविध तापांनी संतप्त झालेल्या जीवांना परमार्थ केल्याने विसावा मिळतो (परमार्थ सकळांस विसावा ॥ दास. १.९.२०). परमार्थ केल्याने सुखदु:खाची बोच जाणवत नाही. त्या दु:खांनी मनाचे समाधान भंगत नाही (३) सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की परमार्थ केल्याने, जन्ममरणाच्या चक्रातून कायमची सुटका होते, दु:खांचा आत्यंतिक नाश होतो आणि सायुज्य[२] मुक्ति मिळते (अपूर्वता या परमार्थाची । वार्ता नाही जन्ममृत्युची । आणि पदवी सायोज्यतेचि । संनिधचि लाभे ॥ दास.१.९.१३) सायुज्य मोक्ष प्राप्त झाला की जन्ममरणाचे चक्र तुटून जाते आणि माणूस सर्व प्रकारच्या दु:खातून कायमचा मुक्त होतो. अशाप्रकारे परमार्थ हा प्रापंचिक प्राण्यांना उपयोगी असल्याने, प्रपंच करता करताच मानवाने परमार्थही करावा, असे रामदासस्वामींचे सांगणे आहे.

**प्रपंच व परमार्थ दोन्ही आवश्यक** - यावर कुणीतरी म्हणेल :- "जर परमार्थ इतका महत्त्वाचा आहे, तर मग आम्ही प्रपंच कशासाठी करावा ? आम्ही प्रपंचाकडे दुर्लक्ष करून आमचे सर्वच लक्ष परमार्थाकडे लावू". या म्हणण्यावर रामदासस्वामी सांगतात, "असे चालणार नाही. प्रपंचाकडे दुर्लक्ष करून परमार्थ करावयाचा नाही आहे. प्रपंचाकडे दुर्लक्ष करून जर परमार्थ केला तर पदरात त्रासच पडेल (प्रपंच

सोडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।। दास.१२.१.२). म्हणून प्रपंच न टाकताच परमार्थ करावयास हवा. अर्थात प्रपंच व परमार्थ दोन्ही करावयाचे म्हटले की सावधानपणा आवश्यक आहे. म्हणून रामदासस्वामी सांगतात की माणसाने सावधान राहून प्रपंच व परमार्थ हे दोन्हीही साधावयास हवेत (म्हणोनि सावधपणें । प्रपंच परमार्थ चालवणें ।। दास.१२.१.१०)

**प्रपंचाला सुवर्ण आणि परमार्थाला पंचीकरण** - आता, प्रपंच व परमार्थ हे दोन्ही करावयाचे असतील, तर त्या दोहोंसाठी ज्या गोष्टी आवश्यक आहेत, त्या मिळविणे क्रमप्राप्त आहे, हे रामदासस्वामींना ज्ञात आहे. म्हणून या दोहोंसाठी काय आवश्यक आहे, तेही त्यांनी सांगून ठेवले आहे. ते म्हणतात :- प्रपंच व्यवस्थित व्हावयाचा असेल, तर द्रव्य हे आवश्यक आहे. ''प्रपंची पाहिजे सुवर्ण'' (दास. ११.३.३९), या शब्दात पैशाची प्रपंचातील गरज रामदासस्वामी सांगतात. आता, प्रपंचाला जसे सुवर्ण आवश्यक आहे, तसे परमार्थाला काय आवश्यक आहे, असा जर कुणी प्रश्न केला, तर त्याला रामदासस्वामींचे उत्तर आहे : - परमार्थ करणाऱ्याला पंचीकरणाचे[३] ज्ञान आणि महावाक्याचे[४] विवरण या गोष्टी आवश्यक आहेत. (परमार्थी पंचीकरण । महावाक्याचें निरूपण । करिता सुटे ।। दास.११.३.३९). येथे उल्लेखिलेल्या पंचीकरणाच्या संकल्पनेत रामदासस्वामींनी दहा देहांचा निर्देश केला आहे. याच दहा देहांची चर्चा प्रस्तुत लेखात केली आहे. त्यामुळे ती चर्चा करण्यापूर्वी पंचीकरणाने रामदासस्वामींना काय अभिप्रेत आहे, हे संक्षेपाने जाणून घेणे आवश्यक ठरते.

**पंचीकरण** - पंचीकरण या दासबोधातील संकल्पनेचे संक्षिप्त स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे देता येते:- निर्गुण, निश्चळ ब्रह्म हे अंतिम सत्तत्त्व आहे. या निश्चळ ब्रह्मात चंचळ निर्माण होते, त्या चंचळाला मूळमाया म्हणतात (दास.१०.१०.५-७). निश्चळ ब्रह्मातील हे चंचळ स्फूर्ती किंवा स्मरण या स्वरूपाचे असते (दास.१०.१०.१२;१७.२.६) निराकार ब्रह्मात स्फूर्तिरूप अहंकार उठतो (दास. ४.१०.१). निर्गुण ब्रह्मात 'अहं'' (मी) या स्वरूपात उठणारी स्फूर्ती (स्फुरण) म्हणजे मूळमाया (दास.८.३.५१). ब्रह्मात उठणारा हा स्फूर्तिरूप अहंकार हा वायुस्वरूप आहे (दास.४.१०.१-२). याचाच अर्थ असा की मूळमाया ही वायुस्वरूप आहे (दास.१०.४.१०; ९.६.८.). वायुरूप अशा मूळमायेत प्रथमपासूनच सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण व आकाश, वायु तेज, जल आणि पृथ्वी ही पाच सूक्ष्म भूते असतातच (दास. १५.७.४; १०.९.१; १०.३.२). मूळमायेत तीन गुण व पाच भूते यांचे मिश्रण सूक्ष्म रूपात असते (दास. ९. ६. १४-१५). किंबहुना,

माया ही तीन गुण आणि पाच भूते यांनी बनलेली आहे (दास. ९.६.३३). तसेच, मूळमायेला पंचभूतिक (दास.८.३.५८, ६०;८.४.७) असेही म्हणता येते; कारण ती सूक्ष्म अशा पाच भूतांनी बनलेली आहे (दास.१७.२.१२-१३). विश्वोत्पत्तीच्या वेळी, मूळमायेतील ही सूक्ष्म भूते व्यक्त दशेला येऊन, सर्व तत्त्वे (पदार्थ) बनतात आणि पिंड-ब्रह्मांडाची[५] रचना होते. (दास.१२.६.१०; ८.३.५७; ८.३.५६; ८.४.४४-४५). जी पाच भूते ब्रह्मांडात आहेत, तीच पाच भूते पिंडातही[६] आहेत.पिंड आणि ब्रह्मांड हे दोन्हीही पाच[७] भूतांपासून झालेले आहेत.

**पिंडी ते ब्रह्मांडी** - आता, मूळमायेपासून झालेल्या सृष्टीत जे पिंड व ब्रह्मांड मानले जातात, त्या दोहोंच्या बाबतीत, पुढील गोष्ट लक्षात घ्यावी :- जे पिंडात आहे तेच ब्रह्मांडात आहे आणि जे ब्रह्मांडात आहे तेच पिंडातही आहे (ब्रह्मांडीं तेंचि पिंडी असे ।। दास.९.४.४४; पिंडासारखी ब्रह्मांडरचना । दास.९.५.२९; जैसें पिंड तैसें ब्रह्मांड । विचार दिसतो उघड ।। दास. २०.७.१७). किंबहुना 'जें पिंडीं तेंचि ब्रह्मांडी । ऐसी बोलावयाची प्रौढी । हे वचन घडीघडी । तत्त्वज्ञ बोलती ।। (दास.९.५.२), अशी स्थिती आहे.

आता, पिंडात चार देह आहेत (दास.९.५.४). हे चार देह पिंडातील जीवाच्या संदर्भात असल्याने, त्यांना जीव-तनु-चतुष्टय (जीवाचा चार देहांचा समूह) असे म्हटले जाते, कारण पिंडात[९] जीव हा देह धारणा करणारा आहे. पिंडातल्याप्रमाणे ब्रह्मांडातही चार देह कल्पिले जातात (ब्रह्मांडी देह कल्पिले ।। दास.१७.९.१०) ब्रह्मांडातील हे चार देह ईश्वराच्या संदर्भात असतात, म्हणून त्यांना ईश्वर-तनु-चतुष्टय (ईश्वराच्या[१०] चार देहांचा समूह), असे म्हटले जाते. पिंडातील जीवाचे चार देह आणि ब्रह्मांडातील ईश्वराचे (शिवाचे) चार देह यांचा समावेश दासबोधातील पंचीकरणाच्या संकल्पनेत होतो.

आता, पिंडांतील चार देह आणि ब्रह्मांडातील चार देह मिळून[११] आठ देह होतात. (पिंड ब्रह्मांड अष्ट काया ।। दास.२०.६.१७). या आठ देहात जर 'प्रकृति' आणि 'पुरुष' हे आणखी दोन (देह) मिळविले की एकूण दहा देह होतात (च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडी । ऐसी अष्ट देहांची प्रौढी । प्रकृति पुरुषाची वाढी । दश देह बोलिजे ।। दास.८.७.४१). हे जे दहा देह रामदास स्वामींनी सांगितले आहेत, त्यांचेच अधिक विवरण यापुढे केलेले आहे.

**आठ देहांचे परिगणन** - चार देह पिंडात आणि चार देह ब्रह्मांडात मिळून आठ देह

होतात. त्यांपैकी पिंडातील चार देह त्यांच्या विशिष्ट क्रमाने पुढीलप्रमाणे आहेत :- (१) स्थूळ (२) सूक्ष्म (३) कारण, आणि (४) महाकारण (स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । हे च्यारी पिंडीचे देह जाण ।। दास.९.५.४). याच स्वरूपाचे चार देह ब्रह्मांडात आहेत, परंतु तेथे त्यांना नावे मात्र भिन्न दिलेली आहेत. ब्रह्मांडातील हे चार देह त्यांच्या विशिष्ट क्रमाने पुढीलप्रमाणे आहेत - (१) ब्रह्मांडातील स्थूळ देह म्हणजे विराट (२) ब्रह्मांडातील सूक्ष्म शरीर म्हणजे हिरण्य किंवा हिरण्यगर्भ (३) ब्रह्मांडातील कारण नावाचा देह म्हणजे अव्याकृत किंवा अव्याकृति, आणि (४) ब्रह्मांडातील महाकारण नामक देह म्हणजे मूळ प्रकृती किंवा मूळमाया (विराट हिरण्य अव्याकृत मूळप्रकृती हे खूण । ब्रह्मांडीची। दास.९.५.४ तसेच दास. १०.१०.१४)

अशाप्रकारे पिंडातील स्थूळ, सूक्ष्म, कारण, महाकारण हे चार आणि ब्रह्मांडातील विराट, हिरण्य, अव्याकृत आणि मूळप्रकृती (मूळमाया) हे चार, मिळून आठ देह होतात (स्थूळ सूक्ष्म कारण । महाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळप्रकृती जाण । ऐसें अष्ट देह ।। दास. ८.७.४०). आठ या संख्येचा उल्लेख न करता हेच आठ देह रामदासस्वामींनी पुढीलप्रमाणे सांगितले आहेत :- स्थूळ सूक्ष्म वोलांडिले । कारण महाकारण सांडिले । विराट हिरण्यगर्भ खंडिले । विवेकाने ।। आणि अव्याकृत मूळ प्रकृती । तेथे जाऊन बैसली वृत्ती ।। (दास.१३.१ २९-३०)

आता, यापुढे प्रथम ब्रह्मांडातील चार देहांचा विचार केला आहे.

**ब्रह्मांडातील चार देह :-** ब्रह्मांडातील चार देह हे मागे म्हटल्याप्रमाणे पिंडातील चार देहांच्या नमुन्यावर कल्पिलेले आहेत. एके ठिकाणी रामदासस्वामी ब्रह्मांडातील दोन देहांचा निर्देश करतात तो असा : - ब्रह्मांडी देह कल्पिले । विराट हिरण्यगर्भ बोलिले ।। (दास. १७.९.१०). तरी अन्य ठिकाणी ते ब्रह्मांडातील चार देह सांगतात. ब्रह्मांडातील चार देह असे :- विराट, हिरण्य/हिरण्यगर्भ, अव्याकृत अथवा अव्याकृती, आणि मूळप्रकृती / मूळमाया. यांतील विराट हा ब्रह्मांडातील स्थूळ देह आहे, हिरण्य हा ब्रह्मांडातील सूक्ष्म देह आहे, अव्याकृत हे ब्रह्मांडातील कारण नामक शरीर आहे, आणि मूळप्रकृती / मूळमाया ही ब्रह्मांडातील महाकरण नाव असणारी चौथी काया आहे (महामाया मूळप्रकृती । कारण ते अव्याकृती । सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती । विराट ते स्थूळ ।। दास. १०.१०.१४). हे चारही देह कल्पिलेले असल्याने, त्यांची अन्य काही माहिती रामदासस्वामी देत नाहीत.

**ब्रह्मांडातील कारण आणि महाकारण शरीरे -** ब्रह्मांडात अव्याकृत व मूळप्रकृती हे

तिसरा व चौथा देह आहेत. वरवर पाहिल्यास ते एकच वाटण्याचा संभव आहे. म्हणून त्यातील भेद नीटपणे पहाणे आवश्यक आहे.

मागे पाहिल्याप्रमाणे, निश्चल ब्रह्मातील चंचल अथवा जाणीव किंवा अहंपणाची स्फूर्ती म्हणजेच मूळमाया आहे. या मूळमायेलाच रामदास स्वामींनी मूळ प्रकृती म्हटले आहे. रामदासस्वामींनी दासबोधात अन्यत्र नुसते 'प्रकृती' किंवा अष्टधा प्रकृती असे शब्द वापरलेले आहेत. यातील अष्टधा प्रकृती म्हणजे मूळमाया आहे (विवेचनासाठी पुढे पहा). प्रकृती शब्दाने रामदासस्वामीना अन्य एक गोष्ट अपेक्षित आहे (विवेचनासाठी पुढे पहा). या प्रकृतीपेक्षा मूळप्रकृती वेगळी आहे, हे दाखविण्यासाठी त्यांनी मूळप्रकृती असा शब्द वापरला आहे. आणि ही जी मूळप्रकृती आहे, तीच मूळमाया आहे. आणि हीच मूळमाया/मूळप्रकृती ही ब्रह्मांडातील महाकारण शरीर आहे. (अहंपणे जाणीव जाली । तेचि मूळप्रकृति बोलिली । महाकारण काया रचिली । ब्रह्मांडींची ।। दास १०.१०.१३; ब्रह्मांडींचे महाकारण । ते मूळमाया जाण ।। दास.१२.६.२६). मूळमाया ही ब्रह्मांडातील महाकारण नावाची काया आहे, ही गोष्ट रामदासस्वामी दासबोधात अनेकदा सांगतात. उदा. बहुजिनसी मूळमाया । महाकारण ब्रह्मांडीची काया ।। (दास. २०.३.१२). मूळमाया ही ब्रह्मांडातील चौथा म्हणजे महाकारण देह आहे (मूळमाया चौथा देह ।। दास.१७.३.२०). एकूण पिंड-ब्रह्मांडातील आठ देहांच्या परिगणनेत, मूळमाया ही आठवा देह आहे. त्यामुळे 'आठवा देह मूळमाया' (दास.११.४.११), असेही रामदास स्वामी म्हणतात.

**अव्याकृत देह कोणता ?** - अव्याकृत / अव्याकृती हा ब्रह्मांडातील कारण देह आहे, असे रामदासस्वामी सांगतात. पण त्या संदर्भात अव्याकृत शब्दाने त्यांना काय अभिप्रेत आहे, याचा खुलासा ते करीत नाहीत. म्हणून अव्याकृत शब्दाने त्यांना काय अभिप्रेत आहे, हे दासबोधातील त्यांच्या अन्य विवेचनावरून जाणून घ्यावे लागते. असा शोध घेतल्यावर पुढीलप्रमाणे कळून येते.

रामदासस्वामींना केवलाद्वैत हे वेदान्त तत्त्वज्ञान मान्य आहे हे त्यांच्या दासबोध ग्रंथावरून समजून येते. केवलाद्वैत वेदान्तामध्ये स्थूळ व सूक्ष्म या देहांचे कारण[१२] या स्वरूपात कारणदेह मानलेला आहे. रामदासस्वामींनी सांगितलेल्या विश्वोत्पत्तीच्या[१३] प्रक्रियेत, गुणक्षोभिणी माया अथवा गुणमाया ही विश्वातील स्थूळ व सूक्ष्म पदार्थांचे कारण आहे. या गुणक्षोभिणी[१४] मायेचे स्वरूप रामदासस्वामी असे सांगतात - ब्रह्मीं मूळमाया जाली । तिच्यापोटी माया आली । मग ते गुणां

प्रसवली । म्हणौनि गुणक्षोभिणी ।। (दास.८.४.२) किंवा "मूळमाया लोक जननी । तयेपासून गुणक्षोभिणी" ।। (दास. १०.२.६). ही गुणक्षोभिणी माया म्हणजेच गुणमाया आहे. कारण तीही मूळमायेचे अपत्य आहे. "ब्रह्मापासून मूळमाया । मूळमायेपासून गुणमाया । गुणमायेपासून तया । गुणांस जन्म ।।" (दास.९.६.२६). आता, ही गुणक्षोभिणी माया किंवा गुणमाया ही अस्पष्ट / अव्याकृत / अव्यक्त आहे, हे उघड आहे. तिच्यापासून सूक्ष्म असणारी पाच भूते ही स्पष्ट म्हणजे व्यक्त दशेला येतात आणि ब्रह्मांडाची रचना होते (गुणांपासूनिया भूतें । पावलीं स्पष्ट दशेते ।। दास.९.६.२७)

अशी ही गुणमाया अथवा गुणक्षोभिणी माया ही अव्यक्त/अव्याकृत असल्याने आणि व्यक्त / स्पष्ट भूतांचे कारण असल्याने, अव्याकृत या शब्दाने गुणमाया/ गुणक्षोभिणी माया हीच ब्रह्मांडातील अव्याकृत देह म्हणजे कारण देह आहे, असे म्हणावे लागते.

यापुढे पिंडातील चार देहांचा विचार केला आहे.

**पिंडातील चार देह** - पिंडातील चार देहांचे उल्लेख रामदासस्वामींनी वरचेवर केलेले आहेत, ते असे - चौंदेहाचा अंत । (दास.८.८.४९); चौदेंहास अंत आला । (दास.८.७.५३); पिंडातील चार देहांपेक्षा जीव हा वेगळा आहे (असो चहूं देहांवेगळा । जन्मकर्मासी निराळा । सकळ आबाळ गोबळा । सबाह्य तू ।। दास.५.६.५६) नेमकेपणाने सांगायचे झाल्यास, स्थूळ, सूक्ष्म, कारण आणि महाकारण असे पिंडातील चार देह आहेत (स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । ऐसे हे चत्वार देह जाण ।। दास.१७.९.१) या चार देहांपैकी कारण आणि महाकारण या दोन देहांची माहिती रामदासस्वामी फक्त एका ओवीत देतात. ती ओवी अशी :- तिसरा देह कारण अज्ञान । चौथा देह महाकारण ज्ञान ।। (दास.१७.८.३०). याचा अर्थ असा की (केवलाद्वैत वेदांतातल्याप्रमाणे) अज्ञान हेच कारण देह आहे, आणि ज्ञान हे महाकारण देह आहे. या चार देहांच्या उपाधीअंती जीव चार अवस्था भोगत असतो. स्थूल देहाअंती जागृती ही अवस्था, स्वप्न अवस्थेत सूक्ष्म देह असतो, कारण देहाअंती सुषुप्ती म्हणजे गाढ निद्रा ही अवस्था असते, तर महाकारण देहासाठी तुर्या अवस्था मानली जाते. नेहमीच्या जीवनात पहिल्या तीन अवस्था असतात. परमार्थ करणारा तुर्या अवस्थेत जातो. या तुर्याअवस्थेचे बरेचसे विवरण रामदासस्वीमींनी दासबोधात केले आहे (पहा. ५.६.४,७-१०; ७.४.४९; ८.५.५; इत्यादी). पिंडातील सूक्ष्म आणि स्थूल देहांचे सविस्तर विवरण दासबोधात आहे. दास.१७.८.१-२२ या ओव्यांमध्ये सूक्ष्म देहाचा तपशील आहे, तर दास.

१७.८.२३-२९ या ओव्यांत स्थूल देहाचे विवरण येते. या विवरणाचा संक्षेप असा - अंत:करणपंचक[१५], प्राण-पंचक, ज्ञानेंद्रिय-पंचक, कर्मेंद्रिय-पंचक आणि विषय-पंचक ही पाच पंचके (= ५ × ५ = २५) गुण मिळून सूक्ष्म देह बनलेला आहे. तर प्रत्येकी पाच[१६] गुण असणाऱ्या आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी या पाच महाभूतांनी स्थूल देह सिद्ध झाला असल्याने, त्याच्या ठिकाणीही (५ × ५ =) पंचवीस गुण आहेतच.

येथपर्यंत ब्रह्मांडातील चार व पिंडातील चार अशा आठ देहांचा मागोवा घेऊन झाला. आता प्रकृती आणि पुरुष असे जे दोन आणखी देह रामदास स्वामी सांगतात, त्यांचा विचार करावयाचा आहे.

**प्रकृति व पुरुष हे दोन देह** - या दोन देहांच्या बाबतीत दोन प्रश्न उद्‌भूत होतात :- (१) रामदासस्वामींनी प्रकृती आणि पुरुष यांना देह असे का म्हटले आहे? (२) देह असणाऱ्या प्रकृती व पुरुष यांनी रामदासस्वामींना काय अभिप्रेत आहे? या दोन प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न आता करावयाचा आहे.

प्रकृती व पुरुष या दोघांनाही देह का म्हटले आहे, या प्रश्नाचे उत्तर सोपे आहे आणि ते पुढीलप्रमाणे देता येते :- देह ही चैतन्याची-ब्रह्माची-उपाधी आहे आणि ब्रह्म हे सर्व उपाधीपेक्षा निराळे आहे. तेव्हा अंतिम तत्त्व निर्गुण ब्रह्म हे प्रकृती आणि पुरुष यांपेक्षा भिन्न आहे, हे स्पष्ट करून सांगण्यास रामदासस्वामींनी त्यांना देह म्हटले आहे. (अधिक तपशील याच लेखात पुढे आला आहे).

परंतु प्रकृती व पुरुष या दोन शब्दांनी रामदासस्वामींना काय अभिप्रेत आहे, या प्रश्नाचा विचार यापुढे केला आहे.

**प्रकृती व पुरुष हे कोण नव्हेत ?** - जी प्रकृती नववा देह म्हटली आहे, ती प्रकृती म्हणजे दासबोधात अन्यत्र उल्लेखिलेली मूळप्रकृती अथवा अष्टधा प्रकृती नव्हे; कारण या दोन्हीही शब्दांनी रामदासस्वामींना मूळमाया अभिप्रेत आहे, हे पुढील निर्देशावरून स्पष्ट होते:-

(१) मूळप्रकृती म्हणजेच मूळमाया ही गोष्ट दास.१०.१०.७ आणि १०.१०.१३-१४ आणि ९.६.५ या ओव्यांवरून स्पष्ट होते. (२) अष्टधा प्रकृति ही पाच सूक्ष्म भूते आणि तीन गुण मिळून बनते (पंचभूतें आणि त्रिगुण । ऐसी अष्टधा प्रकृती जाण ।। दास.६.२.१४). पाच भूते आणि तीन गुण या आठ घटकांनी अष्टधा प्रकृती बनलेली असते (भूतें गुण मेळविजे । त्यासी अष्टधा

बोलिजे । पंचभूतिक जाणिजे । अष्टध प्रकृती ॥ दास.८.४.४२; पांच भूतें तीन गुण । आठ जालीं दोनी मिळौन । म्हणौनि अष्टधा प्रकृती जाण । बोलिजेत ॥ दास. ११.१.७). अशी ही अष्टधा प्रकृती[१७] म्हणजे मूळमाया आहे (ब्रह्मीं मूळमाया जाली । तेचि अष्टधा प्रकृती बोलिली । भूतीं त्रिगुणीं कालवली । मूळमाया ॥ दास.१०.४.९)

आता, मूळमाया हाच ब्रह्मांडातील चौथा देह असल्याने, तसेच मूळप्रकृती अथवा अष्टधा प्रकृती या शब्दांनी मूळमाया बोधित होत असल्याने, त्या दोन शब्दांनी प्रकृती हा नववा देह सूचित होत नाही, हे स्पष्ट होते.

याचप्रमाणे दहावा देह असणारा पुरुष म्हणजे दासबोधात अन्यत्र सांगितले गेलेले आदि पुरुष, अव्यक्त पुरुष, परम पुरुष किंवा मूळ पुरुष नव्हेत. याचे कारण असे : - आदिपुरुष (दास.१.३.६; ७.१.११), अव्यक्त पुरुष (दास.१.३.११), आणि परमपुरुष (दास.७.७.८) हे शब्द दासबोधात ब्रह्म या अर्थाने वापरलेले आहेत. आणि ब्रह्म हे कोणत्याही प्रकारचा देह होऊ शकत नाही. तसेच, मूळ पुरुष हा शब्द रामदासस्वामी मूळमाया या अर्थाने उपयोजितात (मूळमाया तोचि मूळपुरूष । दास.८.३.१०; मूळमाया मूळप्रकृती । मूळपुरूष ऐसे म्हणती ॥ (दास.१०.१०.७) आणि मूळमाया ही तर ब्रह्मांडातील चौथा देह आहे. त्यामुळे वर निर्दिष्ट केलेल्या चार पुरुषांतील कोणताच पुरुष हा दहावा देह असणारा पुरुष होऊ शकत नाही, हे स्पष्ट होते.

**प्रकृती पुरुष हे कोण ?**-मग नववा आणि दहावा देह असणारे हे प्रकृती आणि पुरुष कोण असा प्रश्न उरतो. या प्रश्नाचे उत्तर असे :- दासबोधात ज्या ठिकाणी रामदासस्वामी फक्त प्रकृति आणि पुरुष असे विशेषणरहित शब्द वापरतात, त्या ठिकाणी हे दोन शब्द ज्या अर्थांनी त्यांनी वापरले आहेत, त्याच अर्थांनी प्रकृती, पुरुष हे देह म्हणून त्यांना अभिप्रेत आहेत, हे समजून येते. म्हणून फक्त प्रकृती व पुरुष या शब्दांचा वापर असणाऱ्या दासबोधातील ओव्यांचा विचार करणे क्रमप्राप्त होते.

**प्रकृती पुरुष शब्दांचा वापर** -प्रकृती आणि पुरुष शब्दांचा वापर रामदासस्वामींनी दासबोधात पुढीलप्रमाणे केला आहे - मूळमाया वायुस्वरूप[१७] आहे. या वायूमध्ये म्हणजेच मूळमायेमध्ये दोन[१८] घटक आहेत : (१) वायू आणि (२) जाणीव. यापैकी वायू या घटकाला प्रकृती म्हणतात (वायोस म्हणती प्रकृती । दास.१०.९.८), आणि जाणीव या घटकाला[१८] जगज्जोती म्हणतात (जाणीव जगज्जोती । दास.१०.९.७). या जगज्जोतीलाच पुरुष[१९] म्हणतात (आणि पुरुष म्हणती जगज्जोती । दास.१०.९.८) वायूमधील विशेष जाणीवेला प्रकृतीमधील पुरुष म्हणतात (वायोमध्ये जाणीव विशेष ।

तोचि प्रकृतीमध्ये पुरुष ॥ दास. १०.९.९). वायूमधील जाणीव या घटकाला वा गुणाला ईश्वर असेही म्हणतात (वायोमध्ये जाणीव गुण । तेचि ईश्वराचे लक्षण ॥ दास.१०.९.११). तसेच वायूला शक्ती म्हणतात आणि जाणीवेला ईश्वर म्हणतात (वायो शक्ती जाणीव ईश्वर ॥ दास. १०.९.१०). आता ही शक्ती / प्रकृती आणि ईश्वर (पुरुष) या दोहोंना मिळून अर्धनारीनटेश्वर म्हटले जाते. या उत्तरोक्तालाच षड्गुणेश्वर म्हणतात. अशाप्रकारे, वायु म्हणजे प्रकृती/शक्ती आणि जाणीव म्हणजे पुरुष/जगज्जोती/ईश्वर हे लक्षात येते आणि ते लक्षात आले की प्रकृती पुरुषाची संकल्पना स्पष्ट होते (अर्धनारीनटेश्वर । तोचि षड्गुणेश्वर । प्रकृति पुरुषाचा विचार। शिवशक्ती ॥ दास.२०.५.८). अर्धनारीनटेश्वर म्हणजेच शिवशक्ती अथवा प्रकृती पुरुष होत (प्रकृती पुरुष शिवशक्ती । अर्धनारीनटेश्वर म्हणती ॥ दास.१५.७.३)

वरील सर्व विवरणाचा निष्कर्ष असा की प्रकृती आणि पुरुष हे दोघे मूळमायेचेच दोन घटक आहेत आणि तेच प्रकृती आणि पुरुष हे नववा आणि दहावा देह आहेत.

**शंकेचे समाधान** - येथे अशी शंका येऊ शकते. : - मूळमाया ही ब्रह्मांडातील चौथा देह आहे असे रामदास स्वामी सांगतात. अशा स्थितीत त्या मूळमायेचेच दोन घटक असणाऱ्या प्रकृती व पुरुष यांना ते स्वतंत्रपणे नववा आणि दहावा देह असे का म्हणतात ? या प्रश्नाचे कोणते उत्तर रामदासस्वामींनी दिले असते, हे आज सांगणे कठिण आहे. तथापि या प्रश्नाचे जे उत्तर मला सुचते ते आता पुढे दिले आहे आणि माझ्या मते तेच उत्तर रामदासस्वामींना अभिप्रेत होते.

रामदासस्वीमींच्या मते, ब्रह्म ही वस्तु देहातीत आहेत. (देहातीत वस्तु आहे । दास.८.८.२८). आता देह म्हणजे तरी काय आहे ? देह हे एक[२०] तत्त्वांचे गाठोडे आहे (तत्त्वांचे गाठोडे शरीर । दास.६.२.३३). तत्त्वांमध्ये तत्त्वें मिसळल्याने शरीरे बनतात (तत्त्वें तत्त्व मेळविलें । त्यासी देह हें नाम ठेविलें ॥ दास.६.३.२०; पाहातां देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार ॥ दास.६.२.३०) किंबहुना, लहानमोठी तत्त्वे मिळून आठही शरीरे बनलेली आहेत (नाना तत्त्वें लहान थोरें। मिळोन अष्टही शरीरें ॥ दास. १२.५.१२). ही सर्व तत्त्वे मूळ मायेपासून[२०] उद्भूत झालेली आहेत आणि ब्रह्म हे तर मूळमायेच्याही[२१] पलिकडे आहे. आता मूळमायेचे प्रकृती आणि पुरुष असे दोन घटक आहेत. त्यांच्याही पलीकडे ब्रह्म आहे हे स्पष्ट आहे. हे सांगण्यास रामदासस्वामींनी मुद्दाम त्यांनाही देह म्हटले आहे. देह ही एक उपाधी

आहे. निर्गुण ब्रह्म तर सर्व उपाधींपेक्षा वेगळे आहे (तैसा निर्मळात्मा परेश । तो उपाधीवेगळा ।। दास.८.७.५२, सकळ उपाधीवेगळा । तो परमात्मा निराळा ।। दास.६.५.२४). साहजिकच देह या उपाधीच्या पलीकडे गेल्यावरच मग परब्रह्माची प्राप्ती होणार आहे (देहातीत होता पाविजें । परब्रह्म तें ।। दास. ८.८.२५). देह म्हणजे अनेक तत्त्वांचा समूह. या तत्त्वांचा झाडा झाल्याविना जीवाला परब्रह्मरूप होता येत नाही. संपूर्ण ब्रह्मांड मायेपासून होते. ब्रह्मांडात चार देह आहेत. या चारही देहांपेक्षा ब्रह्म वेगळे आहे. मूळमायेच्या प्रकृती आणि पुरुष या दोन घटकांपेक्षाही परब्रह्म वेगळे आहे, हे हडसून खडसून सांगण्यास, प्रकृती व पुरुष म्हणजे नववा आणि दहावा देह, असे रामदासस्वामी सांगतात.

याच संदर्भात आणखी एक गोष्ट लक्षात घेणे अतिशय आवश्यक आहे. ती गोष्ट अशी :- मूळमायेतील जाणीव किंवा पुरुष हा जो घटक आहे, तो अनेक नावांनी ओळखला जातो, असे रामदासस्वामी सांगतात. या अनेक नावातील काही नावे अशी आहेत - शिव, जगज्जोती (दास. १०.९.८), ईश्वर, सर्वेश्वर (दास. १०.४.१६). यालाच परमात्मा, परमेश्वर, परेश, जगदीश, जगदेश्वर, जगदात्मा, आत्मा, अंतरात्मा, सर्वात्मा, विश्वात्मा, इत्यादि पुल्लिंगी नावे आहेत (दास.१०.१०.१५-१७), असेही रामदासस्वामी सांगतात. या नावावरून कुणाला तरी असे वाटण्याची शक्यता आहे की हा पुरुष म्हणजे परमपुरुष/ब्रह्म आहे काय? तेव्हा हा पुरुष किंवा त्याची समानार्थी नावे यांपेक्षा अंतिम सतत्त्व ब्रह्म हे संपूर्णपणे वेगळे आहे, हे स्पष्टपणे दाखविण्यास रामदासस्वामींनी या मायेच्या घटक असणाऱ्या पुरुषाला देह म्हटले आहे. आता, या मायेच्या पुरुष-घटकाला देह म्हटल्यावर, पुरुषाच्या अनुषंगाने येणाऱ्या प्रकृती या मायेच्या दुसऱ्या घटकालाही देह म्हणणे हे क्रमप्राप्तच होते. अशाप्रकारे रामदासस्वामींनी मूळमायेला घटकभूत असणाऱ्या पुरुष आणि प्रकृती या दोहोंनाही देह ही संज्ञा दिली आहे. आणि देह ही संज्ञा देण्यातला उद्देश असा :- देहापेक्षा ब्रह्म वेगळे आहे. साहजिकच पुरुष व प्रकृती या दोन्हींही देहांच्या उपाधीपेक्षा ब्रह्म वेगळे आहे, हे स्पष्ट व्हावे.

हाच भाग वेगळ्या शब्दात पुढीलप्रमाणे सांगता येईल - रामदासस्वामींच्या मते, मूलत: निर्गुण ब्रह्म हे एकच सत्तत्त्व आहे आणि 'अगा जे जालेचि नाही' अशी विश्वाची स्थिती आहे. पण आकलनासाठी माया मानून विश्वाची उत्पत्ती सांगितली जाते आणि एकदा का विश्वाची उत्पत्ती मानली की उपाधी सांगणे क्रमप्राप्त होते.

या उपाधी नानाप्रकारच्या असू शकतात. दहा प्रकारच्या देह-उपाधी असू शकतील असे रामदासस्वामींनी निश्चित केले. म्हणून त्यांनी दहा देह-उपाधींचा निर्देश केला. या दहाही देहांच्या उपाधीपेक्षा ब्रह्म पूर्णपणे वेगळे आहे, ही गोष्ट प्रामुख्याने रामदास स्वामींना दाखवून द्यावयाची आहे.

या दहा देहाच्या संदर्भात संक्षिप्तपणे पुढीलप्रमाणे सांगता येईल - पिंडातील चार देहांच्या नमुन्यावर ब्रह्मांडातही चार देह मानता येतात. तसेच मूळमायेच्या प्रकृती व पुरुष या घटकांनाही देह म्हणता येते. प्रकृती ही जड आहे तर पुरुष हा जाणीवरूप आहे. त्या दोहोंपेक्षा ब्रह्म वेगळे आहे, हे सांगण्यास त्यांनी प्रकृती व पुरुष या दोहोंनाही देह म्हटले. ब्रह्म हे शरीर या उपाधीपेक्षा वेगळे आहे. साहजिकच प्रकृती व पुरुष या देहांपेक्षा ब्रह्म अगदी निराळे आहे. अशाप्रकारे प्रकृति-पुरुषांनाही देह-उपाधी म्हणून त्यांनी-रामदासस्वामींनी-ब्रह्म हे सर्वांपेक्षा वेगळे आहे, हा आपला सिद्धांत मांडला आहे.

**तळटीपा**

१. या त्रिविध दु:खांच्या स्पष्टीकरणासाठी, दासबोधाच्या तिसऱ्या दशकातील समास ६-८ पहावेत.

२. सायुज्य मुक्ती म्हणजे जीवाने ब्रह्मरूप होऊन राहण्याची स्थिती.

३. दासबोधातील पंचीकरण या संकल्पनेच्या स्पष्टीकरणासाठी पहा :- या ग्रंथातील पंचीकरण हा लेख.

४. महावाक्य हा शब्द उपनिषदांतील काही विशिष्ट वाक्यांना उद्देशून वापरला जातो. उदा. - अहं ब्रह्मास्मि (मी ब्रह्म आहे). तत्त्वमसि (ते ब्रह्म तू आहेस), इत्यादि महावाक्ये आहेत. त्यांचा भावार्थ आहे. - विश्वात अंतिम सत्तत्त्व ब्रह्म आहे. त्या ब्रह्माशी एकरूप असा जीव आहे. रामदासस्वामींच्या मतानुसार महावाक्यांच्या आधारे, 'आपण ब्रह्म आहोत' असा साक्षात्कार जीवास झाला तर तो जन्ममरणातून सुटतो (महावाक्याचा अर्थ घेता । आपण वस्तूचि तत्त्वता।। दास.५.६.१३). येथे वस्तु म्हणजे ब्रह्म ही वस्तु असा अर्थ आहे.

५. पाहतां तत्त्वविवंचना । पिंड ब्रह्मांड तत्त्वरचना । विश्वाकारें व्यक्ती नाना । तत्त्वें विस्तारली ।। दास.४.९.१३

६. पांच भूतें ते ब्रह्मांडी । आणि पांचचि वर्तती पिंडी ।। दास.९.५.३७. पिंड म्हणजे प्राण्याचे - मानवी प्राण्याचे - सजीव शरीर.

७. पांचा भूतांचे ब्रह्मांड । आणि पंचभूतिक हे पिंड ।। दास.९.५.३८; सकळ सृष्टीची रचना । ते हे पंचभूतिक जाणा ।। दास.६.२.७

८. पिंडातील देहांचे सविस्तर स्पष्टीकरण या ग्रंथातील 'जीवात्म्याचे तनुचतुष्टय' या लेखात आहे.

९. पिंडी देहधर्ता जीव । दास.१३.१.२४

१०. ब्रह्मांडी देहधर्ता शिव । ईश्वरतनुचतुष्टय सर्व । ईश्वर धर्ता ॥ दास.१३.१.२४

११. हे आठ देह रामदासस्वामींनी कधी सामान्यपणे निर्देशिले आहेत. उदा. अष्ट देह थानमान । (दास. ११.९.२३), अष्टदेहांचें निरसन । करून पाहावें ॥ (दास.१२.५.१३). एकदा तर त्यांनी पहिला व आठवा असे म्हणून आठ देहांचा निर्देश केला आहे. पहिला स्थूळदेह काया । आठवा देह मूळमाया । अष्ट देह निरसलिया । विकार कैंचा ॥ (दास.११.४.११) आणि एके ठिकाणी मूळमाया हा आठवा देह आहे असे म्हणून ते आठ देहांचा उल्लेख करतात :- आठवा देह मूळमाया । निरसोन गेल्या अष्ट काया ॥ (दास.१३.२.१९)

१२. कारण आणि महाकारण या दोहोंच्या अन्य अधिक माहितीसाठी पहा :-के.वा. आपटे, परमार्थातील पाच देह, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक (१९९३),१९९४

१३. विश्वोत्पत्तीच्या प्रक्रियेसाठी पहा : - याच ग्रंथातील माया हा लेख.

१४. ऐक गुणक्षोभिणीचें स्वरूप । गुणविकार होतांचि अल्प । गुणक्षोभिणी बोलिजे॥ दास.९.६.८

१५. पंचक म्हणजे पाच गोष्टींचा समुदाय किंवा समूह. इथल्या पंचकांचे घटक असे: - अंत:करणपंचक = अंत:करण, मन, बुद्धि, चित्त व अहंकार. प्राणपंचक:- प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे पाच प्राण. ज्ञानेंद्रिय - पंचक :- श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा आणि नासिका ही ज्ञानेंद्रिये. कर्मेंद्रिय - पंचक :- वाचा, हात, पाय, शिश्न आणि गुद ही कर्मेंद्रिये. विषयपंचक :- शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पाच विषय.

१६. पाच महाभूतांचे प्रत्येकी पाच गुण/धर्म पुढीलप्रमाणे :- आकाश :-काम, क्रोध, शोक, मोह, भय. वायु :- चलन, वलन, प्रसारण, निरोध आणि आकुंचन. तेज :- क्षुधा, तृष्णा, आलस्य, निद्रा, मैथुन. जल :- शुक्र/रेत, रक्त, लाळ, मूत्र, घाम. पृथ्वी :- अस्थि, मांस, त्वचा, नाडी, केस (दास.१७.८.२४-२८)

१७. अष्टधा प्रकृती म्हणजेच मूळमाया ही गोष्ट पुढील ओव्यांवरूनही कळून येते:- निश्चळामध्ये चंचळ । तेचि कल्पना केवळ । अष्टधा प्रकृतीचे मूळ । कल्पनारूप ॥ (दास.११.१.५), कल्पना तेचि अष्टधा प्रकृती ॥ (दास.११.१.६). निश्चळातील चंचल किंवा कल्पना म्हणजे मूळमाया आहे. दासबोधातील माया या संकल्पनेच्या स्पष्टीकरणासाठी पहा : - या ग्रंथातील माया हा लेख.

१८. तपशीलासाठी पहा :- या ग्रंथातील जगज्जोती हा लेख.

१९. आणखी पहा : - वायो जाणीव जगज्जोती । तयास मूळमाया म्हणती । पुरुष आणि प्रकृति । याचेच नाव ।। (दास.१०.९.७), वायोस म्हणती प्रकृती । आणि पुरुष म्हणती जगज्जोती । पुरुषप्रकृति शिवशक्ति । याचेच नाव ।। (दास.१०.९.८)

२०. तत्त्वे आणि तत्त्वझाडा या दासबोधातील संकल्पनेसाठी पहा : या ग्रंथातील तत्त्वझाडा हा लेख.

२१. तैसी माया हे चंचळ । वस्तु शाश्वत निश्चळ ।। दास. ८.३.४८. माया व ब्रह्म यातील फरकासाठी पहा : दासबोध ६.५. रामदास पुढे स्पष्ट सांगतात : - मूळमायेपरतें देखिलें । परब्रह्म ।। दास. ८.१०.७०; मूळमायेपरतें एक । निर्गुण ब्रह्म ।। दास. ९.६.३२



# ७. तत्त्वझाडा

महाराष्ट्रातील संतांमध्ये श्रीसमर्थ रामदास स्वामींचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्याबद्दल प्रा. के. वि. बेलसरे सांगतात : "श्री समर्थांइतका विवेकाचा पुरस्कार भारतातील काय पण भारताबाहेरील तत्त्वचिंतकांत क्वचित्‌च दृष्टीस[१] पडतो." सामान्य जनांच्या करिता रामदास स्वामींनी केवळ परमार्थाचे मार्गदर्शन केले असे नाही तर लोकांनी व्यावहारिक जीवनात कसे वागावे याचाही बोध केला आहे. या दोन्हीही गोष्टी त्यांच्या दासबोध या ग्रंथात आढळून येतात. या ग्रंथात अंतिम तत्त्व ब्रह्म/आत्मा, माया, विश्वोत्पत्ति यांचे निरूपण आहे. खेरीज सद्‌गुरूंचे लक्षण, शिष्यांचे लक्षण, नवविधा भक्ति, मानवी देहाचे महत्त्व, प्रयत्नाचे महत्त्व इत्यादि विषयांचा सविस्तर ऊहापोह त्यांनी केला आहे.

या दासबोधाबद्दल श्री. अण्णाबुवा कालगावकर[२] लिहितात :- 'प्राणिमात्रांच्या सर्व आशा-आकांक्षा पूर्ण करण्याचे सामर्थ्य कोण्या एका ग्रंथात आहे असे जर विचारले तर त्याचे उत्तर 'श्रीमत् दासबोध' असे देण्यास काही हरकत नसावी असे आम्हास वाटते. अध्यात्माचा तर तो मेरूमणि असून ते अध्यात्म प्रत्यक्ष जीवनात कोणत्या साधनाने आणता येईल ती सर्व आचारसंहिता आपणास दासबोधात सापडेल.' संक्षेपाने सांगायचे झाल्यास दासबोध हा एक अपूर्व ग्रंथ आहे. त्यात आलेल्या 'तत्त्वझाडा' या संकल्पनेचा विचार प्रस्तुत लेखात केलेला आहे.

**प्रपंच व परमार्थ :** श्रीरामदासस्वामीना माहीत आहे की जन्माला आलेल्या क्षणापासून माणसाला या संसारात वावरावे लागते आणि निसर्गत:च माणूस प्रपंचाच्या मागे लागलेला असतो. ही गोष्ट लक्षात घेऊन रामदास स्वामी प्रपंचाला योग्य ती किंमत देतात आणि मग सांगतात की प्रपंच करीत असतानाच माणसाने परमार्थही करावयास हवा. मानवाने नुसता प्रपंचही करू नये आणि नुसता परमार्थही करू नये. त्यांचे म्हणणे आहे :- "आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका ।।" (दा.१२.१.१). याचे कारण असे आहे की "प्रपंची जो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंची जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ।।" (दा. १२.१.१). काही जण म्हणतात की प्रपंच सोडून परमार्थ करावयास हवा. यावर श्रीरामदासस्वामींचे उत्तर आहे की हे म्हणणे बरोबर नाही. कारण "प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणे तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ।" (दा. १२.१.२) आणि म्हणूनच प्रपंचात

राहूनच परमार्थ साधावयास हवा, असे रामदास स्वामींचे मत आहे. म्हणून ते सांगतात 'म्हणोनि सावधानपणे । प्रपंच परमार्थ चालवणे । (दा. १२.१.१०), हेच माणसाला या जगात इष्ट आहे.

**परमार्थाची आवश्यकता :** यावर कुणी विचारेल, "मानवी जीवनात परमार्थाची आवश्यकता काय ? परमार्थाने काय साधणार आहे ?" या प्रश्नांवर रामदास स्वामींची उत्तरे अशी आहेत - प्रपंचात दु:खांच्या आधिक्यामुळे माणसाला समाधान, विसावा मिळत नाही. परमार्थ हा माणसांना विसावा देणारा आहे (दा. १.९.२०). परमार्थाने जन्माचे सार्थक होते. परमार्थ हा संसारात तारक आहे (दा. १.९.२१). 'परमार्थ मानवाला जन्म-मरणाच्या[३] फेऱ्यातून सोडवणारा आहे; परमार्थाने सायुज्यता मुक्ति प्राप्त होते म्हणून परमार्थ करणे[४] आवश्यक आहे.

यावर प्रश्न असा : परमार्थ करावयाचा म्हणजे काय करावयाचे ? याचे उत्तर असे :- ज्या योगाने जीव आणि ब्रह्म यांची ऐक्यरूपी सायुज्यता मुक्ति मिळेल ते करणे म्हणजे परमार्थ करणे होय. सायुज्यता मुक्ति ही ज्ञानाने प्राप्त होते म्हणून ते ज्ञान प्राप्त करून घेणे म्हणजे परमार्थ होय. आता ज्या ज्ञानाने सायुज्यता हा मोक्ष प्राप्त होतो, ते ज्ञान हे लौकिक किंवा व्यावहारिक गोष्टींचे ज्ञान नव्हे. त्यापेक्षा वेगळे असे ज्ञान सायुज्यतेसाठी आवश्यक आहे (सायुज्यप्राप्ति होये जेणे । ते ज्ञान वेगळे असे । (दा. ५.५.३७). हे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान होय. आपण म्हणजे जीव हा निर्गुण आत्मा किंवा ब्रह्म आहे, हे ज्ञान व्हावयास हवे (ऐक ज्ञानाचे लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । पाहावे आपणांसी आपण । या नाव ज्ञान ।। (दा. ५.६.१). हीच कल्पना 'मुख्य देव' हे शब्द वापरूनही रामदासस्वामी व्यक्त करतात. ते म्हणतात : 'नित्यानित्यविवेक'[५] करून थोर किंवा मुख्य देव कसा आहे, आपले सत्य स्वरूप काय आहे, हे जाणून घेणे म्हणजे ज्ञान (मुख्य देवास जाणावे । सत्य स्वरूप ओळखावे । नित्यानित्य विचारावे । या नाव ज्ञान ।। (दा. ५.६.२) म्हणजे आपणच मुख्य देव आहोत, आपणच आत्मा आहोत, आत्म्याचे स्वरूप तेच आपले स्वरूप आहे. हे आपण जाणून[६] घ्यावयास हवे. शुद्ध आत्मस्वरूप हेच आपले (= जीवाचे) स्वरूप आहे, हे ज्ञान म्हणजेच आपल्या स्वरूपाचे शुद्ध ज्ञान होय. (शुद्ध स्वरूपचि आपण । या नाव शुद्धस्वरूप ज्ञान । (दा. ५.६.१.) अशाप्रकारे आपल्या स्वरूपाचे ज्ञान किंवा आत्मज्ञान परमार्थाचे उद्दिष्ट आहे.

**देहबुद्धी अडसर आहे :** तथापि व्यावहारिक जीवनात, आपण म्हणजे आत्मा

आहोत, हे माणसाला कळत असत नाही. याचे कारण आहे की माणूस आपल्या देहालाच मी म्हणजे आत्मा असे समजत असतो. म्हणजेच माणूस[७] देहबुद्धी बाळगून असतो. (तेचि काया मी आपण । हे देहबुद्धीचे लक्षण ।। (दा. ६.८.४१). देह म्हणजे मी किंवा आत्मा हा जो अहंकार किंवा मीपण आहे तेच ब्रह्मज्ञानाच्या आड येत असते आणि त्यामुळेच ब्रह्मप्राप्ति होत नाही (ब्रह्म न पाविजे मीपणे । (दा. ६.८.४५). याच मीपणामुळे ब्रह्म/आत्मा ही वस्तु कळून येत नाही. (मीपणे वस्तु नाकळे ।। दा. ७.७.४६). या अहंकाराच्या गुणामुळे देव/आत्मा आपल्या ज्ञानाच्या टप्यापलीकडे रहातो (देव राहिला परता । अहंतागुणे ।। दास. ८.१.१४)

याउलट संतांचे सांगणे असे आहे की माणसाचे हित देहाच्या पलीकडे आहे; देहबुद्धीने अनहित होत असते (हित आहे देहातीत । म्हणोनि निरोपित संत । देह बुद्धीने अनहित। होचि लागे ।। (दास. ७.२.३६). संक्षेपाने सांगायचे झाल्यास आपली जी ब्रह्माशी ऐक्यता आहे ती देहबुद्धीने बिघडते म्हणून देहबुद्धी लयाला गेली तरच परमार्थ घडतो. (म्हणोनि देहबुद्धी हे झडे । तरीच परमार्थ घडे । देह बुद्धीने बिघडे । ऐक्यता ब्रह्माची । (दा. ७.२.३९). ज्यांची ही देहबुद्धी संपेल त्या सर्वांनाच[८] एकमेवाद्वितीय ब्रह्माची प्राप्ति होईल. देहाभिमान संपला की सहजपणे ब्रह्मवस्तूची प्राप्ती होते (देहाभिमानाचे अंती । सहजचि वस्तु प्राप्ती ।। दास. ८.६.४८). तसे पाहिल्यास मीपण खरे नाही; हे मीपण आपण कल्पिलेले आहे. म्हणून या मीपणाचा शोध घेतला तर ते शिल्लकच रहात नाही. आणि एकदा का हे मीपण गेले की आपण स्वत: निर्गुण ब्रह्म, आत्मा आहोत हे कळून येते. (आपण कल्पिले मीपण । मीपण शोधिता नुरे जाण । मीपण गेलिया निर्गुण । आत्मा स्वयें।। दास. ६.३.२९). त्यामुळे जो कोणी मीपणातून सुटतो, तो मुक्त होऊन जातो. (मीपणापासून सुटला । तोचि येक मुक्त झाला ।। दास. ७.६.५४)

**देह म्हणजे तत्त्वांचे गाठोडे :** ज्या देहावर आपण मीपणा बाळगतो आणि ज्यावरील अभिमानामुळे आत्मज्ञान होत नाही, तो देह म्हणजे तरी काय आहे ? तर देह म्हणजे दुसरे तिसरे काही नसून अनेक तत्त्वांचे गाठोडे आहे (तत्त्वांचे गाठोडे शरीर । दास. ६.२.३३). निरनिराळ्या तत्त्वांचे[९] मीलन/एकत्रीकरण होऊन जे काही बनते त्याला देह हे नाव दिले जाते. (तत्त्वें तत्त्व मेळविले । त्यासी देह हे नाम ठेविले ।। दास. ६.३.२०). देह म्हणजे काय याचा जर विचार केला तर असे आढळते की देह म्हणजे केवळ तत्त्वांचा विस्तार आहे (पाहाता देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार ।। दास. ६.२.३०)

**कोणती तत्त्वे ?-** ज्या तत्त्वांनी देह बनला आहे त्या तत्त्वांचा झाडा/निरसन जर विवेकाने झाले, तर देहावरचा अहंकार नष्ट होऊन आपण निर्गुण ब्रह्मात एकरूप होऊन जाऊ (तत्त्वझाडा नि:शेष होता । तेथे निमाली देह अहंता । निर्गुण ब्रह्मी ऐक्यता । विवेके जाली ।। दास. ६.३.२१). तेव्हा तत्त्वांचा शोध घेऊन जर आपण त्यांचा निरास करू शकलो तर आपण निश्चितपणे आत्मवस्तु प्राप्त करुन घेऊ शकतो (तत्त्वें शोधितां पावला ।तत्त्वता वस्तु ।। दास. ८.७.५७)

आत्मप्राप्तीसाठी ज्या तत्त्वांचा निरास करणे गरजेचे आहे, ज्या तत्त्वांचा झाडा करणे अपेक्षित आहे, ती तत्त्वे कोणती आहेत असा प्रश्न साहजिकच उद्‌भवतो. म्हणजे तत्त्व शब्दाने रामदासस्वामींना काय अभिप्रेत आहे, असा प्रश्न आहे. या प्रश्नाचे उत्तर असे आहे :- आत्मा किंवा ब्रह्म यांचा निर्देश करण्यास रामदास स्वामी प्राय: "वस्तु" हा शब्द वापरतात. वस्तु या शब्दाचा अर्थही ध्यानात घेण्यासारखा आहे. भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ या तीनही काळांत कधीही नाश न पावता सतत रहाणारा आत्मा हा अर्थ[१०] वस्तू शब्दाचा आहे. याचा अर्थ असा की आत्मा सच्चिदानंद आहे; यामधील सच्चिदानंद शब्दात सत् शब्दाचा जो अर्थ आहे तोच रामदास स्वामींच्या वस्तू शब्दाचा अर्थ आहे. सत् शब्दाचा अर्थ असा आहे :- तीनही काळात ज्याचा नाश होत नाही, तीनही काळांत जे अबाधितपणे असते ते सत्, तीनही काळांत बाध न होता जे एकरूपाने रहाते[११] ते सत्. अशाप्रकारे वस्तू या शब्दाने रामदासस्वामींना निर्गुण आत्मा/ब्रह्म हा अर्थ अभिप्रेत आहे, हे त्यांच्या दासबोधावरून स्पष्टपणे कळून येते. याउलट तत्त्व शब्दाने त्यांना आत्मा/ब्रह्म याखेरीजचे सर्व स्थूल आणि सूक्ष्म पदार्थ अभिप्रेत आहेत, ही गोष्ट त्यांच्या पुढील विधानावरून स्पष्टपणे कळून येते. - स्थूल सूक्ष्म कारण । महाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळप्रकृति जाण । ऐसे अष्ट देह । च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडी। ऐसी अष्टदेहांची प्रौढी। प्रकृति पुरुषाची वाढी । दश देह बोलिजे ।। ऐसे तत्त्वांचे लक्षण ।। दास ८.७.४०-४२) आणि या सर्व तत्त्वांपेक्षा वेगळा असा साक्षी आत्मा आहे (आत्मा साक्षी विलक्षण ।। दास. ८.७.४२). या नाना प्रकारच्या तत्त्वांच्या उपाधीपेक्षा अगदी निराळा असा आत्मा आहे (नाना तत्त्वांचे उपाधी । वेगळा आत्मा ।। दास. ८.७.३९)

वर उल्लेखिलेल्या तत्त्वांची अधिक माहिती करून घेण्यास, समर्थ रामदासस्वामींनी दासबोधात सांगितलेल्या पंचीकरणाची[१२] थोडीशी माहिती घेणे आवश्यक आहे.

**दासबोधातील पंचीकरण :**

दासबोधातील पंचीकरण हे विश्वोत्पत्तीच्या प्रक्रियेशी निगडित आहे. ही प्रक्रिया रामदासस्वामी अशी सांगतात ;-

मुळात निश्चल ब्रह्म ही एकमेव वस्तू आहे. निश्चळ ब्रह्मात चंचल निर्माण होते. या चंचळाला[१३] मूळमाया म्हणतात (दास. १०.१०.५-७). ही मूळमाया वायुस्वरूप आहे (दास. १०.४.१०; ९.६.८). या वायुरूप मूळमायेत प्रथमपासूनच सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण, आकाश, वायू, तेज, जल व पृथ्वी ही पाच सूक्ष्म भूते असतात (दास. ९.६.३३). मूळमायेत तीन गुण व पंच भूते यांचे मिश्रण असते (दास. ९.६.१४-१५; १०.२.१२-१३). मायेतील ही सूक्ष्म भूते विश्वोत्पत्तीच्या वेळी व्यक्त दशेला येतात (दास. १२.६.१०) म्हणजे ती सृष्टि रचनेत व्यक्त होतात (दास. ८.३.५७). म्हणजेच ती वेगळेपणे स्पष्ट होऊन दृश्यरूपास येतात (दास. ९.६.२७). व्यक्त दशेला आलेली पंच भूते जड होऊन (दास. ८.३.५६) सर्व तत्त्वे (पदार्थ) बनतात आणि पिंड ब्रह्मांडातील सर्व रचना होते (दास. ८.४.४४-४५)

मूळ मायेपासून उत्पन्न झालेल्या सृष्टिरचनेत पिंड आणि ब्रह्मांड यांची कल्पना केली जाते. "ब्रह्मांडी तेचि पिंडी असे" (दास. ९.४.४४) किंवा "पिंडासारखी ब्रह्मांडरचना" (दास. ९.५.१) असते. आता या पिंडात जसे चार देह मानले जातात तसेच ते ब्रह्मांडातही मानले जातात. पिंडातील चार देह हे जीवाच्या संदर्भात असतात. तर ब्रह्मांडातील चार देह हे ईश्वराच्या संदर्भात असतात. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे चार देह पिंडातील आहेत. (दास. ९.५.४) तर विराट, हिरण्य, अव्यक्त आणि मूळप्रकृति (मूळमाया) हे चार देह ब्रह्मांडातील आहेत (दास. ९.५.४; १०.१०.१३, १०.१०.७). येथे विराट हा ब्रह्मांडातील स्थूल देह, हिरण्य हा सूक्ष्म देह, अव्याकृत हा कारण देह आणि मूळमाया हा महाकारण देह होय. असे हे ब्रह्मांडातील ईश्वर-तनु-चतुष्टय (दास. १०.१०.१५) आणि पिंडातील जीव-तनु-चतुष्टय (दास. १७.८.३३) म्हणजे पंचीकरण आहे. संक्षेपाने सांगायचे झाल्यास, चत्वार-देहात्मक पिंड ब्रह्मांड रचना म्हणजे पंचीकरण आहे. पिंड ब्रह्मांडात्मक रचना हा पाच भूतांचा विस्तार आहे. तो सर्व नाशवंत आहे. परंतु आत्मा/ब्रह्म मात्र निराकार, शाश्वत सत्य आहे, हे जाणून घ्यावयास हवे (ऐसा पांचा भूतांचा विस्तार/नाशिवंत हा निर्धार/शाश्वत आत्मा निराकार । सत्य जाणावा ।। दास. १३.६.११). आपण आपणास पहावयास हवे म्हणजे खरे ज्ञान होते.

या सर्व पंचीकरणाच्या पसाऱ्यात साक्षिरूप[१४] आत्मा आहे आणि तो नित्य सत् आहे.

वरील सर्व भाग संक्षेपाने सांगायचा झाल्यास, असा सांगता येईल. सर्व तत्त्वे सूक्ष्मरूपाने[१५] मूळमायेत असतात. पुढे ती जडत्वाप्रत येऊन सृष्टि रचनेत व्यक्त रूपाला[१६] येतात. अशाप्रकारे चत्वार-देहात्मक पिंड-ब्रह्मांडातील सर्व पदार्थ म्हणजेच तत्त्वे आहेत (पुढे तत्त्व विवंचना । पिंड ब्रह्मांड तत्त्वरचना ।। दास. ८.४.४५)

**चार देहांची तत्त्वे** - पिंड व ब्रह्मांड हे चत्वार देहात्मक आहेत. स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण[१७] असे चार देह आहेत. या चार देहांची तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत :- स्थूलदेहाची पंचवीस तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेत :- आकाशाचे गुणपंचक, वायूचे गुणपंचक,[१८] तेजाचे गुणपंचक, जलाचे गुणपंचक आणि[१९] पृथ्वीचे गुण - पंचक. सूक्ष्म देहाची पंचवीस तत्त्वे अशी आहेत :- अंत:करण-पंचक, प्राणपंचक, ज्ञानेंद्रिय - पंचक, कर्मेंद्रियपंचक[२०] आणि विषयपंचक. आणखी एका वेगळ्या दृष्टिकोनातून पाहिल्यास याच चार देहांची बत्तीस[२१] तत्त्वे होतात. आता ही बत्तीस तत्त्वे अधिक स्थूल देहांची पंचवीस तत्त्वे, तसेच सूक्ष्म देहाची पंचवीस तत्त्वे मिळून एकूण ८२ तत्त्वे होतात. (ऐशी ही बत्तीस तत्त्वे । दोहीची पन्नास तत्त्वे । अवघी मिळोन ब्यांसि तत्त्वे । अज्ञान आणि ज्ञान ।। दास. १७.२.७)

अशी ही चार देहांची तत्त्वे आहेत. ती सर्व मायिक म्हणजे मायाजन्य आहेत. या तत्त्वांपेक्षा आपण वेगळे आहोत. आपण निर्गुण आत्मा आहोत. त्या तत्त्वांपेक्षा वेगळा असणारा आत्मा म्हणजे आपण आहोत. आपण साक्षी आत्मा आहोत हे जाणून विवेकज्ञानाच्या आधाराने या तत्त्वांचा निरास करावयाचा आहे. (ऐसी ही तत्त्वे जाणावी। जाणोन मायिक ओळखावी । आपण साक्षी निरसावी । येणे रीती ।। दास. १७.९.८)

**तत्त्वझाडा केल्याने स्व-स्वरूप प्राप्ति :** जर विश्वातली सर्वच तत्त्वे मायिक आहेत, तर मग आपण आहोत तरी कोण ? रामदास स्वामींचे उत्तर आहे - "आपण म्हणिजे मीपण । मीपण म्हणजे जीवपण ।।" (दास. ७.२.२७). आपण म्हणजे जीव आणि हा जीव मायिक नाही. जीव हा मुळात ब्रह्मरूप आहे. साहजिकच हा जीव वर उल्लेखिलेल्या सर्व तत्त्वांपेक्षा वेगळा आहे. असे असले तरी तो या तत्त्वांत गुंतून जातो. या तत्त्वांत गुंतलेल्या, या तत्त्वांनी वेष्टिलेला हा जीव संशयात बुडून जातो, आणि मग आपण खरे कोण आहोत हे त्याला कळेनासे होते आणि मग "मी कोण" असा[२२] प्रश्न त्याला पडतो. (तत्त्वी वेटाळून घेतला । प्राणी संशये गुंडाळला । आपणांसी आपण भुलला । कोऽहं म्हणे ।। दास. ६.३.३४). तेव्हा

स्वत:चे खरे रूप कळावे असे वाटत असेल तर माणसाने या तत्त्वांचे विवरण आणि निरसन करावयास हवे. निर्गुण ब्रह्म शोधावयास हवे. (करावे तत्त्व विवरण । शोधावे ब्रह्म निर्गुण । पाहावे आपणांसी आपण । म्हणिजे कळे ॥ दास. ९.२.३३). आपण आपणांस न जाणणे हे अज्ञान आहे. हे अज्ञान गेले की परब्रह्म प्राप्त होते. (मी कोण ऐसे नेणिजे । तया नाव अज्ञान बोलिजे । अज्ञान गेलिया पाविजे । परब्रह्म तें ॥ दास. ७.२.२२)

देहबुद्धीमुळे म्हणजे देहाला आत्मा मानल्यामुळे माणूस बंधनात पडलेला आहे. त्याने जर आत्मानात्म विवेक[२३] केला तर तो बंधनातून मोकळा होतो. जर तो देहबुद्धीहून सुटून देहातीत झाला तर त्याला मोक्ष-पद प्राप्त होते (देहबुद्धीने बांधला । तो विवेके मोकळा केला । देहातीत होता पावला । मोक्षपद ॥ दास. ६.२.३६). चार देहांच्या निरसनाने प्राप्त होणारे विज्ञान म्हणजेच परब्रह्म आहे (तिसरा देह कारण अज्ञान । चौथा देह महाकारण ज्ञान । हे च्यारी देह निरसिता विज्ञान । परब्रह्म तें ॥ दास. १७.८.३०). आठ देहांचे निरसन[२४] करून परब्रह्म पहावयाचे आहे (वारें नसतां जे गगन । तैसे परब्रह्म सघन । अष्ट देहांचे निरसन । करून पाहावे ॥ दास. १२.५.१३.)

देह किंवा शरीर म्हणजे 'तत्त्वांत तत्त्वांचे मीलन' आहे हे जाणता पुरुष ओळखून घेतो. (तत्त्वे तत्त्व मेळविले । त्यासी देह हे नाम ठेविले । ते जाणते पुरुषी शोधिले । तत्त्वें तत्त्व ॥ दास. ६.३.२७). देह म्हणजे भिन्न भिन्न तत्त्वांचे मिश्रण असल्याने, त्या नाना तत्त्वांचा निवाडा करून पिंड-ब्रह्मांडातील तत्त्वांचा झाडा (निरसन) करावयास हवा (पिंडब्रह्मांड तत्त्वझाडा । नाना तत्त्वांचा निवाडा । विचार पाहाणे उघडा ॥ दास. २०.६.२३). देह म्हणजे तत्त्वांचा विस्तार आहे. तत्त्वाने तत्त्वाचा झाडा झाला की सारभूत असणारा आत्माच शिल्लक रहातो. (पाहातां देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार । तत्त्वे तत्त्व झाडितां सार । आत्माच उरे ॥ दास. ६.२.३०). शरीर म्हणजे तत्त्वांचे गाठोडे आहे हा विचार केला की आपण म्हणजे शरीर नव्हे हे कळून येते आणि एकच निरंतर आत्मा आहे हेही लक्षात येते (तत्त्वांचे गाठोडें शरीर । याचा पाहातां विचार । येक आत्मा निरंतर । आपण नाही ॥ दास. ६.२.३३). विवेकाने देहाचा विचार केला की तत्त्वांचे[२५] निरसन होऊ लागते. मग आपण म्हणजे देह नव्हे हे[२६] प्रत्ययाला येते (विवेकें देहाकडे पाहिले । तो तत्त्वें तत्त्व वोसरले । आपण काही नाही आलें । प्रत्ययासी ॥ दास. ६.३.२२). तत्त्वांचे निरसन झाले की आपणास आपली म्हणजे आत्म्याची प्राप्ती होते (तत्त्वनिरसने आपणास । आपण लाभे ॥ दास. ६.३.१९). तत्त्वांचे निरसन झाले की मी-तू-पणाचा भ्रम उडून जातो (तत्त्वांसरिसा गेला भ्रम ।

मीतूंपणाचा ।। दास. ६.३.२४). अशाप्रकारे विवेकाने संपूर्णपणे तत्त्वझाडा झाला की देहावरील अहंतेचा नाश होतो आणि निर्गुण ब्रह्माशी ऐक्यता प्राप्त होते (तत्त्वझाडा नि:शेष होता । तेथे निमाली देह अहंता । निर्गुण ब्रह्मी ऐक्यता । विवेके जाली ।। दास. ६.३.२१). तत्त्वांचे निरसन झाल्यावर, मी-पण उरत नाही; आपण म्हणजे निर्गुण आत्मा आहोत हे कळून येते (जालियां तत्त्वांचे निरसन । निर्गुण आत्मा तोचि आपण । कां दाखवावे मीपण । तत्त्वनिरसना उपरी ।। दास. ६.३.३०). तत्त्वांच्या निरासाने मीपणाचा निरास होतो; आणि मीपणाच्या निरासाने निर्गुण ब्रह्म उरते; आणि हे ब्रह्म आपणच आहोत असा प्रत्यय येतो (तत्त्वांमध्ये मीपण गेले । तरी निर्गुण सहजचि उरले । सोहंभावे प्रत्यया आलें । आत्मनिवेदन ।। दास. ६.३.३१)

**म्हणजे होते ते असे :** प्रारंभी तत्त्वांत गुंतलेला जीव 'मी कोण' या संशयात होता. पुढे त्याने विवेकाने तत्त्वांचा झाडा केला. तत्त्वांचा निरास झाल्यावर त्याला कळून आले की "सोऽहं" म्हणजे आपण आत्मा आहोत. तत्त्वांपेक्षा वेगळा असणारा आत्माच आपण आहोत. त्यानंतर तो आत्म्याशी एकरूप होऊन गेला. अशी आत्म्याशी एकरूपता प्राप्त झाल्यावर जीवाच्या बाबतीत अहं, कोऽहं आणि सोऽहं या सर्वच भानांचा लय होऊन जातो (तत्त्वीं गुंतला म्हणे कोऽहं । विवेक पाहातां म्हणे सोऽहं । अनन्य होतां अहं सोहं । मावळली ।। दास ६.३.३५).

संक्षेपाने सांगायचे झाल्यास :- माणूस प्रथम देहालाच आत्मा मानीत होता. देह हे तत्त्वांचे गाठोडे आहे. देहाला मी (आत्मा) मानल्याने तो त्या तत्त्वांत गुंतून गेला होता. पुढे त्याने तत्त्वझाडा केला. त्या तत्त्वांचे निरसन होताच त्याचा देहावरील अहंकार उडाला. तत्त्वांचा निरास झाल्यावर उरले ते केवळ निर्गुण ब्रह्म (तत्त्वान्ती उरले तत्त्वतां । निर्गुण ब्रह्म ।। दास. ६.३.२३), आणि हे निर्गुण ब्रह्म/आत्मा आपणच आहोत हा प्रत्यय त्याला येतो. आणि जेव्हा तो या निर्गुण ब्रह्माशी एकरूप होऊन जातो तेव्हा अहं, कोहं आणि सोहं हे भानही नष्ट होते. तो जीव ब्रह्मरूप होऊन जातो. अशाप्रकारे तत्त्वझाडा ही ब्रह्मरूप होण्यासाठी आवश्यक प्रक्रिया आहे.

**तळटीपा :**

१. के. वि. बेलसरे, दासबोध, सज्जनगड, शके १८९७, व्यक्ति आणि तत्त्वज्ञान, पृ. ६.

२. तत्रैव, निवेदन, पृ. १

३. अपूर्वता या परमार्थाची । वार्ता नाही जन्ममृत्याची । पदवी ही सायोज्यतेची । संनिधची लाभे ॥ दास. १.९.१३

४. रामदास स्वामींच्या मते परमार्थ करण्यास पंचीकरण आणि महावाक्यविवरण या दोन गोष्टी आवश्यक आहेत. ते म्हणतात :- प्रपंची पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण । महावाक्यांचे विवरण । करिता सुटे ॥ (दास. ११.२.३९); सकळ परमार्थास मूळ । पंचीकरण महावाक्य केवळ । तेचि करावे प्रांजळ । पुन्हा पुन्हा ॥ (दास ११.४.१०) या पंचीकरणाशी निगडीत 'तत्त्वझाडा' ही संकल्पना आहे.

५. देह अनित्य आत्मा नित्य । हाचि विवेक नित्यानित्य । (दास. १३.१.२३)

६. तस्मात् विचार करावा । देव कोण तो ओळखावा । आपला आपण शोध घ्यावा । अंतर्यामी ॥ (दास. ४.९.७)

७. देहाचे जे थोरपण । तेंचि देहबुद्धीचे लक्षण ॥ (दास. ७.२.३४)

८. देहबुद्धीच्या अंती । सकळांसि येकची प्राप्ती । येक ब्रह्म द्वितीयं नास्ति । हे श्रुतिवचन ॥ (दास. ७.२.३०)

९. नाना तत्त्वे लहान थोरे । मिळोन अष्टही शरीरे । दास. १२.५.१२. या आठ शरीरांची माहिती पुढे येते.

१०. काल-त्रयानपाय्यात्मैव वस्तुशब्दार्थ : । वेदान्तसार या ग्रंथावरील सुबोधिनी टीका.

११. सद्रूपत्वं नाम केनप्यबाध्यमानत्वेन कालत्रयेऽपि एकरूपेण विद्यमानत्वम् । शंकराचार्यकृत आत्मानात्माविवेक ।

१२. रामदासस्वामींनी दासबोधात सांगितलेले पंचीकरण हे केवलादवैत वेदान्तातील पंचीकरणापेक्षा वेगळे आहे. त्याच्या सविस्तर खुलाशासाठी पहा :- या ग्रंथातील पंचीकरण हा लेख

१३. दासबोधातील मायेच्या सविस्तर स्पष्टीकरणासाठी पहा :- या ग्रंथातील माया हा लेख.

१४. मुळापासून सैरावैरा । अवघा पंचीकरण पसारा । त्यांत साक्षत्वाचा दोरा । तोही तत्त्वरूप ॥ दास. १५.३.१

१५. तत्त्वें मुळीच आहेती । दास. ८.३.५५

१६. मूळ मायेचें चळण । तेंचि वायोंचे लक्षण । सूक्ष्म तत्त्वें तीचि जाण । जडत्वा पावलीं । ऐसी पंच महाभूते । पूर्वी होती अव्यक्ते । पुढे जाली व्यक्ते । सृष्टि रचनेसी ॥ (दास. ८.३.५६-५७); गुणापासूनि भुतें । पावली स्पष्ट दशेते । जडत्वा येऊन समस्तें । तत्त्वें जाली ॥ (दास. ८.४.४४)

१७. कारण देह म्हणजे अज्ञान असून महाकारण देह म्हणजे ज्ञान आहे (दास. १७.८.३०)

१८. पंचक म्हणजे पाच गोष्टींचा समूह.

१९. या पंचवीस तत्त्वांच्या सविस्तर स्पष्टीकरणासाठी पहा - दासबोध १७.८.२३-२९

२०. सूक्ष्म देहाच्या पंचवीस तत्त्वांचे सविस्तर स्पष्टीकरण हे दास १७.८.१-१६ यामध्ये आहे.

२१. या बत्तीस तत्त्वांसाठी दास १७.९.१-७ हा भाग पहावा.

२२. तत्त्वीं गुंतला म्हणे कोऽहं ।। दास. ६.३.३५

२३. आत्मानात्मविवेक म्हणजे 'देह अनित्य आत्मा नित्य । हाचि विवेक नित्यानित्य ।। दास. १३.१.२३

२४. मागे उल्लेखिलेले पिंडातील चार देह आणि ब्रह्मांडातील चार देह मिळून आठ देह होतात.

२५. विवेक केला की 'तत्त्वें ठाईंच्या ठाईं । विभागून गेली ।। (दास. ६.२.३१) असा प्रकार होतो.

२६. असे असले तरी "स्थूल सूक्ष्म तत्त्व झाडा । पिंड ब्रह्मांडाचा निवाडा ।। प्रचीत पाहे ऐसा थोडा । भूमंडळी ।। (दास. १७.१.२५) असा प्रकार असतो.



# ८. चार जिनस

विश्वात अनंत पदार्थ आहेत. या विश्वाचे स्वरूप काय, तसेच या विश्वाला काही कारण आहे काय, अशासारख्या प्रश्नांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न फार पूर्वीपासून चालू आहे. असा प्रयत्न करताना, जगाच्या कारणासकट त्यांतील पदार्थांचे वर्गीकरण करण्याचे प्रयत्न प्राचीन भारतीय विचारवंतांनी केले. असाच एक प्रयत्न महाराष्ट्रातील एका श्रेष्ठ साधूने केला. हे साधू म्हणजे सुप्रसिद्ध समर्थ रामदास स्वामी होत. त्यांचा हा प्रयत्न त्यांच्या दासबोध या ग्रंथात केलेला दिसून येतो. त्याचा अधिक विचार या लेखात केला आहे.

रामदासांनी अद्वैत तत्त्वज्ञान मांडले आहे. त्यांच्या मते निर्गुण[१] ब्रह्म हे अंतिम तत्त्व[२] आहे. या मूळ निश्चल निर्गुण ब्रह्मात संकल्परूप चंचल[३] माया उद्भवली. या संकल्परूप मायेपासून विश्वाची उत्पत्ति[४] झाली. अंतिम तत्त्वांसह विश्वातील पदार्थांचे एक वर्गीकरण रामदासस्वीमींनी दासबोधाच्या विसाव्या दशकातील पाचव्या समासात दिले आहे. त्यांच्या मते हे सर्व म्हणजे 'चत्वार जिनस' (= चार जिन्नस) आहेत. म्हणजे चार जिनसांखाली सर्व वस्तूंचे वर्गीकरण करता येते.

जरी रामदासस्वामींनी 'चार जिनसांचे' वर्गीकरण सुचविले आहे, तरी त्यांनी या चार जिनसांची नावे दिलेली नाहीत. तर नावाऐवजी संख्यात्मक शब्द वापरून त्यांनी या चार जिनसांचा निर्देश केला आहे. ते म्हणतात -

"येथून पाहाता तेथवरी । चत्वार जिनस अवधारीं । येक चौदा पांच च्यारी । ऐसें आहे॥" (२०.५.१). या ओवीचा अर्थ असा आहे : - मूळ ब्रह्मापासून विश्वातील पदार्थापर्यंत जे काही आहे ते चत्वार जिनस आहेत. म्हणजे ते सर्व पदार्थ 'चार जिनस' या वर्गीकरणात बसतात. यांतील पहिला जिन्नस 'एक' या संख्येने सूचित होतो. दुसरा जिन्नस चौदा आहे. म्हणजे दुसऱ्या जिनसाला चौदा नावे असल्याने, तो 'चौदा' या संख्येने सूचित होतो. तिसरा जिन्नस हा पाच पदार्थ एकत्र येऊन बनला असल्याने, तो पाच या संख्येने बोधित होतो. आणि शेवटी जो चौथा जिन्नस आहे. तोही चार वस्तु एकत्र येण्याने तयार होत असल्याने, तो चार या संख्येने बोधित होतो.

वर दिलेल्या जिनसांना नावे देऊन सांगायचे झाल्यास, असे म्हणता येते:-

ब्रह्म हे एक, एकमेव अद्वितीय आहे. म्हणून एक या संख्येने ब्रह्म बोधित होते. म्हणून पहिला जिन्नस म्हणजे एक असणारे निर्गुण ब्रह्म होय. चौदा नावे असणारा

दुसरा जिन्नस आहे. चौदा नावे मूळ मायेला[५] आहेत. म्हणून दुसरा जिन्नस म्हणजे चौदा नावे असणारी मूळ माया आहे. तिसरा जिन्नस म्हणजे पाच गोष्टी म्हणजे पाच महाभूते एकत्र येऊन बनणारा गट आहे. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी ही पाच महाभूते आहेत. आणि चौथा जिन्नस चार म्हणजे चार खाणी आहेत. येथे खाणी शब्दाने ज्या चार प्रकारांनी प्राण्यांची उत्पत्ति होते, ते चार प्रकार अभिप्रेत आहेत. या चार खाणी म्हणजे जारज, अंडज, स्वेदज आणि उद्‌भिज्ज या होत. येथे चार खाणी या शब्दांनी या चार प्रकारांनी उत्पन्न होणारे सजीव प्राणी अभिप्रेत आहेत. यापुढे या चार जिनसांचे आवश्यक ते स्पष्टीकरण पुढे दिलेले आहे.

**(अ) पहिला जिन्नस = एक = एक ब्रह्म**

या ब्रह्माविषयी २०.५ मध्ये रामदासस्वामी सांगतात :- परब्रह्म हे निर्मळ, निश्चळ, निर्विकार व अखंड आहे. ते सर्वांपेक्षा आगळे वेगळे आहे. ते नाना कल्पनांपेक्षा भिन्न असून, ते कल्पनांच्या पलिकडे आहे म्हणजेच ते निर्विकल्प आहे (२०.५.२-३). या परब्रह्माच्या तोडीचे अन्य काहीही नाही (२०.५.४).

दासबोधात इतर ठिकाणी ब्रह्माचे वर्णन येते. ते संक्षेपाने पुढीलप्रमाणे:-

ब्रह्म हे मायेपेक्षा[६] वेगळे आहे. मूळमायेच्या मागे निर्गुण ब्रह्म आहे (६.९.३२). ब्रह्मात मायामळ नाही (१४.९.१४). ब्रह्मात माया-भ्रम नाही (७.३.४७). ब्रह्म हे मायेच्या अतीत आहे (७.६.५९). मूळ मायेच्या पलीकडे ब्रह्म आहे (८.१०.७०).

आत्मा व परमात्मा ही ब्रह्माचीच नावे आहेत (७.५.५०). निर्गुण ब्रह्म म्हणजे निर्गुण आत्मा आहे (६.३.२९). आत्मवस्तु देहातीत आहे; तीच परब्रह्म आहे (८.८.२८). ब्रह्म म्हणजेच परमात्मा; तो अच्युत व अनंत आहे (६.९.२२). परमात्मा हा ज्ञानघन, एकरूप, पुरातन, चिद्रूप व चिन्मात्र आहे (७.२.४९). तो दृश्यापेक्षा वेगळा असला तरी तो चराचरात सर्वात्मा आहे (६.९.२३). ब्रह्म हे निर्गुण आहे (६.२.६). ब्रह्म शाश्वत आहे (६.२.१५). ते सर्व व्यापक आहे (६.२.१९). ते अविनाशी आहे (६.३.६). ते अचळ, अढळ आहे (६.३.१७). ब्रह्म निराकार आहे; ब्रह्माला पारावार नाही; ब्रह्म निर्मळ आहे (६.५.२-३). ब्रह्म नामरूपातीत आहे (७.२.४५). ते चर्मचक्षूला दिसत नाही (७.२.५). ब्रह्म हे निवांत, अरूप, अलक्ष, अगोचर, अच्युत, अनंत, अपरंपार, अदृश्य, अतर्क्य, चैतन्यरूप, सत्तारूप आणि निजानंद आहे (७.२.४५-४७). ब्रह्म हे सहज, सदोदित, शुद्ध, बुद्ध, सर्वातीत व शब्दातीत आहे (७.२.४९).

संक्षेपाने सांगायचे झाल्यास, "ब्रह्म सकळांहूनि थोर । ब्रह्माऐसें नाहीं सार । ब्रह्म सूक्ष्म अगोचर । ब्रह्मादिकांसी" (७.२.६) असे आहे.

**(आ) दुसरा जिन्नस = चौदा = चौदा नावे असणारी मूळ माया : -**

मूळ मायेची चौदा नावे कोणती व त्यांचा अभिप्राय काय हे पहाण्यापूर्वी मूळ मायेच्या संदर्भात रामदासस्वामींनी दासबोधात काय सांगितले आहे, हे संक्षेपाने पहाणे आवश्यक आहे.

प्रस्तुत स्थळी (२०-५) रामदास स्वामी मायेविषयी असे सांगतात : - मूळ[६] माया म्हणजे नाना कल्पना आहेत (२०.५.४). ती सूक्ष्म व कर्दमरूप[७] आहे. मूळ ब्रह्माच्या ठिकाणचा 'अहं बहु स्यां' (= मी अनेक होईन) हा संकल्प म्हणजे मूळ माया (२०.५.५). हा मूळचा जो हरिसंकल्प[७-अ] आहे, तोच सकळांचा आत्मा आहे (२०.५.६); तोच अंतरात्मा आहे.

दासबोधात अन्यत्र[८] मूळमायेविषयी समर्थ असे सांगतात :- मुळात एकमेव निश्चल निर्गुण ब्रह्म होते; त्या निश्चल ब्रह्मात चंचल निर्माण होते (१७.१.१). निश्चल ब्रह्मात उद्भूत होणाऱ्या या चंचळाला मूळमाया म्हणतात (१०.१०.५-७). निश्चल ब्रह्मात हे जे चलन / चंचल झाले, ते इच्छा/स्फूर्ति/स्मरण या स्वरूपाचे असते (१०.१०.१२). वेगळ्या शब्दांत, निश्चल ब्रह्मात चंचल झाले म्हणजे ब्रह्माला स्वत:चे स्मरण स्फुरले (१७-२.६). निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी 'अहं' (= मी) अशी स्फूर्ति वा स्मरण झाले (८.३.५१). निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी 'अहं' अशी जी स्फूर्ति स्फुरली, तीच माया (८.३.५१). निश्चल ब्रह्मास अहंपणाने होणारी स्वत:ची जाणीव म्हणजे मूळ प्रकृति (१०.१०.१३) आणि मूळ प्रकृति म्हणजेच मूळमाया होय (१०.१०.१३). मूळ ब्रह्मात हे जे पहिले स्फुरण झाले, तेच अंतरात्म्याचे = मूळमायेचे स्वरूप आहे (१६.७.४).

निराकार ब्रह्मामध्ये स्फूर्तिरूप अहंकार उठला; हा स्फूर्तिरूप अहंकार (= मूळमाया) वायुस्वरूप आहे (४.१०.१-२) म्हणजेच मूळ माया ही वायुस्वरूप आहे (मूळमाया वायोस्वरूप ९.६.८ ; तसेच १०.३.२). वायूत जाणीव असते; ही जाणीव म्हणजेच इच्छा (१०.४-१०). ही इच्छा म्हणजे'अहं बहु स्यां' ( = मी अनेक व्हावे), ही इच्छा/कल्पना/संकल्प होय. म्हणून असे म्हणता येते:- मूळ ब्रह्मात कल्पना आली (११.१.८-९); ब्रह्मात संकल्प उठला (१२.६.४); निश्चल ब्रह्मात चंचल संकल्प निर्माण झाला (१३.३.३) आणि हा संकल्प (= जाणीव) म्हणजेच मूळमाया (१५.७.२)

अशाप्रकारे, मूळमाया ही मूलत: अत्यंत सूक्ष्म कल्पना आहे (२०.२.१९); मूळमाया संकल्परूप आहे (२०.९.२३)

वरील भागच रामदासस्वामी वेगळ्या शब्दांत असा सांगतात :- मूळमाया वायुस्वरूप आहे; वायूत जाणीव असते (१०.४.१०). म्हणून वायु आणि जाणीव या दोहोंच्या मेळाव्याला मूळमाया म्हणावे (१०.९.५). ब्रह्माच्या निश्चल स्वरूपात येणारी चंचल स्थिति म्हणजे वायु (१०.९.४); या वायूमध्ये जगज्ज्योति असते (१०.३.११,१३) म्हणून वायू, जाणीव वा जगज्ज्योति यांच्या मेळाव्यालाही मूळमाया म्हणतात (१०.९.७)

संक्षेपाने : - निश्चल ब्रह्मात उठणारे चंचल/वायु/कल्पना/संकल्प/स्फूर्ति/स्मरण/अहंकाररूप स्मरण अथवा इच्छा म्हणजे मूळमाया.

मूळमाया ही सगुण व साकार आहे. ती विकारी म्हणजे सतत बदलणारी आहे (७.१.५५). माया क्षणभंगुर, नाशवंत आहे (७.१.५६; ८.८.३७). या सृष्टीची/विश्वाची रचना मायेमूळे होते (७.१.५८-५९)

मूळमाया ही इंद्रियगम्य नाही; तथापि त्या मायेची = चंचळाची थोडीफार कल्पना यावी म्हणून तिला अनेक नावे दिलेली आहेत (१०.१०.६). निश्चल ब्रह्मातील चंचलाला ( = मूळमायेला) अनेक[९] नावे दिली जातात (१०.१०.५-७). मूळमायेची नावे सांगणारे जे शब्द आहेत ते भाषेच्या दृष्टीने पुल्लिंगात, स्त्रीलिंगात अथवा नपुंसकलिंगात असतात. म्हणून तीनही लिंगात असणारी अनेक नावे मूळमायेला दिली जातात.[१०]

मूळ मायेच्या तीन लिंगात असणाऱ्या अनेक नावांपैकी चौदा नावे[११] रामदासांनी २०.५ मध्ये दिलेली आहेत, ती अशी : -

"निश्चळीं चंचळ चेतले । म्हणौनि चैतन्य बोलिलें । गुणसमानत्वे जालें । गुणसाम्य ऐसें ।। अर्धनारीनटेश्वर । तोचि षड्गुणेश्वर । प्रकृति पुरुषाचा विचार । शिवशक्ती ।। शुद्धसत्त्वगुणाची मांडणी । अर्धमात्रा गुणक्षोभिणी । पुढें तिन्हीं गुणांची करणी । प्रगट जाली । मन माया अंतरात्मा । चौदा जिनसांची सीमा । विद्यमान ज्ञानात्मा । इतुके ठायीं ।। ऐसा दुसरा जिनस । अभिधाने चतुर्दश ।। (२०.५.७-११)

येथे रामदासस्वामींनी काही नावांची स्पष्टीकरणे दिली आहेत; तर कधी त्यांनी दिलेल्या स्पष्टीकरणावरून ते नाव[१२] ठरवावे लागते. या दोन गोष्टी लक्षात घेऊन ही नावे पुढीलप्रमाणे कळतात:-

(१) चैतन्य (२) गुणसाम्य (३) अर्धनारीनटेश्वर (४) षड्गुणेश्वर (५) प्रकृति-

पुरुष (६) शिवशक्ति (७) शुद्ध सत्त्वगुण (८) अर्धमात्रा[१३] किंवा गुणक्षोभिणी (९) सत्त्व (गुण) (१०) रज (गुण) (११) तम (गुण) (१२) मन (१३) माया (१४) अंतरात्मा

मूळमायेच्या या चौदा नावांचे संक्षिप्त स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे देता येते:-

(१) चैतन्य :- निश्चल ब्रह्मात चंचल उद्भवले; तेच मूळमाया आहे. निश्चल ब्रह्मात उठणारे चंचल ( = मूळमाया) म्हणजे स्फूर्तिरूप अहंकार हा वायुस्वरूप आहे (४.१०.१-२). वायूत जाणीव आहे; म्हणून या निश्चल ब्रह्मातील चंचलाला = मूळमायेला चैतन्य म्हणतात (निश्चळीं चंचल चेतलें । म्हणोनि चैतन्य बोलिलें ॥ २०.५.७). मूळमाया जड[१३-अ] पदार्थांना चेतविते, चेतना देते, म्हणून तिला चैतन्य म्हणतात (जड पदार्थ चेतवितें तें । म्हणौनि चैतन्य बोलिजेतें । सूक्ष्मरूपें संकेतें । समजोन घ्यावी ॥२०.२.२१). निश्चल ब्रह्मात चंचल उठले, तीच माया; ती संकल्परूप आहे ( मूळमाया संकल्परूप ॥ २०.९.२३). निश्चल ब्रह्मात चंचल संकल्प उठला म्हणजेच निश्चल ब्रह्मात चैतन्य जागे झाले. म्हणून त्या मूळमायेला - संकल्पाला - चैतन्य असे म्हटले जाते.

(२) गुणसाम्य :- मूळमायेत तीन गुण सत्त्व, रज, तम असतात. (तैसी मूळमाया जाण । पंच भूतें आणि त्रिगुण । मूळीं आहेत हे प्रमाण । प्रत्यय जाणावें ॥ १५.७.९ येथे मूळ शब्दाने मूळ माया अभिप्रेत आहे). मूळमाया वायुस्वरूप आहे (९.६.८; १०.४.१०); त्या वायूत तीन गुण असतात (तैसी ब्रह्मीं मूळमाया जाण । त्या वायोमध्यें त्रिगुण । आणि पंच भूतें ॥१०.९.१; ते मूळ मायेचें लक्षण । वायोस्वरूपचि जाण । पंचभूतें आणि त्रिगुण । वायोंअंगी ॥ १०.३.२). मूळ मायेत तीन गुण समानपणे असतात. तीच गुणसाम्य अवस्था होय (समानगुण, गुणसाम्य २०.९.२४). मूळमायेत तीन गुणांचा समतोल असल्याने, तिला गुणसाम्य म्हणतात (गुणसमानत्वें जालें । गुणसाम्य ऐसें ॥ २०.५.७). निश्चल ब्रह्मात स्वतःचे स्मरण स्फुरले. त्या स्मरणात गुणांची समानता असल्याने, तेथे गुणसाम्य असते (निश्चळीं स्मरण चेतलें । त्यांस चैतन्य ऐसें कल्पिलें । गुणसमानत्वें जालें । गुणसाम्य ऐसें ॥ १७.२.६). अशाप्रकारे मूळमायेत गुणसाम्य असल्याने, तिला गुणसाम्य म्हणतात.

(३) अर्धनारीनटेश्वर : - ब्रह्मात उठणारा स्फूर्तिरूप अहंकार ( = मूळ माया) हा वायुस्वरूप आहे (४.१०.१-२); त्या वायूत जाणीव आहे (१०.४.१०) म्हणून वायु आणि जाणीव यांच्या मेळाव्याला मूळमाया म्हणतात (निश्चळीं जे चंचळ स्थिती । तोचि

वायो ।। तयामध्ये जाणीव कळा । जगज्जोतीचा जिव्हाळा । वायो जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे ।।१०.९.४.५). या वायूमध्येंच जगज्ज्योति असते (१०.९.५; वायोमधील जगज्जोती ।। १०४.१३; वायोमध्यें जगज्जोती ।। १०.४.११)

वायु, जाणीव वा जगज्जोती यांच्या मेळाव्याला मूळ माया म्हणतात. (वायो जाणीव जगज्जोती । तयास मूळमाया म्हणती । पुरुष आणि प्रकृति । याचेच नाव ।। १०.९.७). मूळमायेतील वायूला प्रकृति म्हणतात आणि जगज्ज्योतीला पुरुष[१४] म्हणतात. (वायोस म्हणती प्रकृती । आणि पुरुष म्हणती जगज्जोती । पुरुष प्रकृती शिवशक्ती । याचेच नाव ।। १०.९.८). वेगळ्या शब्दांत : - वायु म्हणजे शक्ति/प्रकृति व जाणीव म्हणजे ईश्वर; या दोहोंना मिळून अर्धनारीनटेश्वर म्हणतात (वायो शक्ति जाणीव ईश्वर । अर्धनारीनटेश्वर । लोक म्हणती निरंतर । येणें प्रकारें ।।१०.९.१०). या सर्वांचा भावार्थ असा :- मूळमायेत दोन तत्त्वें आहेत. एकाला शक्ति वा प्रकृति म्हणतात; तर दुसऱ्याला ईश्वर/पुरुष/शिव म्हणतात आणि त्या दोहोंना मिळून अर्धनारीनटेश्वर हे नाव दिले जाते. म्हणजेच मूळ मायेलाही अर्धनारीनटेश्वर ही संज्ञा प्राप्त होते.

(४) षड्गुणेश्वर :- निर्गुण ब्रह्मामध्ये जो संकल्परूप गुणविकार उत्पन्न झाला, त्याला षड्गुणेश्वर[१४-अ] म्हणतात; या षड्गुणेश्वरालाच अर्धनारीनटेश्वर म्हणतात (निर्गुणी गुणविकारु । तोचि षड्गुणेश्वरू । अर्धनारीनटेश्वरू । तयास म्हणिजे ।। १७.२.८; पुढे संकल्प उठिला । षड्गुणेश्वर बोलिजे त्याला । अर्धनारीनटेश्वराला । बोलिजेतें ।। १२.६.४). याचा अर्थ असा की अर्धनारीनटेश्वर हाच षड्गुणेश्वर आहे (अर्धनारीनटेश्वर तोचि षड्गुणेश्वर ।। २०.५.८). अशाप्रकारे निर्गुण ब्रह्मातला संकल्प म्हणजेच मूळ माया; तिलाच षड्गुणेश्वर किंवा अर्धनारीनटेश्वर म्हणतात.

(५) प्रकृति-पुरुष, आणि (६) शिव-शक्ति : - मूळमाया वायुरूप आहे. वर पाहिल्याप्रमाणे तेथे शक्ती व ईश्वर/शिव आणि प्रकृति व पुरुष ही दोन तत्त्वें आहेत (१०.९.७.१०). म्हणून मूळमायेलाही प्रकृति-पुरुष आणि शिव-शक्ति ही नावे आहेत (१०.९.८; १५.७.२-३).

(७) शुद्ध सत्त्व : - सर्व [१५]तत्त्वामध्ये जे मुख्य तत्त्व आहे, त्याला शुद्धसत्त्व म्हणतात; त्यालाच अर्धमात्रा, महत्तत्त्व, मूळमाया म्हणतात (तत्त्वांमध्ये मुख्य तत्त्व। ते जाणावे शुद्ध सत्त्व । अर्धमात्रा महत्तत्त्व । मूळमाया ।।१२.५.११). मागे पाहिल्याप्रमाणे, मूळमायेत सत्त्व, रज व तम हे तीन गुण गूढ । सूक्ष्म रूपाने

असतात (१५.७.९) आणि जेथे सत्त्व, रज, तम हे तीन गुण गूढ वा सूक्ष्म रूपाने असतात, त्याला महत्तत्त्व किंवा शुद्ध सत्त्व म्हणतात (तयासीच म्हणिजे महत्तत्व । जेथें त्रिगुणाचे गूढत्व । अर्धमात्रा शुद्धसत्त्व । गुणक्षोभिणी ॥ २०.९.२७). एवं मूळ मायेलाच शुद्ध सत्त्व हे नाव दिले जाते.

(८) गुणक्षोभिणी[१६] (किंवा अर्धमात्रा) :- मूळ मायेत सत्त्व - रज-तम हे तीन गुण[१७] साम्यावस्थेत असतात (२०.२.२५). या मूळमायेतूनच विश्वाची उत्पत्ति होते. मूळमायेतून विश्वरूपी अंकुर फुटत असताना, जो पहिला विकार होतो तो म्हणजे गुणमाया किंवा गुणक्षोभिणी माया होय. मूळमाया ही बहुगुणी आहे; अधोमुख होऊन तीच गुणक्षोभिणी बनते (१२.६.६). मूळमायेतील गुणांची साम्यावस्था ढळून, तिच्या ठायी गुणांचा थोडा विकार झाला की तिलाच गुणक्षोभिणी असे म्हणतात (मूळमाया वायोस्वरूप । ऐक गुणक्षोभिणीचे रूप । गुणविकार होतांचि अल्प । गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ९.६.८). हीच गोष्ट रामदासस्वामी पुढीलप्रमाणेही सांगतात : - मूळमायेपासून गुणक्षोभिणी माया निर्माण होते (८.४.२; १०.२.६). मूळमायेतून उद्भवलेल्या मायेने गुणांना जन्म दिला; म्हणून तिला गुणक्षोभिणी माया म्हणतात (८.४.२). ज्या मायेतून गुण प्रगट ( = व्यक्त) होतात, तिला गुणक्षोभिणी म्हणतात (जेथून गुण प्रगटती । तीस गुणक्षोभिणी म्हणती ॥ २०.२.२४) आणि गुणक्षोभिणी मायेतूनच मुळात सूक्ष्म/गूढ असणारे तीन गुण हे स्पष्ट होतात (पुढे तिन्ही गुणांची करणी/प्रगट जाली ॥ २०.५.९)

मूळ मायेला शुद्धसत्त्व म्हणतात (वर पहा); त्यालाच अर्धमात्रा म्हणतात (१२.५.११). गुणक्षोभिणी हे मूळमायेचे एक नाव आहे; साहजिकच अर्धमात्रा हीही गुणक्षोभिणीच आहे (अर्धमात्रा गुणक्षोभिणी । २०.५.९)

(९) सत्त्व (१०) रज (११) तम हे गुण :- मूळमायेत सूक्ष्म रूपाने सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असतातच (१०.९.१; १०.३.२); तेथे ते साम्यावस्थेत असतात (२०.९.४; २०.५.७). विश्वोत्पत्तींच्या वेळी मूळमायाच गुणक्षोभिणी माया बनते (वर पहा). गुणक्षोभिणी मायेत तीन गुण प्रगट होतात (पुढे तिन्ही गुणांची करणी । प्रगट जाली ॥२०५.९). गुणक्षोभिणी मायेतून सत्त्व-रज-तम हे त्रिगुण निर्माण होतात म्हणजे ते व्यक्त वा स्पष्ट होतात (पुढें तिजपासाव कोण । सत्त्व-रज-तम गुण ॥८.४.३; मूळमायेपासून गुणमाया । गुणमायेपासून तया । गुणांस जन्म ॥ ९.६.२६; ते मूळमाया बहुगुणी । अधोमुखे गुणक्षोभिणी । गुणत्रय तिजपासुनी । निर्माण जाले ॥ १२.६.६).

सत्त्व, रज, तम हे तीन गुण मूळ मायेत साम्यावस्थेत असतात. तेच गुणक्षोभिणी

मायेत प्रगटरूपाने असतात. तेव्हा कार्यकारणाचे अनन्यत्व[१८] लक्षात घेऊन, या तीन गुणांनाही मूळमाया म्हणता येते.

(१२) मन :- मूळ मायेला अनेक नावे आहेत आणि ती तीनही लिंगांत असणाऱ्या शब्दांनी दाखविली जातात. मूळमायेच्या नपुंसकलिंगी नावात अंत:करण व चित्त ही नावे आहेत (जाणणे अंत:करण चित्त । १०.१०.२०). प्राय: मन हे अंत:करण[१९] मानले जाते. म्हणून मन हे मूळमायेचे नाव ठरते. मूळमायेची चौदा नावे शरीरातही सापडतात (शरीरीं विभागलें । सकळकाहीं ।। काय तें येथेचि पाहावें । कैसें तें येथेंचि शोधावें । सूक्ष्माचीं चौदा नावें । येथेंचि समजावी ।।२०.९.२०-२१). मूळमाया ही संकल्परूप आहे; आणि तेच अंत:करणाचे स्वरूप आहे. अशाप्रकारे संकल्प करणारे मन हे मूळमायेचे नाव ठरते.

(१३) माया :- रामदासस्वामींनी दासबोधात मूळमाया, गुणमाया, गुणक्षोभिणी माया हे शब्द उपयोजिले आहेत. त्या शब्दांतून क्रमाने मूळ, गुण व गुणक्षोभिणी हे शब्द गाळले की केवळ माया हा शब्द उरतो. आणि हा माया शब्द सामान्यपणे या तीनही मायेसाठी वापरता येतो. दासबोधात रामदास स्वामींनीही अनेक ठिकाणी नुसता माया असाच शब्द वापरला आहे. उदा. ६.३.१२; ६.५.१-२३; ७.५.१०,१४; ८.२.२,३५; ८.३.३५; इत्यादि. खेरीज 'अहं ऐसी स्फूर्ति जाली । तेचि माया' (८.३.५१) असे म्हणून त्यांनी माया म्हणजेच मूळमाया असेही दाखवून दिले आहे.

(१४) अंतरात्मा - मागे पाहिल्याप्रमाणे मूळमायेला तीनही लिंगातील शब्दांची नावे आहेत. त्यातील पुल्लिंगी नावांमध्ये अंतरात्मा[२०] हे नाव आहे (आत्मा अंतरात्मा ।। १०.१०.१८). आत्मा हेही नाव मायेला[२०] आहे. कारण आत्मा चंचल आहे, असेही समर्थ सांगतात (१२.५.१५). जेथे चंचलपण असते तेथे अंतरात्मा असतो (२०.६.९). मुळात हरिसंकल्प आहे; तोच सर्वांचा अंतरात्मा होय (२०.५.६). मूळ निश्चल ब्रह्मात प्रथम उठणारे स्फुरण हेच अंतरात्म्याचे लक्षण किंवा स्वरूप आहे (मूळीं मुळीचे स्फुरण । तेंचि अंतरात्म्याचें लक्षण ।।१६.७.४)

अशी ही मूळमायेची चौदा नावे आहेत. यातील गुणसाम्य, शुद्धसत्त्व व अंतरात्मा ही नावे मायेचे स्वरूप दाखवून देतात. अर्धनारीनटेश्वर, षड्गुणेश्वर, प्रकृति-पुरुष व शिवशक्ति ही नावे मायेचे स्वरूप अधिक स्पष्ट करतात. चैतन्य हे नाव मायेचे स्वरूप तसेच कार्य दाखविते. गुणक्षोभिणी, सत्त्व, रज व तम ही नावे मायेच्या कार्याच्या/परिणामाच्या दृष्टीतून आहेत. माया हे नाव सामान्यपणे मायेची सर्व रूपे

सूचित करते. मन हे नाव प्रामुख्याने पिंडाच्या दृष्टिकोनातून आहे.

अशी चौदा नावे असणारा दुसरा जिन्नस आहे (चौदा जिनसांची सीमा । विद्यमान ज्ञानात्मा । इतुके ठायीं ॥ २०.५.१०; ऐसा दुसरा जिनस / अभिधाने चतुर्दश ॥ २०.५.११).

(इ) तिसरा जिन्नस = पाच = पाच महाभूते :- पाच महाभूते हा तिसरा जिन्नस आहे. आकाश, वायु, तेज, जल व पृथ्वी अशी पंच[२१] महाभूते आहेत. पंच महाभूते ही उत्पन्न होऊन नाश पावणारी असल्याने, त्यांना आदि आणि अंत आहेत; त्यांत जाणीवेचा अंश[२२] अगदी कमी आहे (येथे पाहातां जाणीव थोडी । आदि अंत हे रोकडीं ॥ २०.५.१२). दासबोधात पंच महाभूताबद्दल समर्थ इतरत्र असे सांगतात : - गुणक्षोभिणी मायेपासून सत्त्व, रज, तम हे तीन गुण झाले (८.४.२-३). त्यातील तमोगुणांपासून पंच महाभूते उत्पन्न झाली (तमोगुणापासून निर्माण । जालीं पंचभूतें ॥ ८.४.३; एवं तमोगुणापासून जालीं । पंच महाभूतें ॥ ८.४.४). पंच महाभूतांच्या मिश्रणाने सृष्टि किंवा पिंडब्रह्मांड रचना झाली आहे (१२.६.१२-१७). साहजिकच पिंड आणि ब्रह्मांड यामध्ये पंच महाभूते दिसून येतात (पाच भूतें ते ब्रह्मांडी । आणि पांचची वर्तती पिंडीं ॥ ९.६.३७; तसेच ९.६.३८). सर्व सृष्टीची रचना ही पाच महाभूतांनी सिद्ध झालेली आहे (सकळ सृष्टीची रचना । ते हे पंचभूतिक जाणा ॥६.२.७). चौऱ्यांशी लक्ष योनि हाही पंच महाभूतांचाच विस्तार आहे (पांचा भूतांचे विस्तार । चौऱ्यांशी लक्ष योनी ॥ ९.६.४३)

(ई) चौथा जिन्नस = चार = चार खाणी : - चार खाणी हा चौथा जिन्नस आहे (खाणी निरोपिल्या तातडी । तो चौथा जिनस ॥२०.५.१२). या चार खाणीत अनंत प्राणी निर्माण होतात; त्यांच्यात जाणीव असते (च्यारी खाणी अनंत प्राणी । जाणीवेची जाली दाटणी ॥२०.५.१३)

चार खाणींचे नुसते उल्लेख दासबोधात असे आहेत : - ३.१०.३७; ८.१.२०; १३.३.१५. त्यांची नावे अंडज, जारज,[२३] स्वेदज आणि उद्भिज अशी आहेत (१३.३.१४). पंचमहाभूतांपासून सृष्टीची रचना झाल्यावर, या चार[२४] खाणी उद्भवतात; पृथ्वी आणि पाणी हे त्यांना बीजरूपाने[२५] आहेत.

विश्वात प्राण्यांच्या चौऱ्यांशी लक्ष योनि आहेत (चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी । १३.३.१६; चौऱ्यांशी लक्ष योनींचा वास । भूमंडळीं ॥ १२.६.१६). हे सर्व प्राणी या चार खाणीतून उत्पन्न होतात (चत्वार खाणी जीव नाना ॥ १५.४.२४; चौखाणींचे

प्राणी असती ॥१५.९.१).

अशाप्रकारे निर्गुण ब्रह्म आणि विश्वातील अनंत पदार्थ यांचे वर्गीकरण करून, रामदासस्वामींनी चार जिन्नस म्हणजे वर्ग सांगितले आहेत, हे स्पष्ट होते.

**तळटीपा**

१. दासबोधाच्या ७.३ मध्ये रामदासस्वामींनी १४ (गौण) ब्रह्मांचे वर्णन करून, मग मुख्य ब्रह्म कसे वेगळे आहे, हे सांगितले आहे. पहा : या ग्रंथातील पहिला लेख.

२. या ब्रह्माचे अधिक वर्णन दासबोध, ९.१.१-२९ मध्ये आहे.

३. मायेच्या सविस्तर स्पष्टीकरणासाठी पहा :- या ग्रंथातील माया हा लेख.

४. तथापि ही विश्वोत्पत्ति पारमार्थिक दृष्ट्या खरी नाही, हेही लक्षात ठेवावयास हवे.

५. तसे पाहू गेल्यास, मूळ मायेला नाना नावे आहेत (१०.१०.५,७), असे रामदासस्वामी सांगतात. त्यांतील चौदा नावे समर्थांनी येथे दिली आहेत. त्यांनी हीच नावे का निवडली हे सांगता येत नाही. बहुधा या नामांचे विशिष्ट औचित्य लक्षात घेऊन त्यांनी ही नावे निवडलेली दिसतात. हे औचित्य किंवा या नावाचे स्पष्टीकरण पुढे दिले आहे.

६. माया आणि ब्रह्म यातील सविस्तर फरकासाइी पहा : दास. ६.५.१-२४

७. कर्दम म्हणजे चिखल. चिखल म्हणजे पाणी व माती यांचे मिश्रण किंबहुना सामान्यपणे मिश्रण. माया कर्दमरूप आहे म्हणजे ती मिश्रणरूप आहे. मूळ मायेत काही पदार्थांचे मिश्रण आहे. मूळ मायेमध्ये तीन गुण व पाच भूते यांचा कर्दम म्हणजे मिश्रण आहे. (स्वरूप मुळींच भासलें । त्रिगुण-भूतांचे ॥ ऐसा हा मुळीचा कर्दमू ॥ ९.६.१४-१५. (येथे मूळ शब्दाने मूळमाया अभिप्रेत आहे). मूळ मायेत सूक्ष्मरूपाने पंचभूते आणि त्रिगुण असतात (तैसी मूळमाया जाण । पंचभूतें आणि त्रिगुण । मूळीं आहेत हे प्रमाण । प्रत्ययें जाणावें ॥१५.७.९). मूळमाया वायुस्वरूप आहे (९.६.८; १०.४.१०); त्या वायूमध्ये पाच भूते आणि तीन गुण असतात (१०.९.१; १०.३.२)

७-अ. मूळसंकल्प तो हरिसंकल्प ॥ २०.४.१९

८. तथापि ही मूळमाया खरी नाही. माया स्वप्नवत् आहे (१४.१०.३). मृगजळाप्रमाणे आहे (७.३.३६). माया असत्य आहे (१०.१०.५५). माया मिथ्या आहे (१४.१०.१). माया मिथ्या आहे ही गोष्ट विचारी माणसाला कळून येते (८.२.५३; २०.३.२३).

९. मूळमायेला शिवशक्ति असेही म्हणतात (१०.१०.७). या शिवशक्तीला म्हणजेच मूळमायेला अनंत नावे आहेत (५.४.२१)

१०. तीनही लिंगातील मूळ मायेची काही नावे रामदासांनी १०.१०.१६-३१ या ठिकाणी दिलेली आहेत.

११. मूळमायेची चौदा नावे ही शरीरात सुद्धा जाणून घ्यावयाची आहेत, असेही रामदास स्वामी म्हणतात. पहा : - २०.९.२०-२९.

१२. निश्चळीं चंचळ चेतलें । म्हणौनि चैतन्य बोलिलें ।। (१); गुणसमानत्वे जालें । गुणसाम्य ऐसें ।। (२); शुद्धसत्त्वगुणाची मांडणी (७); पुढे तिन्ही गुणांची करणी । प्रगट जालीं (९-११). तीन गुण हे सत्त्व, रज, तम असे आहेत. म्हणून यादीत ते स्वतंत्रपणे दिले आहेत.

१३. नावे चौदा रहावी म्हणून अर्धमात्रा व गुणक्षोभिणी ही नावे स्वतंत्रपणे घेतलेली नाहीत. दोन्हीही नावे मूळमायेचीच आहेत.

१३-अ. मूळमाया संकल्परूप । तें अंत:करणाचे स्वरूप । जड चेतवी चैतन्यरूप । तेही शरीरीं आहे ।। २०.९.२३

१४ वायूतील विशेष जाणीव म्हणजेच प्रकृतीमधील पुरुष (वायोमध्यें जाणीव विशेष । तोचि प्रकृतीमध्ये पुरुष ।।१०.९.९)

१४-अ. या षड्गुणेश्वरालाच प्रकृति-पुरुष, शिव-शक्ति, अर्धनारीनटेश्वर ही नावे आहेत (१५.७.२-३)

१५. दासबोधातील तत्त्व शब्दाच्या विशिष्ट अर्थासाठी पहा : या ग्रंथातील तत्त्वझाडा हा लेख.

१६. गुणक्षोभिणी या शब्दाचा पर्याय म्हणून गुणमाया हाही शब्द रामदासस्वामींनी वापरलेला आहे.

१७. वर (२) गुणसाम्य पहा.

१८. रामदासस्वामी अद्वैत तत्त्वज्ञान मानतात. अद्वैत तत्त्वज्ञानात उपादानकारण व त्याचे कार्य हे भिन्न मानले जात नाहीत; तर ते अनन्य ( = वेगळे नसणारे) आहेत असे मानले जाते. यालाच कार्यकारणाचे अनन्यत्व म्हणतात.

१९. रामदासस्वामींनी अंत:करणपंचकही सांगितले आहे. त्यात मन, चित्त येतातच. मन हे संकल्प-विकल्प करणारे आहे. मूळमाया हीही संकल्परूप आहे.

२०. दासबोधात रामदासस्वामी काही शब्द वेगवेगळ्या अर्थाने वापरतात. संदर्भानुसार त्यांचा अर्थ ठरवावा लागतो.

२१. पंचमहाभूतांच्या अधिक माहितीसाठी दासबोध ८-५ पहा.

२२. पहा : म्हणौनि जाणीव-नेणीव-मिश्रित । अवघें चालिलें पंचभूत । म्हणौनियां भूतांत । जाणीव असे ।। कोठे दिसें कोठें न दिसें । परी ते भूतीं व्यापून असे । तीक्ष्ण बुद्धी करिता भासे । स्थूळ सूक्ष्म ।। ९.६.२०-२१ ।।

२३. पुढील स्थानी फक्त दोन खाणींचा निर्देश आहे : - येक जळ स्वेदापासून जाले । ते प्राणी स्वेदज बोलिले । येक वायोकरतां जाले । अकस्मात उद्भिज ।।१०.४.३३

२४. मुळीं जाली ते मूळ माया । त्रिगुण जाले ते गुणमाया । जडत्व पावली ते अविद्या माया। सृष्टिरूपें ।। पुढें च्यारी खाणी जाल्या । च्यारी वाणी विस्तारल्या । नाना योनी प्रगटल्या ।। नाना व्यक्ती ।।११.१.९-१०

२५. अंडज जारज स्वेदज उद्भिज्ज । पृथ्वी पाणी सकळांचे बीज । ऐसें हे नवल चोज। सृष्टिरचनेचें ।। (१३.३.१४)

●●●

# १. जगज्जोती

दासबोध या ग्रंथात येणाऱ्या रामदासस्वामींच्या काही तात्त्विक संकल्पना या पूर्वकालीन संतवाङ्मयात आढळत नाहीत. जगज्योती ही अशीच एक संकल्पना आहे. दासबोधातील दहावा दशक हा "जगज्जोति" दशक आहे. खेरीज या जगज्जोतीचा काही तपशील दशक ११ व दशक १५ यामध्ये येतो. जगज्जोतीचे हे सर्व उल्लेख लक्षात घेऊन, प्रस्तुत लेखात जगज्जोतीचे स्पष्टीकरण दिले आहे.

जगज्जोती या संकल्पनेच्या संदर्भात एक गोष्ट लक्षात घेणे आवश्यक आहे. ती म्हणजे :- जगज्जोतीचा संबंध दासबोधातील मायेच्या संकल्पनेशी आहे. त्यामुळे जगज्जोतीचे स्पष्टीकरण करताना, मायेची आवश्यक ती माहिती करून घ्यावी लागते. तसेच येथे केले आहे.

जगज्जोती म्हणजे काय, हे सांगताना रामदासस्वामी एके ठिकाणी असे म्हणतात, "जी जाणीव सर्व जगाला वाचवीत असते, तिला जगज्जोती असे नाव दिले जाते." याचा अर्थ असा :- जी जाणीव जगातील सर्व जिवंत प्राण्यांना वाचवीत असते, ज्या जाणीवेमुळे जगातील जिवंत प्राणी स्वत:चे रक्षण करतात, ती जाणीव म्हणजे जगज्जोती (१०.९.१४). जगज्जोतीच्या या अर्थाखेरीज आणखी काही अर्थांनी रामदासस्वामींनी हा शब्द वापरला आहे. हे सर्व अर्थ एकत्र करुन, या लेखात प्रस्तुत केले आहेत.

**(१) जगज्जोती म्हणजे वायुस्वरूप मूळमायेतील जाणीव हा घटक** :- दासबोधात मूळमायेचे स्वरूप असे सांगितले आहे : - मुळात निश्चळ ब्रह्म असते. त्या निश्चळ ब्रह्मात चंचळ निर्माण होते. निश्चळ ब्रह्मातील हे सूक्ष्म चंचळ म्हणजे मूळमाया. आता, ब्रह्माच्या निश्चळ स्वरूपातील ही चंचळ स्थिती म्हणजे वायु आहे. याचा अर्थ असा की मूळमाया ही वायुस्वरूप आहे. या वायूत जाणीव असते. म्हणून वायु आणि जाणीव या दोहोंच्या मेळाव्याला मूळमाया म्हणतात. याचा अर्थ असा :- मूळमायेत दोन घटक आहेत, एक वायु आणि दुसरा जाणीव. वायु आणि जाणीव या शब्दांऐवजी अन्य शब्द वापरून रामदासस्वामी असे सांगतात :- वायूला प्रकृति म्हणतात (वायोस म्हणती प्रकृति । १०.९.८), आणि जाणीव म्हणजे जगज्जोती (जाणीव जगज्जोति । १०.९.७). या जगज्जोतीलाच पुरुष असेही म्हणतात (आणि पुरुष म्हणती जगज्जोति । १०.९.८) किंवा, वायूला शक्ती असे म्हणतात (वायो शक्ती । १०.९.१०), तर जाणीवेला ईश्वर म्हणतात (जाणीव ईश्वर । १०.९.१०). संक्षेपाने सांगायचे झाल्यास, मूळमायेतील

वायु म्हणजे प्रकृति किंवा शक्ती आणि जाणीव म्हणजे पुरुष (= जगज्जोती) किंवा ईश्वर (= शिव) (वायोस म्हणती प्रकृती । आणि पुरुष म्हणती जगज्जोति । पुरुष-प्रकृति शिव-शक्ती । याचेच नाव । (१०.९.८)

वरील प्रकारच रामदासस्वामी वेगळ्या पद्धतीने असा मांडतात : - वायूमधील जाणीव-कलेला जगज्जोती असे नाव दिले असल्याने, वायु आणि जाणीव (= जगज्जोती) या दोहोंच्या मेळाव्याला मूळमाया म्हणतात ( तयामध्ये जाणीव कळा । जगज्जोतिचा जिव्हाळा । वायो जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे । १०.९.५) आता, वायूला प्रकृति व जगज्जोतिरूप जाणीवेला पुरुष म्हणत असल्याने, हे दोन म्हणजे प्रकृति व पुरुष होत; आणि या दोहोंना मिळून मूळमाया म्हणतात (वायो जाणीव जगज्जोति । तयास मूळमाया म्हणती । पुरुष आणि प्रकृती । याचेच नाव । १०.९.७)

वरील सर्व स्पष्टीकरणांचा भावार्थ इतकाच आहे : - मूळमायेत जे वायु आणि जाणीव असे दोन घटक आहेत, त्यातील जाणीव म्हणजे जगज्जोती आहे. म्हणून जाणीव या स्वरूपातील जगज्जोती ही मूळमायेचा एक घटक आहे.

**(२) मूळमायेलाही जगज्जोती असे म्हणता येते :** - वर पाहिले की, जाणीव किंवा जगज्जोती हा मूळमायेचा एक घटक अथवा अवयव आहे. आता, अनेकदा अवयव आणि अवयवी हे एकरूप मानले जातात. त्यानुसार जाणीव / जगज्जोती हा घटक असणाऱ्या मूळमायेला जगज्जोती म्हणता येते. पुढील ओवीत रामदासस्वामींनी ही संकल्पना मांडली आहे : - प्रकृति पुरुष शिव शक्ती । अर्धनारीनटेश्वर म्हणती । परी ते आवघी जगज्जोती । मूळ त्यासी ॥ (१५.७.३.). येथे कुणी म्हणेल की, या ओवीमध्ये प्रकृति-पुरुष इत्यादींचे मूळ जगज्जोती असे म्हटले आहे. तेव्हा येथे "मूळ" शब्दाने मायेचे मूळ असणाऱ्या ब्रह्माचा बोध होणार नाही काय ? या प्रश्नाचे उत्तर नकारार्थी आहे. ओवीतील मूळ या शब्दाने ब्रह्माचा बोध होत नाही. याचे कारण असे : - रामदासस्वामींच्या मते, ब्रह्म हे निश्चळ व निर्गुण आहे. म्हणजे ब्रह्मात कोणतेही गुण नाहीत. याउलट जगज्जोती हा जाणीव-गुण आहे. त्यामुळे मूळमायेतील जाणीव हा गुण असणारी जगज्जोती ही निर्गुण ब्रह्म असणार नाही, हे उघड आहे. म्हणून वरील ओवीत जगज्जोती ही "मूळ त्यांसी" आहे, या संकल्पनेत गुण असणारी जगज्जोती ही ब्रह्म आहे, असा अर्थ घेता येत नाही. त्यामुळे या ओवीमध्ये जगज्जोती म्हणजे मूळमाया असाच अर्थ घ्यावा लागतो.

आणखी असे :- दासबोधात अन्य काही ठिकाणी, जगज्जोती ही मूळमायेचे एक नाव आहे, असे रामदासस्वामी सांगतात. ते म्हणतात : - निश्चळ परब्रह्मात उठणाऱ्या चंचळाला म्हणजेच मूळमायेला अनेक नावे आहेत. शब्दांच्या लिंगानुसार मूळमायेला पुल्लिंगी, स्त्रीलिंगी आणि नपुंसकलिंगी नावे दिली जातात. त्यातील नावांत ''जगज्जोती'' हे एक नाव आहे. अशा प्रकारे मूळमायेला जरी असंख्य नावे देता येत असली, तरी मूळमाया ही वस्तू मात्र एक राहाते आणि ती वस्तू म्हणजे जगज्जोती (ऐसी नामें उदंड असती। परी ते येकची जगज्जोती। विचारवंत ते जाणती। सर्वांतरात्मा। १०.१०.३२). उदा. मूळमायेला पुल्लिंगात आत्मा असे नाव आहे, स्त्रीलिंगात जगज्जोती असे नाव आहे आणि नपुंसकलिंगात सर्वज्ञपण असे नाव आहे. तथापि हे तीनही शब्द एकच मूळमाया हा अर्थ सांगणारे आहेत ( आत्मा जगज्जोति सर्वज्ञपण। तीनी मिळोन एकचि जाण ।। १०.१०.३३).

वरील सर्व विवेचनाचा भावार्थ असा आहे की, जगज्जोती हा शब्द मूळमाया या अर्थानेही रामदासस्वामींनी दासबोधात कधी कधी वापरला आहे.

**(३) जगज्जोती ही देवदेवतांचे मूळ आहे** : - वर पाहिले आहे की, निश्चळ ब्रह्मातील चंचळ म्हणजे मूळमाया. निश्चळ ब्रह्मात हे जे चंचळ उठले, ते इच्छा किंवा स्फूर्ति किंवा स्मरण या स्वरूपाचे असते. (निश्चळीं स्मरण चेतलें। त्यास चैतन्य ऐसे कल्पिले। गुणसमानत्वें जालें। गुणसाम्य ऐसें ।। १७.२.६). ही इच्छा म्हणजेच '' अहं बहु स्याम्'' (= मी अनेक होईन) ही इच्छा किंवा संकल्प अथवा कल्पना. अशा प्रकारे निश्चळ ब्रह्मात इच्छा आली, कल्पना आली, संकल्प उठला, चंचळ संकल्प निर्माण झाला, 'अहं' (=मी) अशी स्फूर्ति झाली, स्फूर्तिरूप अहंकार उठला. हा संकल्प / कल्पना म्हणजेच मूळमाया आहे. संक्षेपाने सांगायचे झाल्यास, निश्चळ ब्रह्मातील इच्छा / स्फूर्ति / स्फुरण / स्मरण म्हणजेच मूळमाया आहे.

मूळमायेपासूनच सृष्टीची रचना होते. विश्व हे मायेचा विकार व विस्तार आहे. मूळमायेपासून उद्‌भूत झालेल्या विश्वात अनेक प्राणी आहेत. आणि अंतरात्मा हा सर्व देवांचे मूळ आहे. हा अंतरात्मा म्हणजे मूळमायाच आहे. म्हणजेच मूळमाया हीच सर्व देवांची जननी आहे; मूळमाया हीच सर्व देवांचे मूळ आहे. वेगळे शब्द वापरून सांगायचे झाल्यास : - मूळमाया म्हणजे ब्रह्मात उठलेले स्मरण आहे. हे स्मरण (=मूळमाया) हेच सर्व देवतांचे मूळ आहे; या स्मरणाचे अंश म्हणजे नाना देवता आहेत. शारदा-रूपात असणारी मूळमाया ही ब्रह्मदेव, इत्यादि देवांची जननी आहे.

वरील भागच रामदासस्वामी वेगळ्या शब्दांत पुढीलप्रमाणे मांडतात : - वायूत म्हणजे मूळमायेत जो जाणीव हा गुण आहे, तो ईश्वराचे लक्षण आहे. मूळमायेतील हा जाणता ईश्वर हाच सर्वेश्वर आहे. या ईश्वरापासून पुढे तीन गुण होतात म्हणजे या ईश्वराचा तीन गुणांशी संबंध येतो. या तीन गुणांपासून ब्रह्मा, विष्णु, महेश हे तीन देव उत्पन्न होतात. आता मूळमायेतील (=वायूतील) जाणीव म्हणजेच जगज्जोती आहे. म्हणून जगज्जोतीपासून देवदेवता उत्पन्न होतात, हे म्हणणे सार्थ ठरते.

अन्य गौण देवदेवतांच्या बाबतीत रामदासस्वामी असे सांगतात : - मूळमाया वायुस्वरूप आहे. या वायूत आकाश इत्यादि पाच सूक्ष्म भूते आणि सत्त्व, रज, तम हे तीन गुण सूक्ष्म रूपात असतातच. या वायूमध्ये सर्व देवतांना थारा आहे. देवदेवता, भुते, इत्यादि सर्व वायुस्वरूप असतात आणि वेळप्रसंगी ते देह धारण करून प्रगट होतात व नंतर गुप्तही होतात. वायूमध्ये जगज्जोती आहे. ती जाणीवरूप आहे. या जाणीवेमध्ये वासनेमुळे नाना प्रकारचे भेद निर्माण होतात; हे भेद हेच वायुरूप देवदेवतांचे मूळ आहे (वायो स्वरूपें विचरती । वायोमध्ये जगज्जोती । जाणती कळा वासना वृत्ती । नाना भेदे । १०.४.११). वायूमधील जगज्जोतीच्या अनंत मूर्ति म्हणजेच सर्व देवदेवता आहेत (एक वायोमधील जगज्जोती । जगज्जोतीच्या अनंत मूर्ति । देवदेवतांच्या । १०.४.१३). या सर्वाचा मथितार्थ असा की, जगज्जोती हीच सर्व देवदेवतांचे मूळ आहे.

**(४) जाणीवरूप जगज्जोतीचे अंश सर्व प्राणिमात्रांत आहेत :** - या विधानाचा अर्थ लक्षात येण्यास, पुन: एकदा मूळमायेच्या स्वरूपाचे विवेचन लक्षात ध्यावयास हवे. ते असे आहे :- मूळमाया ही वायुस्वरूप आहे. मूळमायेत सूक्ष्म रूपाने सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण असतात. आता, ज्या वस्तूत सत्त्व, रज व तम हे तीन गुण गूढ / सूक्ष्म रूपात असतात त्या वस्तूला शुद्धसत्त्वगुण म्हणतात. मूळमायेत सत्त्व, रज, तम हे तीन गुण सूक्ष्म अवस्थेत असल्याने, मूळमायेला शुद्धसत्त्वगुण म्हणतात. (तयासीच म्हणिजे महत्तत्त्व । जेथे त्रिगुणाचे गूढत्व । अर्धमात्रा शुद्ध सत्त्व । गुणक्षोभिणी ।। २०.१०.२७). या शुद्ध सत्त्व गुणातून म्हणजेच मूळमायेतून पुढे सत्त्व, रज व तम हे तीन गुण व्यक्त किंवा स्पष्ट होतात. मूळमायेत तीन गुण प्रगटताच, म्हणजे तीन गुण व्यक्त होताच, तीच मूळमाया गुणमाया होते. मूळमायेतील गुणांची साम्यावस्था ढळून तिच्यात गुणांचा थोडा विकार झाला की तिलाच गुणक्षोभिणी माया म्हणतात. या गुणक्षोभिणी मायेतून किंवा गुणमायेतून सत्त्व, रज, आणि तम

हे तीन गुण निर्माण होतात म्हणजे व्यक्त होतात अथवा स्पष्ट होतात. सत्त्व, रज व तम हे तीन गुण व्यक्त झाल्यावर, प्रथम विष्णु जन्मास आला. विष्णु म्हणजे शुद्ध जाणीव किंवा जाणती कळा किंवा सत्त्वगुण होय. त्या विष्णूलाच कधी सत्त्वगुणाचा देह धारण करणारा विष्णू असेही म्हणतात. या सर्वांचा भावार्थ असा:- मूळमायेत सत्त्वगुण म्हणजे विष्णू सूक्ष्म रूपाने होताच; पुढे तो सत्त्वगुण = विष्णू व्यक्त झाला, आणि त्याने सत्त्वगुणाचा चतुर्भुज देह धारण केला. आता, हा जो विष्णू आहे, तोच त्रैलोक्याचे पालन करतो. या विष्णूच्या अंशानेच जग चालते, असे भगवद्गीता सांगते (त्याच्या अंशे जग चाले । ऐसें भगवद्गीता बोले ॥ १०.९.१३). विष्णूच्या अंशाने जग चालते, म्हणजेच विष्णू प्राण्यांचे पालन करतो. या विधानाचा अर्थ असा आहे :- विष्णू हा सत्त्वगुणानेच बनलेला आहे; तो सत्त्वगुणाचा पुतळा/मूर्ति आहे. सत्त्व या गुणाचे स्वरूप जाणीव हे आहे. ही जाणीव विश्वातील सर्व प्राण्यांत विभागून गेली आहे; आणि या जाणीवेमुळेच - या जाणीवेच्या प्रेरणेनेच - जगातील सर्व प्राणी स्वत:ला वाचवितात किंवा स्वत:चे रक्षण करतात (एक जाणीव वाटली । प्राणिमात्रास विभागली ॥ जाण जाणो वाचविली । सर्वत्र काया ॥ १०.९.१४). स्पष्ट करून सांगायचे झाल्यास : - मूळमायेपासून विश्व निर्माण होते. या विश्वात अनेक प्राणी उत्पन्न होतात. त्या सर्व प्राण्यांत एकच जाणीव कळा आहे; तिलाच जगज्जोती म्हणतात (अनेक प्राणी निर्माण होती । परी येकचि कळा वर्तती । तये नाव जगज्जोती । जाणती कळा ॥ १०.९.१४-१५). जगज्जोतीचा अंश असणारी ही जाणीव प्राण्यांच्या ठिकाणी ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांचे मार्फत कार्य करते. जगज्जोतीचा अंश असणारी ही जाणीवच प्राण्यांच्या नाना सुखदु:खांची परीक्षा करते, प्राण्यांचे स्थूळ शरीर चालविते, व त्या प्राण्यांचे रक्षण करते.

प्राणिमात्रांत विभागून गेलेल्या जगज्जोतीचा अंश काय कार्य करतो, हे रामदासस्वामी पुढीलप्रमाणे सांगतात : - एकच जाणीव म्हणजे जगज्जोती ही सर्व प्राण्यांत विभागली गेली आहे. याचाच अर्थ असा की, जगज्जोतीचा अंश प्रत्येक प्राणिमात्रात आहे. या जगज्जोतीमुळेच प्राणी जिवंत रहातात व स्वत:चे रक्षण करतात, हे या जगात प्रत्यक्षच पहावयास मिळते (एक जाणीव वाटली । प्राणिमात्रास विभागली । जाण जाणो वाचविली। सर्वत्र काया ॥ तयेचे नाव जगज्जोती । प्राणिमात्र तिचेन जीती ॥ याची रोकडी प्रचीती । प्रत्यक्ष पाहावी ॥ १०.९.१४-१५). जगातील कोणताही प्राणी-मग तो पशु असो, पक्षी असो, किडा असो वा मुंगी असो - लक्षात आणा. तो जिवंत आहे तोपर्यंत ही जाणीव त्याच्या शरीरात सतत खेळत असते. किंबहुना ही जाणीव देहात आहे, तोपर्यंतच तो प्राणी

जिवंत असतो; ही जाणीव म्हणजेच जगज्जोतीचा अंश शरीराबाहेर गेला की प्राणी तत्काळ मरून पडतो (तो गेलिया प्राणी मरती । जेथील तेथे ॥ १०.९.१८)

जगातील जिवंत प्राण्यांत सतत खेळणारी ही जाणीव प्राण्यांना स्व-रक्षणाची प्रेरणा देत असते. संकट आले किंवा शत्रूचे भय उत्पन्न झाले की प्राणी स्वत:ला वाचविण्यास लपतात, दडतात किंवा पळून जातात आणि म्हणून ते वाचतात. अशा प्रकारे ही जाणीव सर्व जगास म्हणजे जगातील सर्व प्राण्यांस वाचवीत असते; म्हणूनच तिला जगज्जोती हे नाव दिले जाते (अवघ्या जगास वाचविती । म्हणौनि नामें जगज्जोती ॥ १०.९.१८). संक्षेपाने सांगायचे झाल्यास, मूळमायेतील जाणीवेचे म्हणजेच जगज्जोतीचे अंश जगातील प्राणिमात्रात वाटले गेले आहेत, व तेथे तिच्या प्रेरणेने प्राणी स्वत:चे संरक्षण करीत असतात.

आत्तापर्यंत झालेल्या सर्व विवेचनाचा तात्पर्यार्थ असा सांगता येईल:- जगज्जोतीची चतुर्विध संकल्पना रामदासस्वामींनी मांडलेली आहे :- (१) जगज्जोती ही मूळमायेचा एक घटक आहे. (२) कधी मूळमायेलाच जगज्जोती असे म्हणता येते. (३) जगज्जोती ही देवदेवतांचे मूळ आहे. (४) जगज्जोतीचे अंश जगातील जिवंत प्राण्यांत असून, ते प्राण्यांचे रक्षण करण्यास उपयोगी पडतात.

आत्तापर्यंत जगज्जोतीचे जे स्वरूप पाहिले, ते विश्वोत्पत्तीच्या वेळी आणि विश्वाच्या स्थितिकाळी असते. महाप्रलयाचे वेळी जगज्जोतीचे काय होते, त्याचे दिग्दर्शन रामदासस्वामी असे करतात : - महाप्रलयाचे वेळी प्रत्येक कार्य आपल्या कारणात समाविष्ट होते. तेव्हा महाप्रलयाचे काळी मूळमायेचा लय होतो. साहजिकच मूळमायेचा घटक असणारी जगज्जोती ही लीन होते (तेथें जाणीव राहिली । आणि जगज्जोती निमाली ॥ १०.५.२६). मग विश्वोत्पत्तिपूर्वी ज्याप्रमाणे केवळ निर्गुण ब्रह्माची स्वरूपस्थिती होती, त्याप्रमाणे महाप्रलयानंतर केवळ ब्रह्माची स्वरूपस्थिती उरते (शुद्ध सारांश उरली । स्वरूपस्थिती ॥ १०.५.२६). म्हणजेच महाप्रलयानंतर जगज्जोती निमाली आहे, आणि फक्त निर्गुण ब्रह्माची स्वरूपस्थिती उरली आहे. अशा प्रकारे विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय या तीनही काळात जगज्जोती काय स्वरूपात असते, याचे विवेचन रामदासस्वामींनी दासबोधात केलेले आहे.

●●●

# प्रा. डॉ. के. वा. आपटे यांचा अल्प परिचय

**नाव :-** केशव वामन आपटे

**जन्म दिनांक :-** ९ सप्टेंबर, १९२९

**शिक्षण :-** मराठी शाळा नं. २, पी. एम्. हायस्कूल,
विलिंग्डन कॉलेज (सांगली)

**शिष्यवृत्त्या :-** हायस्कूलमध्ये करंदीकर शिष्यवृत्ती, मॅट्रिक परीक्षेत अकबरनवीस संस्कृत शिष्यवृत्ती, कॉलेजमध्ये अनेक शिष्यवृत्त्या आणि पारितोषिके. इंटर आर्ट्स परीक्षेत (पुणे विद्यापीठ) लो. टिळक संस्कृत शिष्यवृत्ती, एम्. ए. परीक्षेत (पुणे विद्यापीठ) बी. डी. नातू वेदान्त पारितोषिक.

मॅट्रिक परीक्षेत डिस्टिंक्शन, बी. ए. (संस्कृत ऑनर्स) परीक्षेत प्रथम वर्ग, एम्. ए. परीक्षेत प्रथमवर्ग,
पी.एच्.डी. (मुंबई विद्यापीठ) विषय - बौद्ध व जैन मतांचे खंडन.
**अध्यापन :-** कीर्ति कॉलेजमध्ये (मुंबई) संस्कृत आणि अर्धमागधी, विलिंग्डन कॉलेजमध्ये (सांगली) संस्कृत या विषयांचे अध्यापन. मुंबई विद्यापीठ व शिवाजी विद्यापीठ यांमध्ये संस्कृत व अर्धमागधी विषयांचे पदव्युत्तर अध्यापन. एम्. फिल्. व पी.एच्.डी. साठी मार्गदर्शक म्हणून शिवाजी विद्यापीठाची मान्यता.

**निबंधासाठी पारितोषिके :-** 'भारतीय तत्त्वज्ञानातील आत्मसाक्षात्काराचे मार्ग' या निबंधास बनारस हिंदू विद्यापीठाचे बूच मेटॅफिजिक्स प्राईज; ''मूळगीता व मूळगीतेचा वक्ता' या निबंधास प्रजापिता ब्रह्माकुमारी ईश्वरीय विद्यापीठाचे पारितोषिक.

**प्रकल्पासाठी शिष्यवृत्ती :-** मध्यवर्ती भारत सरकारकडून शिक्षण विभागातर्फे 'शास्त्र चूडामणि' योजनेखाली स्कॉलर म्हणून १९९०-९२ सालांसाठी निवड. (प्रकल्प :- 'शंकराचार्यांचा आत्मानात्मविवेक नावाचा ग्रंथ').

**पुरस्कार :-** शंकराचार्यांच्या 'वाक्यसुधा' ग्रंथावरील लेखासाठी सौ. शालिनी विष्णुपंत पाठक स्मृतिप्रतिष्ठानतर्फे पुरस्कार, खोचीकर गौरव पुरस्कार, सांगली जिल्हा नगरवाचनालयातर्फे संत वाङ्मयावरील लेखनासाठी 'संत रामदासस्वामी पुरस्कार'.

**संदर्भग्रंथांत उल्लेख :-** संस्कृत भाषेतील "दिव्य-ज्योति", इंग्रजी भाषेतील "लर्नेड इंडिया" आणि "रेफरन्स इंडिया", आणि मराठीतील "मराठी सारस्वत" या ग्रंथांत उल्लेख व माहिती.

**पदे :-** विलिंग्डन कॉलेजमध्ये संस्कृत विभाग प्रमुख, वसतिगृह प्रमुख, उपप्राचार्य. मुंबई आणि शिवाजी विद्यापीठांतील संस्कृत अभ्यास मंडळाचा सदस्य.

**भाषण-प्रवचन :-** मुंबई व सांगली आकाशवाणीवर भाषणे, सार्वजनिक भाषणे व प्रवचने.

**देणग्या :-** अनेक शैक्षणिक व धार्मिक संस्थांना द्रव्याच्या देणग्या; कीर्ती कॉलेज, विलिंग्डन कॉलेज, काही वाचनालये व ग्रंथालये यांना पुस्तकांच्या देणग्या.

**लेखन :-** संस्कृत, इंग्रजी, हिंदी आणि मराठी या चार भाषांतून विविध विषयांवर लेखन. सुमारे ५० (पन्नास) नियतकालिकांत लेख प्रसिद्ध झाले. नियतकालिकांत आणि स्वतंत्रपणे अनेक पुस्तके प्रकाशित झाली आहेत.



## प्रा. डॉ. के. वा. आपटे यांचे प्रकाशित ग्रंथ

* **संस्कृत भाषेत :-** १) श्रीगुरुलिंगगीतम् २) श्रीदासरामगीतम्
* **हिंदी भाषेत :** ३) त्रिविक्रमकृत प्राकृत शब्दानुशासन
४) हेमचंद्रकृत प्राकृत व्याकरण (प्रस्तावना, भाषांतर व टीपा यांसह)
* **मराठीत फक्त भाषांतर :-** ५) कालिदासकृत विक्रमोर्वशीय नाटक
६) नासदीय सूक्त ७) भगवद्गीता तत्त्वविवेचिनी टीका
८) प्रेमदर्शन (नारदभक्तिसूत्र) ९) अध्यात्मरामायण
(७ ते ९ हे ग्रंथ डॉ. गो. रा. कुलकर्णी यांचेसह)
* **संपादित :-** १०) श्रीदासरामवचनामृत ११) रेणुकामाहात्म्य
१२) श्रीज्ञानेश्वरस्तोत्र आणि अन्य लघु ग्रंथ
* **प्रस्तावनेसह संपादित :-** १३) परमार्थसार १४) आरतीसंग्रह
१५) चांगदेवपासष्टी १६) परमार्थ प्रश्नोत्तरी १७) भजनतरंग
* **स्वतंत्र :-** १८) गुरुतृतीयाकथा १९) दासबोधातील तत्त्वज्ञान
* **संतचरित्रे :-** २०) निंबरगीकरमहाराज २१) महायोगिनी श्रीलक्ष्मीबाई अक्का २२) रघुनाथप्रिय साधुमहाराज २३) चिमडमहाराज
२४) श्रीदासराममहाराज चरितामृत २५) दासराममहाराज नित्यपाठचरित्र
* **प्रस्तावना, भाषांतर व टीपा यांसह संपादित :-**
२६) ब्रह्मसूत्र शांकरभाष्य चतुःसूत्री २७) आत्मानात्मविवेक
२८) हेमचंद्रकृत अपभ्रंश व्याकरण २९) वररुचिकृत प्राकृत व्याकरण
३०) न्यायावतार ३१) नयकर्णिका (३० व ३१ हे जैनदर्शनावरील)
३२) तत्त्वोपदेश
* **भगवद्गीतेवरील :-** ३३) पाठांतरसुलभ भगवद्गीता
३४) भगवद्गीता संपूर्ण मराठीतून (प्रस्तावना, भाषांतर व टीपा यांसह)
३५) भगवद्गीता (लेखसंग्रह)



शुकासारिखे पूर्ण वैराग्य ज्याचे ।
वसिष्ठापरी ज्ञान योगेश्वराचे ।
कवी वाल्मिकीसारखा श्रेष्ठ ऐसा ।
नमस्कार माझा तया रामदासा ।।

